# माझा विक्रम

[ चक्रमांच्या अक्रा कथा ]

भा. रा. भागवत

1946




★ ३९ ★

मूल्य अडीच रुपये

कै० ती० सौ०

मा मी च्या

प वि त्र

स्मृ ती स

मा घ व द्य ११,

विक्रम संवत् २००२

# विक्रमानुक्रम

याचा अर्थ, विक्रमराजाबद्दल मला एकदम प्रेमाचें भरतें येऊन त्या भरांत मी या संग्रहाला एवंविशिष्ट नांव दिलें असें मात्र नाहीं. कशाला देऊं? ' सा रम्या नगरी महान् स नृपतिः...' वगैरे सगळें आतां काळांत गडप झालें आहे. त्या रत्नखचित दरबारांतलें मारून मुटकून नऊ हजारावें रत्न होण्याचाही मान मला मिळणें अशक्य आहे!

मग हें कुठचें नांव काढलेंत अशी चिकित्सा टीकाकार करणारच. तेव्हां सकृद्दर्शनीं द्राविडी वाटणारे पण अस्सल आर्य असे कांहीं प्राणायाम करणें मला भाग आहे. त्या प्राणायामांनीं कुतूहल शमलें तर तेवढेंच हायसें वाटेल तेव्हां ऐका.

पस्तीस छत्तीस सालीं पुणें मुक्कामीं एक रोमहर्षक छंद उगम पावला आणि क्रमाक्रमानें त्यानें कोल्हापूर, सोलापूर, सातारा, नगर यांसारखे महाराष्ट्रांतले जिल्हे पादाक्रांत केले. तो छंद म्हणजे रेकॉर्ड मोडण्याचा. रेकॉर्ड वाटेल त्या प्रकारचें असूं शके. ' मऱ्हाटी ' बोलींत या छंदाला ' विक्रम ' ही उपाधि बहाल करण्याचें काम प्रथम कोणीं केलें त्याबद्दल नक्की माहिती उपलब्ध नाहीं. पण या ' विक्रम 'वर क्रमशः कांहीं कहाण्या लिहून शब्दपरंपरा जागी ठेवण्याचें किरकोळ काम मीं चिकाटीनें केलें आहे! आणि म्हणून ' माझा विक्रम ' नांव निवडण्यांत आपण औचित्यभंग केला आहे किंवा औद्धत्य दाखवलें आहे असें मला वाटत नाहीं. विक्रम हा कांहीं झालें तरी विक्रमच; तो पराक्रम नव्हे. कारण त्यांत थोडासा चक्रमपणा अभिप्रेत असतो.

मी असें चक्रमपुरीचा राणा । नाम माझा विक्रम ॥

माझ्या विक्रमाचे पहिले खेळ ज्या साहसी सर्कसबहाद्दरांनीं जनतेपुढें आणले त्यांचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख केला पाहिजे —

माझा विक्रम ( साप्ताहिक प्रभा ), सायकल-विक्रम ( मनोहर ), चक्रमपुरांतील विक्रमोत्सव ( मनोहर ), पंपूचें प्रचंड साहस ( मनोहर ), ह[illegible] हल्ल्यांतील बेहोषी ( मनोहर ), अण्णांचें अधिकारग्रहण ( मनोहर ), भूत, भविष्य आणि वर्तमान ( साप्ताहिक प्रकाश ), आठवणीचा लिलांव ( ज्योत्स्ना ), विठ्ठलरावांचा दिवाळसण ( प्रकाश ).

यूयूनगरचा युद्धमहोत्सव आणि देहूरोड ते विसापूर प्रथमच रंगणांत उतरत आहेत.

अशा रीतीनें अखेर विसापूरला येऊन भिडलेली ही वेडीवाकडी विक्रमपरंपरा मी माझ्या आईवांचून कुणाला अर्पण करणार ? पण योग असा होता, कीं मी सरकारी पाहुणचार संपवून घरीं येण्याच्या आंतच मामीला त्याहून मोठ्या सरकारचें बोलावणें यावें.

भा. रा. भागवत

# माझा विक्रम

इंदूरहून निघून चक्रमपूरच्या स्टेशनवर मी उतरलों मात्र, हारतुरे घेतलेल्या पांचपन्नास लोकांचा घोळका माझ्या भोवतीं जमला. एकानें माझी बॅग ओढली, दुसऱ्यानें वळकटी खेचली आणि तिसऱ्यानें फिरकीचा तांब्या हिसकला. "अहो, हें काय?" म्हणून मी अचंब्यानें आ करतों आहें तोंच माझ्या गळ्यांत हारांचा ढीग पडला आणि त्यामुळें माझें तोंड बंद झालें! कानांना देखील गुरख्या बसल्यासारखें झालेंच होतें, पण त्यांतूनही 'किसन कावळे की जय!' अशा अस्पष्ट आरोळ्या मला ऐकूं आल्याशिवाय राहिल्या नाहींत. तसेंच डोळे सताड उघडे असल्यामुळें माझ्या भोवतीं जमलेल्या मंडळींचा आशय चेंदामेंदा करणें हा न [illegible] माझा गौरव करणें हा आहे हें देखील त्यांच्या हातवाऱ्यांवरून आणि चेहऱ्या[illegible]न स्पष्ट दिसत होतें. माझा चेहरा मात्र फोटो घेण्यासारखा झाला असावा. कारण मी जिकडे नजर वळवीं तिकडे सटकदिशीं एखादा कॅमेरा समोर यायचा. शेवटीं एकदाचा, आझाद मैदानावरची सभा संपल्यावर तुम्ही जसे फारशी हालचाल न करतां आपोआप बोरीबंदरवर येऊन थडकतां तसा मी स्टेशनच्या बाहेर आलों असल्याचें माझ्या लक्षांत आलें. व[illegible]टेंत मीं एवढें मात्र केलें होतें, कीं मला गुदमरून टाकणाऱ्या त्या हारांतलीं बरींचशीं फुलें ओरपून 'पायदळीं' फेकून दिलीं होतीं. त्यामुळें गर्दी ओसरल्यावर त्या रस्त्याकडे एखाद्यानें पाहिलें असतें तर इथून नुकतेंच एखादें प्रेत तर गेलेलें नाहीं अशी त्याला शंका आली असती.

बाहेर आल्यावर एका कोऱ्या करकरीत आणि सुशृंगारित मोटारीपाशीं आमची मिरवणूक थांबली. गाडीचें दार उघडून मला आंत बसवण्यांत आलें. चोहों बाजूंनीं चामड्याच्या कव्हराच्या 'ऑटोग्राफ्स्' म्हणून इंग्रजी छाप मारलेल्या सुंदर वह्या माझ्यापुढें करण्यांत आल्या. मीं त्या रागारागानें थप्पड लगावून दूर उडवल्या आणि निर्भीडपणें गरजलों, "नाऊ, वुइल् यू एक्सप्लेन धिस्?...कीं आणखी धिंड काढायची आहे?"

माझें डोकें खरोखरच पिकून जायची वेळ आली होती. त्यांत ठणठण असे ठोके पडत असून ' फर्र्र् ' असा एक अज्ञात आवाजही कानांवर आदळत होता. त्याचें कारण मला पुढें कळलें.

माझे उद्धट उद्गार कांहीं लोकांना आवडले नाहींत. स्वाक्षरीचे पारधी असंतुष्ट होऊन दूर पळाले. दुसरे कांहीं शिष्ट " चढवून ठेवलाय् लेकाला, पण आमचे ग्येनबाराव खालीं आणतील, तेव्हां याद राख म्हणावं ! " " हो तर काय ? आजच बसायचे, नव्हे का ते ?... " " मिरवणुकीला धिंड म्हणतो, सुरत पाहा ! " असें बडबडून चालते झाले. तिसरा एक स्तुतिपाठकांचा वर्ग दांत विचकीत म्हणाला, " डोन्ट बी हॉट, मिस्टर कावळे ! धिंड कां म्हणतां ? आतां इथून चांगले वाजत गाजत... "

" वाजत गाजत ! " मी मुठी वळून किंचाळलों, " आणि डोन्ट कॉल मी कावळे. "

" म्हणजे ? " माझ्या भक्तगणांत एकाएकीं आश्चर्याची लाट पसरली. दोघे तिघे आ करून एकमुखानें बोलले, " आपण किसनराव कावळे नाहीं ? "

" त्रिवार नाहीं ! " मी ओरडलों, " माझं नांव किसन नाहीं, श्रीकृष्ण आहे. आणि आडनांव कावळे नाहीं... " आणि काय झालें कोणास ठाऊक; एकाएकीं वाणींत व्याजोक्ति संचारली आणि मीं थापून दिलें, " चिमणे आहे !......जो कावळे म्हणेल त्याचं थोबाड फोडीन मी ! "

माझ्या ह्या जाहीरनाम्यानें सर्वत्र एकच खळबळ उडून गेली. माझ्याकडे लोकांनीं रोखून बघितलें, चिडून पाहिलें, गोंधळून पाहिलें, संतापून पाहिलें. बरेचजण बुचकळ्यांत पडले. कांहींजण ' तरीऽच ' अशा अर्थी माना हलवूं लागले, तर कांहींजणांनीं काढता पाय घेतला. तेवढ्यांत एक आशावादी हलुहळू पावलें टाकीत पुढें आला, आणि जणूं कांहीं ' यदा यदा हि धर्मस्य... '

अशी वेळ आली असून ईश्वरानें आपल्याला प्रेषित म्हणून पाठवलें आहे अशी गंभीर मुद्रा करून त्यानें एक छोटें भाषण केलें.

"लोकहो," तो म्हणाला, "श्रीजुत कावळे ह्यांचा उपहास करूं नका. त्यांना लागेल असं बोलूं नका. त्यांनीं रागाच्या भरांत शिव्या दिल्या तरी त्या सोसा. त्यांनीं लाथा झाडल्या तरी त्या फुलांसारख्या झेला. श्रीजुत कावळे..."

"पण ते कावळे नाहींत !"

"ऐकून घ्या...मी सांगतों तें शांतपणें ऐकून घ्या आणि मग आपल्या मनाशीं ठरवा कीं ते कावळे आहेत का नाहींत! ते जर कावळे नाहींत तर इतका वेळ तुम्हीं त्यांचा सन्मान कां केलात ? त्यांना हार कां घातलेत ? त्यांचे फोटो कां घेतलेत ? ते कावळेच आहेत अशी तुमची खात्री झाली म्हणूनच ना ? आणि अशी तुमची खात्री कां झाली ? तर तुम्ही त्यांचा फोटो आजच्या आरोळींत पाहिलेला आहे म्हणूनच ना ?"

"पण ते म्हणतात..."

"ते लाख म्हणतात !" ईश्वराचा दूत षड्विकारांपैकीं रागाच्या किंचित् आहारीं जाऊन उद्गारला. "श्रीजुत कावळे, क्षमा करा !" पुन्हा श्रोत्यांकडे वळून: "कावळ्यांनीं असं कां म्हणावं ह्याला दोन कारणं असूं शकतील. एक तर त्यांचा अप्रतिम विनय. मोठ्या लोकांचा मोठेपणा ह्यांतच असतो कीं ते स्वतःला छोटे समजतात. आपला गौरव केलेला त्यांना आवडत नाहीं. कावळे गुणी आहेत, कर्तबगार आहेत, पण त्यांना प्रसिद्धी नको आहे. आपल्याला मिळणाऱ्या सन्मानाची त्यांना किळस आहे. म्हणून ते आपले सांगतात कीं आपलं नांव कावळे नाहीं. हेतु हा कीं आपल्याला लोकांनीं एकटं सोडावं आणि उंदरासारखं हळूच बिळांत सटकायला मिळावं...खरं ना कावळेसाहेब ?"

मी नुसतें मांजरासारखें गुर्रर्र केलें. कंबरडें आधींच मोडलें असल्यामुळें

पाठीची कमान झालेलीच होती. मला ह्या सगळ्या प्रकाराची इतकी चीड आली होती, कीं हातांत विटकरीचा तुकडा असता तर त्या देवदूताच्या तेजस्वी टकुऱ्यावर तो हाणल्याशिवाय मी राहिलों नसतों. दगडही चालला असता.

" श्रीजुत कावळे कांहींच उत्तर देत नाहींत, " त्यानें आपलें भाष्य पुढें चालू केलें, " त्या अर्थी माझा तर्क खरा असावा. तो खोटा असेल तर दुसरंही एक कारण संभवनीय आहे. कांहीं थोर पुरुष ' विनय ' हा गुण समजत नाहींत; उदाहरणार्थ शॉ नांवाचा लेखक. कावळे जर त्या जातीचे असतील तर मग त्यांनीं केला हा प्रकार विनयानें केला नसून वेडाच्या भरांत केला असावा असं म्हणायला जागा आहे..."

लोक ह्या नवीन घोषणेमुळें पुढें सरकून माझ्याकडे कुतूहलानें पाहूं लागले, आपापसांत कुजबुजूं लागले. मी हाताच्या मुठी वळूं लागलों आणि अर्थात् उलगडूं लागलों. पण प्रेषिताचें तिकडे लक्ष नव्हतें. तो पुढें म्हणाला, " मी म्हणतों तें अगदीं सत्य आहे. श्रीजुत..."

तो ज्या ज्या वेळीं मराठी शब्दाचें तें इंग्रजी स्पेलिंग बंगालींत उच्चारी त्या त्या वेळीं एक जुता लगावून त्याची मुखश्री रंगवण्याचा मोह मला अनावर होई. पण खालीं वाकून बुटाचे बंद सोडून होईपर्यंत त्यांनीं मला शिल्लक टेवला असता कीं नाहीं ह्याची शंका होती. तेव्हां तसाच ताठ उभा राहून आंतल्या आंत जळलों.

" श्रीजुत... " त्याचें चाललेंच होतें: " कावळे ह्यांनीं जो प्रचंड विक्रम केला, त्यानंतर त्यांना घेरी येणं, त्यांचं मस्तक फिरून जाणं, त्यांचा मेंदू ताळ्यावर नसणं...इन फॅक्ट, त्यांनीं चमत्कारिक वेडे चाळे करणं... "

पण देवदूताचा तो प्रचंड दिव्य संदेश पुरा झाला नाहीं. जोंपर्यंत ही मंडळी नुसतेच आचरट चाळे करीत होती आणि निदान मला एक थोर पुरुष मानून माझी विभूतिपूजा करीत होती, तोंपर्यंत त्रास कितीही होवो, खोल कुठें तरी

अहंकाराच्या गुदगुल्या तरी होत होत्या. शंभर वेडबंबूंच्या घोळक्यांतला एकटा शहाणा पुरुष म्हणून मी स्वतःला अंधुकपणें धन्य मानीत होतों. पण जेव्हां त्या दीडशहाण्यानें शहाणपणाचा मक्ता आपल्याकडे घेऊन मला वेड्यांत काढलें तेव्हां मात्र उंटाच्या पाठीवरची शेवटची काडी कीं काय म्हणतात तसें झालें. मी तावातावानें सीटवरून उठलों आणि चांगला ' ऑब्ट्यूज् ॲंगल 'चा ' स्टार्ट ' घेऊन त्या वक्त्याच्या झक्कपैकीं कानशिलांत भडकावली.

" स्टॉप ! ... पुरे करा ती बडबड ! " मीं साथ साथ गर्जना केली, " मला एकट्याला जाऊं दे. "

प्रेषित बिचारा आपला तांबडा लाल झालेला गाल चोळीतच राहिला. पण मी त्याच्याकडे पूर्ण दुर्लक्ष करून पुढें ओरडलों, " चालते होतां का नाहीं तुम्ही एकेक इथन ? नाहीं तर ह्याची केली तशी दशा तुमची करीन. पाजी लेकाचे !... "

माझा तो अवतार पाहून विस्मयचकित होऊन एकेका श्रोत्यानें तिथून पलायन केलें. जातांना जो तो माझ्याकडे वळून मात्र पाहात होता ; आणि त्यांच्या त्या मुद्रांवरून, मी वेडा असल्याबद्दल पूर्वी नसेल इतकी त्यांची आतां बालंबाल खात्री पटल्यासारखी दिसत होती. शेवटीं राहातां राहिले ' प्रेषित ' नि त्याचे दोघे तिघे मित्र.

हा प्रेषित मात्र अजब होता खरा. इतकी शिक्षा झाली असूनही त्याचा माझ्यावरचा विश्वास अद्याप अढळ होता असें दिसलें. वातावरण थोडें शांत झाल्यावर त्यानें आपला थर थर कांपणारा हात खिशांत घातला आणि एक चुरगळलेलें लहानसें वर्तमानपत्र बाहेर काढलें. तें हळुहळू उलगडलें. नंतर त्यांतल्या एका विवक्षित भागावर बोट ठेवून तें भीत भीत माझ्यापुढें करीत तो म्हणाला, " साहेब, आपण मारा, तारा किंवा वारा. सगळं आपल्या हातांत आहे. पण ह्याचा काय अर्थ ? "

मीं त्याच्याकडे किंचित् तुच्छतेनें पाहात तो अंक हातांत घेतला आणि त्यानें

दर्शविलेल्या फोटोकडे पाहिलें, तों काय आश्चर्य ! तो फोटो हुबेहूब माझा स्वतःचा असून खालीं नांव मात्र छापलें होतें, " किसनराव कावळे. "

मी हतबुद्ध होऊन त्या फोटोकडे पाहातच राहिलों. माझ्या प्रेषित मित्राला मात्र वाटलें, माझा बुद्धिभ्रंश हळुहळू दूर होत असावा. तेव्हां ह्या संधीचा फायदा घेऊन माझी आठवण आणखी ताजी करण्यासाठीं तो म्हणतो, " साहेब, पटलं आतां ? जागतिक रेकॉर्ड आपणच मोडलं कीं नाहीं ? सांगा ! "

" कसचं रेकॉर्ड ? " मी किंचाळलों, " मी कुणाच्या पिन्‌लाही धक्का लावत नसतों. रेकॉर्ड कशाला मोडीन ? "

थोर लोकांची विनोदबुद्धि संभाळून घ्यावी लागते हें जाणून त्यानें एक भयंकर सोशिक हास्य केलें आणि म्हटलें, " सायकल रेकॉर्ड, साहेब. "

" शायकऽल रेकॉर्ड, साहेब ! " मीं छातीचा भाता फुगवून त्याच्या आंगावर क्रोधाचा झोत फेकला. " तूं आतां इथून काळं कर पाहूं ? ऐकलंस ? मेक ब्लॅक !...ड्रायव्हर ! "

" जी साब. " इतका वेळ स्वस्थ पडून गंमत पाहाणाऱ्या ड्रायव्हरनें नीट बसत म्हटलें.

" गाडी शुरू कर दो ! "

" अच्छा साब. किधर जाओगे साब ? "

" भाजीपाला लेन, टरबूज बिल्डिंग, लड्डे साबके मकानमें. और कमसे कम पचास मील इस्पीडमें चलादो. जितने सायकलवाले ॲक्सिडेंट होकर गुजरेंगे उतना दुनिया पर तुम्हारा एहसान होगा. "

" अच्छा साब. " असें किंचित् स्मितपूर्वक म्हणून ड्रायव्हरनें गाडी चालू केली. प्रेषित आतांपर्यंत मोटारीच्या दारावर हात ठेवून उभा होता. तो आतां निराश होऊन दूर झाला. आपली दैवी कामगिरी निष्फळ झाल्यामुळें तो थोडाबहुत चिडलाही होता हें त्याच्या मित्रांशीं वागण्यावरून मला दिसलें. मोटार चालू झाल्यावर मीं एकदा मागें वळून पाहिलें, तेव्हां तो आणि त्याचे मित्र हळुहळू स्टेशनला लागून असलेल्या रेस्टॉरंटमध्यें जातांना दिसले. तेवढ्यांत एक गंमतही दृष्टीस पडली. मी चक्रमपुराला येऊन आतां एक तास झाला असल्यानें दुसरी·अप ट्रेन येऊन नुकतीच स्टेशनांत उभी राहिली होती; आणि तिच्यांतील उतारूंचा घोळका स्टेशनाबाहेर येत होता. ह्यांतलाच एक एकलकोंडा आणि हातांत बॅग घेतलेला, खरबुज्या तोंडाचा, बसक्या नाकाचा आणि फरकॅप घातलेला मनुष्य किंचित् बावचळल्यासारखा इकडे तिकडे पाहात होता. त्याला कोणी तरी उतरून घ्यायला यायचें असून तें आलें नसावें असें त्याच्या त्रासलेल्या मुद्रेवरून दिसत होतें. त्यानें तितक्यांत जवळ येऊन ठेपलेल्या त्या 'देवदूता' ला कांहीं तरी प्रश्न विचारला, पण देवदूत उत्तर देण्याच्या मनःस्थितींत नव्हता. त्यानें नुसत्याच वांकुल्या दाखवल्या. बिचारा खरबुज्या तसाच बॅग हलवीत पुढें गेला. नंतर त्याला एखाद्या टांगेवाल्यानें गठवलें असावें !

ह्या एकंदर तमाशांतून सुटल्यामुळें मला फार आनंद वाटला. एकदा वाटलें टांग्यांतून गेलों असतों तर स्वस्तांत पडलें असतें. मग वाटलें, एवढे हार गळ्यांत पडल्यावर एखादा दिवस मोटारनें जायला नको ? तेव्हां झाल्या गोष्टीचा खेद न करतां मऊ गादीला आरामानें टेकून वाऱ्याच्या झुळकीची मौज अनुभवूं लागलों. तेवढ्यांत आठवण झाल्यामुळें हातांत प्रेषिताची 'आरोळी' तशीच होती ती उलगडली आणि माझा फोटो पुन्हा एकदा निरखला. खूप डोकें खाजवूनही गूढ उकलेना. फोटो तर निर्हीयत माझा होता. पण खालीं बातमी होती कांहीं तरी अचाटच. श्रीयुत किसनरावांनीं नुकताच टोलापूरला जागतिक सायकल-विक्रम केला होता; आणि आतां म्हणे, ते चक्रमपूरला येणार असल्यामुळें इथेंही त्यांचा तसाच सन्मान व्हावा अशी संपादकांची इच्छा होती. संपादकांचें काय जातें इच्छा करायला ? पण त्यामुळें माझे मात्र हाल

झाले होते. बाकी त्या लोकलाडक्या दैनिकाच्या संपादकाची आणि माझी चांगली जानपछान होती. ' आरोळी ' चा मी ' स्टँडिंग ' लेखकच होतों ! तेव्हां लगेच संध्याकाळीं ' आरोळी ' कचेरींत जाऊन ह्या गोष्टीचा जाहीर खुलासा विचारण्याचें मीं ठरवून टाकलें.

इतक्यांत गल्ल्याकुच्यांतून वळणें घेत माझी मोटार टरबूज बिल्डिंगपुढें येऊन उभी राहिली. मी चटदिशीं खालीं उतरलों आणि अगोदर माझी चपटकी झालेली वळकटी, अर्धवट उघडी बॅग आणि झाकणाशिवाय उरलेला तांब्या काढला आणि पैशाचें पाकीट खोललें.

" कितना हुआ पैसा ? "
" नऊ रुपीया साब. "
" नऊ रुपीया ! " मीं चमकून म्हटलें, " क्या बोलते हो तुम ? "
" मीटर देखो साब. "
" लेकिन मीटर बराबर है तुम्हारा ? "
" एकदम फिट् है साब. "
" तो इतनेही टैममें इतना ज्यादा दाम कैसे हुआ ? "
" इस्टेशनसे आकर आप गाडीमें बैठे उसी टैम मैंने एंजिन चालू किया था साब. वह लंबी लंबी बात करनेवाला था ना, उसने हमे तैयार रहनेके लिये कहा था. "

माझ्या डोळ्यांपुढें क्षणभर काजवे चमकले. ' फर्रर ' आवाज कशाचा होता त्याचा उलगडा झाला. मला जास्त ऐकवेना. त्यानें दहाची नोट घेऊन परत दिलेला रुपया मीं खिशांत टाकला; वळकटी, बॅग आणि तांब्या उचलला नि घरांत शिरलों.

पुढल्या प्रशस्त दालनांत एका जीर्ण जाजमावर बैठक घातलेली होती. आंगांत सदराही नसलेले माझे तुंदिलतनु यजमान दादासाहेब लठ्ठे सदरेला

बसले होते. त्यांच्या शेजारीं एक हडकुळा भकास चेहऱ्याचा तरुण दिसत होता. जवळच पानांचा डबा पडला असून तांबूलचर्वण चालू असतां एकीकडे त्यांचे कांहीं निरर्थक मनसुबे चालले होते.

मला पाहातांच " आलास ? " म्हणून दादानें अडकित्ता फेकून एवढ्या मोठ्यानें हर्षगर्जना केली, कीं त्यांत माझ्या काखेंतून गळून पडलेल्या वळकटीचा फुसका आवाजही लुप्त झाला. मीं बॅग खालीं आपटली, फिरकीचा तांब्या आंतलें पाणी बेधडक सांडीत भिंतीच्या कडेशीं ठेवला आणि आव्हान स्वीकारल्याच्या पवित्र्यांत तप्त डोळ्यांनीं दादाकडे पाहात गर्जना केली, " हो, आलों. "

" बस तर मग. " दादानें जागचें न उठतां पोट हलवीत माझ्यासाठीं जागा केली आणि मग कनवाळल्यासारखा म्हणतो, " हाल झालेले दिसतात तुझे. हा प्रवास मोटा वाईट!...घे, सुपारी खा..."

" सुपारी नकोयू मला. " न घेतलेली सुपारी घशांत अडकल्यासारखा मी बोललों.

" पाणी पी...विसू, तो तांब्या घे रे. तेंच पी सध्या. काय सांगूं किशा तुला ? घरांत आहे अडचण. तिची तब्येत आधींच तोळा मासा... "

" त्यांत आतां पौंडांवर आलंय्... " त्या हडकुळ्या तरुणानें नुकतेंच उठून माझा भिंतीपासचा तांब्या उचलला होता. त्याची फिरकी फिरवीत तो अनपेक्षितपणें उद्गारला.

" म्हणजे ?...इतक्या खचल्या आहेत वहिनी ?...काय होतंयू त्यांना ? "

" बघूं आतां काय होतंयू नि काय नाहीं तें ! " दादानें त्या हडकुळ्याकडे पाहात हसत हसत म्हटलें.

" विसूची नि माझी बीट लागली आहे....हा विसू रोडे, बरं का ?...तो म्हणतो,

मुलगा होईल. मीं म्हणतों, मुलगी. मला ढमळाकाकूंच्या खाणावळींत सोडून ती सध्यां माहेरींच जाऊन बसली आहे. स्त्रियश्चरित्रम् पुरुषस्य भोग्यम्!"

मी हडकुळ्याकडे वळलों आणि म्हणालों, " माफ करा. मला पाणी नको."

" राहिलं." असें म्हणून तो पुन्हा जागेवर येऊन बसला. दादाच्या हळुवार मनाला हा लहानसा प्रसंग जरा जाणवलेला दिसला.

तो म्हणतो, " घरीं गार पाणी असतं तर दिलं असतं रे."

मीं त्याला वरच्यावर उडवून लावलें.

" गार पाणी नकोच आहे. थोड्या वेळानें गरम चहा दिलास म्हणजे झालं. हे विश्वनाथराव काय करतात ?"

दादा जरा उल्हसित वृत्तीनें म्हणाला, " विसूची मेकॅनिक नि इलेक्ट्रिकची परीक्षा झालीय् नुकतीच. इकडच्या भागांत त्याच्यासारखा यंत्रज्ञ सापडायचा नाहीं. कुणी शोधायचाही नाहीं बाकी. माझा अगदीं जानी दोस्त बरं का ? पत्रांतून लिहीत असेंच मी. घारूअण्णा सध्यां घोडिवऱ्याला आहेत. ते आमच्या कंपूचे महर्षि. कंपूवरून आठवण झाली. पंपू अजून आफ्रिकेंतच आहे, बरं का ?"

" बरं." मीं रुमाल काढून घाम पुसला.

" आमच्या कंपूंत आतां तुझी भर पडायची. तूंही चक्रमपूरकर झालास. तेव्हां आपपरभाव ठेवूं नकोस. आपला हा दोस्त विश्वनाथराव नाहीं, विसू आहे, समजलास ?"

विसू रोडेनें एक विचित्र विनयशील हास्य केलें: " नमस्ते कृष्णराव."

" किशीं टु यू..." मीही तितक्याच विनयानें हसलों, " पण...पण...हें काय प्रकरण आहे ? मीही चक्रमपूरकर झालों ? "

" उद्यांपासून !...अर्थात् तुला आजच्च जॉइन व्हायचं नसेल तर... "

" आज ?...आज आधीं मला निखळलेले मणके जॉइन करायचे आहेत. पण दादा, तूं म्हणतोस काय ? "

" जें शुद्ध बाळबोधींत बोललों तेंच. तूं ज्या कामासाठीं आलास तें फत्ते झालंय्. मुलाखत नको नि त्याला खत नको. अगोदरच पीक उगवलं. पगार स्केल सारं मीं म्हटलं तस्सं. शिवाय पेन्शनेबल....बॉसही चांगला आहे..."

" थँक्स्..." मी गहिंवरलों.

माझे आभार धुतकारीत दादा म्हणाला, " ऑफिसही चांगलं आहे. चक्रमपूरच्या मैदानाचा व्ह्यू दिसतो खिडकींतनं. "

विसू रोडे दूर कुठें तरी पाहात म्हणाला, " कामाचा कंटाळा आला, कीं टाक चावीत खिडकीशीं बसा. क्षिप्रेच्या कांठचं तें शांत मैदान नव्याण्णव हिरव्यांनीं फुललेलं असेल. कधीं क्रिकेटचे षट्कार तर कधीं सायकलीचा विक्रम..."

बोलतां बोलतां विसू रोडे थबकला. माझ्यांत झालेल्या आकस्मिक फेरबदलाचा त्याला साक्षात्कार झाला असावा. इतका वेळ आमच्या प्रेमप्रदर्शनांत आणि कामाच्या नि बिनकामाच्या गोष्टींत आम्ही इतके दंग झालों होतों, कीं आज भोगलेल्या यातनांचा मला थोडा वेळ विसरच पडला होता. आतां एकाएकीं ती जखम पुन्हा दुखूं लागली. मोठ्या मिन्नतवारीनें मीं माझा दुःखावेग आवरला आणि शक्य तेवढ्या धिम्या सुरांत माझ्या हालअपेष्टांचा पाढा दादा लष्टेपुढें संगतवार वाचला.

दादाच्या वाटोळ्या चेहऱ्यावर प्रश्नार्थक रेखा उमटल्या. एका हातानें त्यानें आपली हनुवटी पकडून धरली आणि त्यामुळें वर सरकलेल्या त्याच्या गालांच्या वळ्यांनीं त्याचे संकुचित बनलेले डोळे पारच दिसेनासे झाले.

" हा कांहीं तरी घोटाळा दिसतो." त्यानें आतांपर्यंत जगजाहीर झालेली गोष्ट आपल्या शब्दांत सांगितली, " तुला ते विक्रमपट्टु कां समजले हरि जाणे! पण एवढं खरं कीं कावळ्याला मिळायचा बराच मान तुझ्या चिमण्या जिवाला मिळाला. तुला मोटारीनें फुकटांत यायला मिळालं. वाईटांतून चांगलं निघतं तें असं!"

" फुकटांत ?"

" अर्थात्....म्हणजे तूं...अरे वेड्या, एवढ्या थोर विक्रमवाल्याला मिरवीत आणायचं तें पायीं पायीं आणतील होय ? मोटार आधींच एंगेज केलेली होती त्यांनीं. पैसेच दिले होते आगाऊ. मला सगळं ठाऊक आहे."

माझ्या डोळ्यांपुढें कांहीं तरी चमकूं लागलें. काजवे नसतील, मोटरचा प्लग कीं काय म्हणतात त्याचे स्पार्क कीं काय ते असतील. मेकॅनिक विसूच जाणे!

शेवटीं एकच गोष्ट राहिली. आणि तिचा छडा लावण्यासाठीं मी त्याच दिवशीं संध्याकाळीं ' आरोळी ' ऑफिसांत गेलों. संपादकमहाशय ओळखीचे, तेव्हां भेटायला उशीर लागला नाहीं.

मीं एकदम मुद्द्यालाच हात घातला आणि माझ्या छळाची सविस्तर हकीगत प्रथम सांगितली. संपादकांना त्यामुळें जें हसूं कोसळलें तें कांहीं केल्या आवरेचना. मग त्यांनीं माझी क्रुद्ध मुद्रा पाहून चेहरा एकदम गंभीर केला.

' आरोळी 'चा अंक शांतपणें हातांत घेऊन संपादकांनीं पुन्हा खालीं ठेवला

आणि दिलगिरी दाखवीत ते म्हणाले, "काय करणार हो ? गडबडींत होतं पुष्कळदा असं ! त्यांतून आमचे ब्लॉकचे लोक म्हणजे काय ठोकळे आहेत एक एक ! हीः हीः हीः ..."

मुठी वळून आणि दांत ओठ चावीत मीं रागीट स्वरांत म्हणालों, "पण चूक झालीच कशी ?"

"अहो, कशी झाली नि काय ?...चुकून कावळ्याचा ब्लॉक पडायचा तो चिमण्याचा पडला एवढंच !...(एकदम रागावून) तुम्हीं तरी असे कसे हो ? कविता करा, पण चिमणा नांव कशाला तें ? दुसरीं टोपणनांवं काय थोडीं पडलीं आहेत ?...(स्वर मंदावून) कदाचित् असं झालं असेल. ब्लॉक सापडत नाहीं म्हणून तुमचा घातला असेल ! नाहीं तरी लेखकांचे स्टॅंडिंग ब्लॉक्स आहेतच आमच्याकडे. बरं, मला तरी कुठें कल्पना, कीं कधीं नव्हे तो ह्याच वेळीं ब्लॉक स्वच्छ उमटेल आणि कावळा-चिमणीचं एवढं मोठं रामायण होईल ? हीः हीः हीः !"

माझ्या तळपायांची आग मस्तकाला जाऊन पोचली. ह्या गृहस्थाला खाऊं का गिळूं असें मला झालें होतें. पण करणार काय ? जास्त तमाशा करण्यानें माझीच फजिती होणार होती ! तेव्हां राग गिळला.

"बरं मिस्टर..." संपादक हलकेच पुढें म्हणाले, "आतां रागावूं नका बुवा असे. उद्यांच्या अंकांत खऱ्या कावळेचा फोटो छापणार आहें. दुरुस्तीही देतों आहें. हें पाहा, प्रूफ आलंच.—हा तो कावळे बरं का ?—ज्याचा मान तुम्हीं आज हिरावून घेतलात नि दैनिकाच्या स्तंभांतून फुकटचे प्रगट झालांत ! आज आला असेल हा रेकॉर्डब्रेकर चक्रमपूरला. पाठवणार होतों कुणाला तरी त्याच्याकडे, पण जमलंच नाहीं."

मीं विमनस्कपणें तें प्रूफ पाहिलें आणि एकदम चमकलों. कावळेचा चेहरा ओळखीचा वाटला, नुकताच पाहिल्यासारखा वाटला.

हं, बरोबर ! तीं झुलपें, तें बसकें नाक, तो खरबुजी चेहरा—

मी ऑफिसबाहेर पडत होतों तेवढ्यांत संपादकमहाशयांची आरोळी मला ऐकूं आली :

“ कांहो, अगदीं निघालांतच !...थोडा पानी कम सिंगल पण घेत नाहीं !”

# विक्रम कसा फिसकटला

पौर्णिमेचें शुभ्र चांदणें पडलें होतें. बाळाला घेऊन वहिनी अद्याप माहेराहून आलेल्या नसल्यामुळें दादासकट आम्ही सर्व ढमळाकाकूंच्या खाणावळींतलें 'सुग्रास' अन्न भरपूर जेवून नुकतेच बाहेर पडलों होतों. आतां मैदानावर जाऊं या, म्हणजे चांगला सुंदर 'वॉक' ही होईल आणि शिवाय पायगुडे ह्यांचा सायकल-विक्रमही पाहाण्यास मिळेल, अशी मीं सूचना केली. तिला विसू रोडे, दादा लड्डे नि घारूअण्णा ह्यांनीं अनुमोदन दिल्यावर आम्ही चौघे त्या दिशेकडे वळलों.

इतक्यांत विसू बारीक डोळ्यांनीं माझ्याकडे पाहात म्हणाला, "पण किशा, ज्या गोष्टीमुळें तुझ्या आंगाला इतकी झळ पोचली, तिच्यांत तुला इतकं इंटरेस्ट..."

मी मध्येंच खालचा ओठ दांतांनीं दाबून उत्तरलों, "झळ पोचली म्हणूनच माझं इंटरेस्ट चक्रवाढीनें भडकत गेलं आहे. पाहूं तरी हा विक्रम विक्रम म्हणजे काय चीज आहे ती ?"

विसूनें विचारलें, "पण विक्रम नक्की चालू आहे ना ?"

"म्हणजे ?" मीं अचंबून म्हटलें, "तुला शंका वाटते कीं काय? दोन दिवस झाले, सबंध चक्रमपूर क्षिप्रेच्या मैदानावर लोटतं आहे, 'आरोळीं'त हेडलाइनच्या बातम्या येताहेत...."

"तें खरं रे !" विसू ओशाळून म्हणाला, "पण मला आपलं वाटलं पायगुडे उतरला असेल खालीं. कालच पडायला आला होता."

"अंः !" दादा लड्डेनें उद्गार काढला. "तुम्हांला तसं" वाटलं एवढंच.

पण बेट्याचा स्टॅमिना मोठा जबरा आहे बरं का ! ”

“ तर तर…” विसू आपली चूक सुधारण्याच्या हेतूनें म्हणाला, “ काल तरी काय, सायकलनें अगदीं ॲक्यूट ॲंगल् केलान् तरी पडला नाहीं. ”

“ खरी मजा उद्यां येईल. ” दादानें गंभीर चेहेरा करून सांगितलें, “ घारूअण्णा, तुम्ही राहा ना एक दोन दिवस. एवढा विक्रम पुरा होऊं द्या. ”

घारूअण्णा हे कोंकणपट्टींतील घोडिवरें गांवचे राहाणारे. घोडिवऱ्याच्या मराठी शाळेचे ते हेडमास्तर होते. कांहीं ‘ कोडता ’च्या कामासाठीं ते कालच चक्रमपूरला आलेले असून उद्यां परत जाणार होते. दादा लठ्ठची सूचना ऐकतांच त्यांनीं तावातावानें म्हटलें, “ चुलींत गेला तुमचा विक्रम ! असल्या विक्रमा–फिक्रमासाठीं मी शाळा बुडवूं लागलों तर हाताखालचे मास्तर माझा काय बोज ठेवतील ? परवांच एकाला मीं रजा नाकारली. ”

घारूअण्णांच्या वक्तृत्वाचा धबधबा एकदा सुरू झाला कीं ऐकणाराचा पार चेंदामेंदा व्हायचा. ते नेहमीं डोक्यांत राख घालून किंवा तुच्छतेनें बोलायचे. आपली एकुलती एक कन्या किशी हिचा संबंध आला म्हणजेच तेवढी त्यांची जिव्हा गौरवपर उद्गार काढायची. ( ह्या ठिकाणीं हेंही सांगितलें पाहिजे, कीं ह्या विषयावर गौरवपर उद्गार काढणारी ती एकुलती एक जिव्हा होती. )

आज अण्णा विक्रम पाहायला येत होते म्हणजे काय, केवळ आम्हां ‘ पोरां ’च्या आग्रहासाठींच. घारूअण्णा आपल्या शाळेच्या कामाविषयीं फार जागरूक असत आणि बोलतांना सतरांदा आपल्या हाताखालच्या मास्तरांचा उद्धार करीत. एकदा तर ‘ दिपोटी ’लाही हाताखालचा म्हणून त्यांनीं जीभ चावली होती.

“ कुणाला रजा नाकारलीत अण्णा ? ” मीं सहज विचारलें.

“ तुला रे काय माहीत माझ्या हाताखालचे सारे मास्तर ! आहे असाच एक पोळ नांवाचा ! बाकी तुला हा माहीत असेल म्हणा ! ” असें म्हणून, कां कोणास ठाऊक, अण्णांनीं किंचित् स्मित केलें.

आणि मग एकाएकीं माझी आठवण जागृत झाली.

“ पांडुरंग पोळ !—तुमच्या किशीला मागणी घालणारा ! ” मीं एकदम विचारलें. आणि आमचें बोलणें ऐकून विसू रोडे म्हणतो, “ **किशीला** मागणी घातलीन् त्यानें ! ” विसूचा स्वर असें सुचवीत होता, ‘ विहिरींत उडी घेतलीन् त्यानें ? ”

घारूअण्णा मात्र ताडदिशीं म्हणाले, “ तो लाख वेळां घालील मागणी ; पण मी थोडाच असा हाताखालच्याला मुलगी देणार आहें ! मीं त्याला साफ सांगितलं, कांहीं तरी पराक्रम कर नि मग माग माझं रत्न ... हो, उगाच माकडाच्या हातीं ...”

“ कोलीत दिल्यासारखं नको व्हायला ! ” दादा लट्ठेनें म्हण पुरी केली. पण ती चुकली असावी. कारण, अण्णा त्याच्याकडे डोळे तांबारून पाहात होते.

“ मग पांडुरंग पोळ काय म्हणाला, अण्णा ? ” मीं त्यांचा राग विसरवण्यासाठीं कांहीं तरी विचारलें.

“ म्हणणार काय त्याचं बोडकं ? ” अण्णा उत्तरले. “ मारे नाटकांतल्या-सारखा खर्ज्या स्वर काढून सांगितलन् ...‘ ठीक आहे अण्णा ! कांहीं तरी जगावेगळं करीन नि मगच कृष्णेला मागणी घालीन. ’ तोंड पाहा जगावेगळं करणाराचं ! स्वतःच जगावेगळा व्हायचा एखाद वेळेला ! सदा तर ध्यान आजारी असतं नि डॉक्टरचं सर्तिफिकिट दाखवून तर रजा मिळवलीन् लेकाच्यानें ! ”

इतकें बोलत बोलत आम्हीं कोपऱ्याला वळसा घातला, तोंच लोकांची प्रचंड गर्दी दिसली आणि एकच कोलाहल ऐकूं आला. अर्थात् ही सगळी गर्दी सायकल–विक्रम पाहाण्यासाठींच लोटली होती. आम्ही देखील त्याच गोंधळांत मिसळलों आणि वाहात वाहात मैदानावर जाऊन पोंचलों. वाटेंत घारूअण्णांचें उपरणें कोणीं तरी हिसकल्यामुळें मागें राहिलें. अण्णांनीं आणि मीं जेव्हां दुसरें टोक धरून जोरानें मागें खेचलें तेव्हां तें परत मिळालें. त्याच उपरण्याबरोबर एक चपलांचा जोड, एक फुटाण्याचें पुडकें आणि एका बाईचें तान्हें मूल इतक्या जिन्नसा आल्या. चपला आणि मूल साभार परत करून अण्णांनीं फुटाणे तोंडांत टाकले.

क्षिप्रा नदीच्या कांठचें तें प्रचंड मैदान खरोखरीच मुलांमाणसांनीं नुसतें गजबजून गेलें होतें. इतकेंच नव्हे तर, मैदानाच्या पार्श्वभागीं टाकलेली ती क्षिप्रा कॉलेजची भव्य इमारत देखील छिद्राछिद्रांतून मानवी मस्तक दाखवीत होती. मला तर ही सगळी गर्दी पाहून निर्मळच्या जत्रेची आठवण झाली. पण तसें मी बोललों असतों तर सर्वांनीं मला पोरकट म्हटलें असतें.

ह्या वाहात्या लोकगंगेंत हात धुऊन घेण्यासाठीं भेळवाले, काबलीवाले, जाहिरातवाले, काकडीवाले आणि खिसेकापू हेही जमलेले दिसत होते. ह्यांतले शेवटले न दिसण्याचा प्रयत्न करीत होते; पण माझ्या मनश्चक्षूंना दिसल्याशिवाय ते राहिले नाहींत. लेकुरवाळ्या बायका गृहरत्नें कडोसरीला खोचून आल्या होत्या. कांहीं भालाकारपंथी स्त्रियांनीं आपल्या रत्नांना बाबागाडींत घालून आणलें होतें. पण त्यामुळें त्यांना गाडीजवळ उभें राहावें लागून विक्रम पाहाण्यास मुकावें लागलें होतें. बिचाऱ्या मधून मधून उंच उंच माना करून पाहायच्या, पण तेवढ्यांत गाडींतलें पोर केकाटलें कीं तिकडे लक्ष द्यायच्या. बऱ्याच पोक्तवयीन सोवळ्या बायका कीर्तनाला ‘दांडी’ मारून विक्रम पाहाण्यास आल्या होत्या. म्हातारे कोतारे काठी टेकीत आले होते. तरुण मंडळी ब्लेझर घालून वा शेपटे सोडून आली होती; आणि छोट्या मुलांची पिल्लावळ वाटेल तशी आली होती! शाळेंतल्या विद्यार्थ्यांचा उत्साह दुथडी वाहात होता आणि कॉलेज-विद्यार्थ्यांची टिंगलबाजी उताला चालली होती. एकंदरींत त्या रात्रीं क्षिप्रा

मैदानावर त्या शुभ्र चंद्रप्रकाशांत दहा हजार तरी माणूस जमला होता. शिवाय 'शेठ' लोकांच्या गाडीचे घोडे मधून मधून खिंकाळत असून पेन्शनरांचे कुत्रे भुंकत होते.

आणि ह्या सर्व उलाढालीचें मूळ पांडोबा पायगुडे हे त्यांच्यासाठीं राखून ठेवलेल्या खास रंगणांत संथपणें सायकल मारीत होते. अर्थात् ते सुद्धा आम्हांला कितीतरी प्रयासानंतरच दिसले! बरेच राउंड फिरून आल्यानंतर देखील प्रेक्षकांच्या छोट्या मोठ्या डोक्यांखेरीज जेव्हां आम्हांला कांहींच दिसेना, तेव्हां दादा लठ्ठेचा राग त्याला आवरेनासा झाला आणि त्यानें एकदम नेटाचा प्रयत्न करून फळी फोडली. दुसऱ्याच क्षणीं बरींचशीं मुलें खालीं कोसळलीं, दोन तीन म्हातारे हृदयावर हात ठेवून बाहेर आले (आणि नंतर तडक घराकडे गेले) आणि बाकीच्यांनीं आपण होऊन वाट करून दिली. शेवटीं जेव्हां दादा लठ्ठेचें विशाल शरीर रंगणाभोवतीं लावलेल्या दोरीपाशीं गेलेलें दिसलें, तेव्हां आमच्या जिवांत जीव आला आणि मी नि विसू रोडे ताबडतोब दादाच्या दोन्ही बाजूंस जाऊन उभे राहिलों. घारूअण्णा मात्र निर्विकार मुद्रेनें नाकांत तपकीर कोंबीत, मोकळ्या झालेल्या जागेंत येरझारा घालूं लागले. विक्रमाच्या यात्रेला मुद्दाम येऊन विक्रम करणारा तर आपल्या खिसगणतींत नाहीं असें अण्णा बुद्धयाच दाखवीत होते. त्यामुळें त्यांच्या औद्धत्याकडे बरेच जण विस्मयचकित होऊन पाहात होते.

"ओ हो हो! काय वेगानें हाणतो आहे रे! कुणाला वाटेल तरी का आत्तांपर्यंत छप्पन तास झाले म्हणून!" हे उद्गार ऐकून घारूअण्णांवरची नजर मीं चटकन् रंगणाकडे वळवली. कारण अण्णा केव्हांही पाहायला मिळाले असते, पण विक्रमकाराला पाहायची संधी साठीसामासीं एखाद वेळेसच मिळायची. (ही माझी समजूत किती चुकीची होती हें पुढें मला कळून आलें. कारण सायकल रेकॉर्ड करणारे स्वार गल्लोगल्लीं खंडोगणती सापडूं लागले; तर उलट माझ्याजवळून दंडाची रक्कम म्हणून पन्नास रुपये उसने घेऊन घारूअण्णा जे घोडिवऱ्याला गेले त्यांनीं पुन्हा कितीक दिवसांत तोंड दाखवलें नाहीं!)

" वेगानें चालवतोय् म्हणतोस ? " मीं आश्चर्यानें रंगणाकडे पाहिलें, तों खरोखरीच एक तरुण सायकलवर बसून मारे जोरजोरानें पेडल मारीत चाललेला दिसला.

दादा लद्दे विजयी मुद्रेनें म्हणाला, " सांगितलं नाहीं तुला, स्टॅमिना दांडगा आहे म्हणून ? थोडा तरी दमलेला दिसतो आहे का बेटा ? "

इतक्यांत पलीकडे उभ्या असलेल्या ग्रूपमध्यें आम्हांला अनाहूत माहिती मिळाली : " अहो, ते कांहीं पायगुडे नाहींत बरं का मिस्टर ! ते नुसतीच हाणताहेत ! "

" पिलॉट सायकल आहे ती ! " एका छोट्या विद्यार्थ्यानें सांगितलें. आणि लगेच त्याचा मोठा भाऊ खुलाशादाखल म्हणाला, " पायलॉट सायकल. "

पायलटगाडी मोठ्या डौलानें निघून गेल्यानंतर चार सायकलींची एक आघाडीची फलटण आली. ह्या फलटणींतल्या एका स्वारानें तांबडा ब्लेझर, खाकी विजार नि टेनिसचे बूट ; दुसऱ्यानें नुसताच सदरा नि धोतर ; तिसऱ्यानें जोडे, पायजमा, हॅट नि गंजिफ्रॉक आणि चवथ्यानें काळा कोट, धोतर नि चपला धारण केल्या असून डोक्याचा गोटा केलेला होता. हे चौघे विविधरंगी वीर आमच्याजवळून जातांना प्रत्येकाकडे ऐटींत नजर टाकीत होते. त्यामुळें कांहीं मूर्ख प्रेक्षकांची फसगत होऊन ह्यांतला पायगुडे कोणता म्हणून कांहीं जणांनीं व्यर्थ पुन्हा डोकीं खाजवलीं. इतक्यांत हें टोळकें निघून जाऊन शेवटचा ग्रूप आमच्याजवळ येऊन ठेपला. तत्क्षणीं " शूः शूः ! गप्प बसा...त्यांना त्रास होईल ! " असे आवाज निघूं लागले.

विसू रोडे हलक्या आवाजांत शेजारच्या गृहस्थांच्या कानांत म्हणाला, " ह्यांतले पायगुडे कोणते हो ? "

" ते मधले !...हिरवा कोट नि निळी विजार. "

मंत्रमुग्ध नागाप्रमाणें प्रत्येक प्रेक्षक पायगुडे ह्यांचा सायकल-विक्रम पाहूं लागला. पायगुडे अगदीं शांतपणें पेडल फिरवीत होते आणि मधूनमधून हास्यमुखानें आपल्या भगतगणांकडे दृष्टि वळवीत होते. पायांना त्यांनीं पट्टीस गुंडाळली होती आणि डोक्याभोवतीं लोकरीचा रुमाल बांधला होता. त्यांच्या प्रत्येक बाजूस दोन दोन सायकलस्वार शरीरसंरक्षक म्हणून चालले होते. त्यांनीं डोळ्यांत तेल घालून पायगुडे ह्यांच्यावर नजर ठेवली होती आणि प्रेक्षक आपल्या गांवचेही नाहींत असें समजून त्यांच्याकडे दुर्लक्ष ठेवलें होतें.

पायगुडे ह्यांचे डोळे खोल गेले होते. तें पाहून एकजण म्हणाला देखील, "अजून किती दम काढीलसं वाटतं रे हा ?"

"डोळ्यांवर जाऊं नकोस त्याच्या. आणखी दीड दिवस गाडी फिरवण्याची त्याची उमेद आहे."

"उमेद पुष्कळ असेल रे..." दुसऱ्यानें निष्काळजी स्वरांत म्हटलें. त्याबरोबर पहिल्याचें पित्त खवळलें आणि तो ओरडला, "तर मग तुला काय वाटतं, तुझ्या धायगुडेसारखा मध्येंच प्रयत्न सोडील होय हा ?"

ही भाषा ऐकून एक भरीव छातीचा तालीमबाज मराठा मुठी उगारून पुढें आला. "अबे ए, धायगुडेचं नांव काढूं नको उगाच इथें ! धायगुड्याच्या पायाची सर येईल का ह्या पायगुड्याला ?"

धायगुड्याचा आक्षेपक बिचारा भीत भीत पुटपुटला, "पण धायगुड्यांनीं तर कालच पाय टेकलेत ना ?"

"ट्येकलेत ते सरळ पिर्मानिकपनांत तरी ट्येकले. तुझ्या ह्या पायगुड्यावानी नाय क्येलं त्यानें ! काय म्हणे कपडे बदलायला क्वापऱ्यांत जातो नि अलगद पाय ट्येकतो भुईवर. मी काय जानूनशान् नाय व्हयू !"

हरे राम! मंदिरांत देवाविषयीं अनुदार उद्गार काढावेत तसे त्या पहिलवानानें त्या ठिकाणीं हे विलक्षण जहरी आरोप उच्चारून दाखवतांच सर्वत्र वीज कडाडल्यासारखी झाली. त्या मराठा वीरावर कित्येक प्रेक्षक तुटून पडले आणि एकच गोंधळ व मारामारी सुरू झाली. त्यांतच "शांत व्हा! शांत व्हा!" करीत धावून आलेल्या स्वयंसेवकांची भर पडल्यामुळें जो गोंगाट झाला तो विचारूंच नका. शेवटीं मोठ्या मुष्किलीनें त्या तालीमबाज तरुणाला बरळल्या स्थितींत ॲम्ब्युलन्स गाडींत घालून इस्पितळाकडे नेण्यांत आलें, तेव्हां मैदानावर पुन्हा शांतता पसरली. पायगुडे ह्यांचे उरलेसुरले मूठभर अनुयायी तेव्हांच नेस्तनाबूद होऊन निघून गेले.

वातावरण निवळल्यावर आम्ही पुन्हा पायगुडे ह्यांच्या विक्रम-वर्तुळाकडे दृष्टि वळवली.

"शांतचित्त म्हणावं तर ह्याला." दादा लट्ठे कौतुकपूर्ण स्वरांत म्हणाला.

"इतकी लट्ठालट्ठी झाली पण पायगुड्याचं पेडल आपलं चालूच आहे!"

घारूअण्णांनीं हाशूहुश् करीत आपली शतपावली पुन्हा सुरू केली होती. दादाचें वाक्य ऐकून मध्येंच थांबून ते म्हणाले, "जितक्या जोरांत त्याच्या पायगाडीचं चक्र फिरतं आहे तितक्याच जोरांत त्याचा मेंदूही उलटा फिरत असला पाहिजे. चक्रम् भ्रमति मस्तके!"

इतक्यांत पलीकडच्या बाजूस गेलेली पायगुड्यांची सायकल पुन्हा आमच्याकडे वळलेली पाहातांच अण्णांनीं तीव्र तिरस्कारानें रंगणाकडे पाठ वळवली आणि ते नाकांत तपकीर कोंबूं लागले.

पायगुडे ह्यांचे डोळे आतां पूर्वीपेक्षांही खोल गेले होते आणि त्यांच्या थोडथोड्या झुकांड्याही जात होत्या. तें पाहून मीं दादाला विचारलें, "काय रे, लक्षण ठीक नाहीं, नव्हे का?"

“ चूप बस ! तुझ्यासारखे अवलक्षणी प्रेक्षक जमल्यावर ह्यापेक्षां काय चांगलं लक्षण दिसणार ! ”

“ म्हणजे ? ” मीं रागावून म्हणालों, “ मी काय घोडं मारलं रे त्याचं ?... नि तूं भजन कसलं करतो आहेस ? ”

“ भजन ? ” दादा अधिकच जोरांत टाळ्या वाजवीत म्हणाला, “ होय, एक प्रकारें हें भजनच आहे. पायगुडे ह्यांच्या पराक्रमांत त्यांना यश मिळावं म्हणून मीं हें भजन चालवलं आहे म्हटलंस तरी चालेल. पण शिवाय...”

“ शिवाय काय ? ”

“ शिवाय टाळ्यांचा दुसरा उद्देश म्हणजे पायगुडेला उत्तेजन द्यायचं. नि तिसरा उद्देश...”

“ चालूं दे. ” मी आणि विसू रोडे त्याच्या भजनांत एकदमच सामील होत म्हणालों.

“ तिसरा उद्देश म्हणजे ह्या वेळीं आरडून ओरडून, टाळ्या वाजवून, नाना प्रकारचे आवाज करून पायगुडेला सावध ठेवणं हें आपलं कर्तव्य आहे. लोकहो, तुम्हांला दिसत नाहीं का, त्या वीराची काय स्थिति झाली आहे ती ? त्याच्या डोळ्यांभोवतीं उठलेलीं काळीं वर्तुळं, त्याचे लटलटायला लागलेले पाय नि त्याच्या झुकांड्या, ह्या सगळ्यांचा अर्थ काय ? तर लोकहो, पायगुडे पेंगताहेत, पायगुडे झोपताहेत, पायगुडे निजताहेत ! निद्रादेवीनें त्यांच्यावर टाकलेला हा मायापाश तोडून टाकायचा असेल, तर त्यांना जागं ठेवलं पाहिजे ! त्यांना निजूं देतां नये ! वाजवा, टाळ्या वाजवा ! बोला, पायगुडे की जय ! ”

दादा लड्ढे आपले तीन उद्देश प्रथम मला आणि विसूलाच सांगत होता. पण क्रमाक्रमानें त्याचा स्वर चढत गेला. मला वाटतें, परमेश्वराकडून

त्याला एकाएकीं अंतस्फूर्ति झाली असावी. जेव्हां जेव्हां लोक कर्तव्यच्युत होतात, तेव्हां तेव्हां अशींच दादासारखीं माणसें अवतार घेऊन येत असतात. दादा लष्ठेला अकस्मात् दिव्य संदेश झाला आणि तो दिव्य संदेश गंगेच्या ओघाप्रमाणें त्याच्या मुखांतून अविरत वाहूं लागला. प्रेक्षकांवर किंवा श्रोत्यांवर त्याचा परिणाम झाल्याशिवाय कसा राहील? हळुहळू दादाची भजनी मंडळी वाहूं लागली. टाळ्यांचा आवाज ठेक्यांत सुरू होऊन 'विठूचा गजर हरिनामाचा' आसमंतांत पसरून गेला. 'पायगुडे की जय!' अशी आरोळी गगनाला भेदून गेली.

ह्यांतच भर म्हणून किंवा दादानें आपल्या संदेशाच्या शेवटीं 'वाजवा रे वाजवा!' अशी जी घोषणा केली होती तिचें परिपालन म्हणून, एक बालवीरांचा ताफा 'डावा उजवा' करीत रंगणाच्या मध्यभागीं येऊन उभा राहिला. मुख्य बालवीरानें हातांतली तुतारी मोठ्या टेचांत वर करून 'रणशिंग' फुंकले. त्याच्या 'तुतारी'ला लोकांकडून 'हियर...हियर!'च्या रूपानें जो तावडतोब अनुकूल अभिप्राय मिळाला तो पाहून केशवसुतांना वाटलें असतें: मला जी एक तुतारी हवी होती ती हीच...हीच!

मुख्यानें 'सूत उवाच' करतांच त्याच्या सर्व अनुयायांनीं एकसुरानें बँडवादन सुरू केलें. ढोल, ताशे, बिगुल ह्यांचा एकच हैदोस उडाला. त्यांतच एका नर्म संगीताच्या भोक्त्यानें ग्रामोफोन उघडून त्यावर पोवाड्याची प्लेट लावली. (ती 'लव्ह-परेड'ची होती असें मला पुढें कळलें.) इतकें 'म्यूझिक' सुरू झाल्यावर आणि इतकें प्रोत्साहन मिळाल्यावर पायगुड्यांची डुलकी पार पळून गेली ह्यांत नवल नाहीं. (ते दचकून खालीं पडले नाहींत हेंच नवल!) मला वाटतें, कुंभकर्णाला युद्धासाठीं उठवतांना देखील असुरगायकांनीं इतका शंखध्वनि केला नसेल!

पायगुडे ह्यांची सायकल पुन्हा जेव्हां आमच्या समोरून गेली, तेव्हां तिचीं चाकें पुष्कळच वेगांत फिरत होतीं; आणि खुद्द पायगुडे सुद्धा ताजेतवाने दिसत होते. इतकेंच नव्हे तर प्रेक्षकगणांकडे पाहून त्यांनीं आपला घामानें

चिंब झालेला रुमाल फडफडावला आणि स्मिताची एक लकेर गिरकावली. तें पाहून दादा लट्ठेला धन्य धन्य झालें. आमचा आनंद गगनांत मावेना म्हणून आम्ही ' स्प्लेंडिड् पायगुडे, बक्क् अप् पायगुडे ! ' च्या रूपानें तो अस्मानाची कोंडी फोडून वर फेकला. आणि त्याचे प्रतिध्वनि जेव्हां चहूंकडून निघूं लागले तेव्हां आम्हांला तेंच अस्मान ठेंगणें झालें. कांहीं बायकांनीं कडाकडा बोटें मोडलीं आणि नंतर आपल्या तान्हुल्यांना ' उगी उगी ' म्हटलें. दोन बायकांकडे माझें विशेष लक्ष होतें. ( साधारण म्हाताऱ्याच होत्या त्या. ) त्यांची एक गंमत इथें सांगण्यासारखी आहे.

**पहिली :** बाई बाई ग ! रेकाड मोडणारच बरं का हा सगुणाकाकू.

**दुसरी :** [ आपल्या तान्हुल्याला हलक्या हातांनीं बाबागाडींतून उचलून]...!

**पहिली :** तो बाळू सांगत होता, कीं एकुणसत्तर तास झाले कीं थांबणार ह्याचा रेकाड. म्हणजे किती तेरा तास राहिले ना हो सगुणाकाकू ?

**दुसरी :** [ बाळाकडे भयचकित दृष्टीनें पाहात ]...!

**पहिली :** [ अभिमानानें ] आपण टाळ्या वाजवल्या ना सगुणाकाकू, म्हणून एवढं अवसान आलं हो त्याला. बाकी असं काय मोठं केलं आपण म्हणा ! भजनाला जाऊन टाळ्या वाजवायच्या त्या इथें वाजवल्या एवढंच.... पण तो काय करतो आहे हो तिकडे एका बाजूला जाऊन ?

**दुसरी :** ...?!

**पहिली** [ शेजारच्या मुलाला ]...असं म्हणतोस ? कितव्यांदा रे बदलले ? बरं का सगुणाकाकू, त्यानें म्हणे कपडे बदललेन् तिकडे जाऊन. पाहा ना, आतां निळी चड्डी जाऊन धोतर आलं !

**दुसरी :** [ चिडून ] तुम्हीं गप्प बसा ना मावशी ! इथें माझ्या पलूचे कपडे बदलायचेत् त्याची काय वाट ? पलूनें केलाय् बसल्या बसल्या विक्रम !

हा डबल विक्रम चालू असतांना मध्येंच एकाएकीं बँडवादन थांबलें आणि एक किडकिडीत उंच गृहस्थ हातांत भला मोठा कर्णा घेऊन मध्यभागीं गॅसच्या बत्तीखालीं जाऊन उभा राहिला. नंतर कर्णा तोंडाला लावून त्यानें दणदणीत आवाजांत गर्जना केली,

" शांत व्हा ! शांत व्हा ! श्रीयुत पायगुडे ह्यांचे आतांपर्यंत सत्तावन तास पुरे झाले असून जगाचं रेकॉर्ड मोडायला त्यांना आतां फक्त बारा तास बाकी आहेत ; नि तेवढे तास आपण सायकल फिरवूं अशी त्यांना उमेद आहे. [ टाळ्या ] ह्यासाठीं आपण आतांपर्यंत त्यांना जें प्रोत्साहन दिलंत तेंच ह्यापुढेंही देत चला ! कळावं, लोभ असावा..." असें म्हणून त्यांनीं आपला कर्णा खालीं ठेवला.

व्यवस्थापकांच्या ह्या खास विनंतीला मान मिळाल्याशिवाय कसा राहील ? त्यांचें ' भाषण ' पुरें होतें न होतें तोंच सर्व बाजूंनीं बॉम्बगोळ्याप्रमाणें ' बक् अप् पायगुडे !' ' स्टेडी पायगुडे !' ' स्प्लेंडिड पायगुडे !' असे ध्वनि निघूं लागले. मराठी शाळा नुकतीच मागें टाकलेले कांहीं विद्यार्थी 'भक अप् पायगुडे !' ' चक अप् पायगुडे !' ' बघ बघ पायगुडे !' अशा नाना तऱ्हेनें उत्तेजन देऊं लागले ; आणि तें पाहून कांहीं टिंगलबाजांनीं ' बस् कर पायगुडे ! ' असेंही ओरडण्यास कमी केलें नाहीं. एक टीचभर उंचीचें व्रात्य पोर आपले दोन्ही गाल दोन हातांत धरून बेंबीच्या देठापासून नुसतेंच ओरडत सुटलें होतें. मीं त्याला " कां रे उगीच ओरडतोस ?" असें म्हणून डोळे वटारले; तेव्हां उलट " हें हो काय ? मी पोत्सान देतों. " असें म्हणून त्यानें दुप्पट जोरानें किंचाळी फोडली. त्याचे पितर स्वर्गाब्रिगेंत कोठें असते तर खात्रीनें त्याचा कान उपटायला त्या वेळीं खालीं आले असते !



" तुम्ही गप्प बसा ना मावशी, इथें पळूनें केलाय् बसल्या बसल्या विक्रम !"  [ पृष्ठ

परंतु सर्वांत आश्चर्याची गोष्ट म्हणजे आमच्या घारूअण्णांवरही ह्या सगळ्या आरडाओरडीचा परिणाम झाला असावा. कारण, त्यांनीं आपल्या येरझारा थांबवल्या असून माझ्या व विसूच्या खांद्यावर हात ठेवून ते डोळे विस्फारून रंगणाकडे पाहात होते. त्यांनीं माझ्या खांद्यावरचा हात इतक्या वजनदारपणानें ठेवला होता, कीं मोठ्या प्रयासानें तो दूर करून मी म्हणालों, "अण्णा, तुमच्या हाताखालचा होण्याची आपली इच्छा नाहीं बुवा! नि इतकं डोळे ताणून पाहूं नका कांहीं. आत्तां वळसा घालून येईल पायगुडे इथे."

पण घारूअण्णांचे डोळे अजूनही विस्तारलेलेच होते आणि आतां त्यांची छाती सुद्धा खालींवर होऊं लागली होती. अस्फुट कातर स्वरांत त्यांनीं अर्धवट आपल्याशींच म्हटलें, "मला...मला...उगीचच शंका आली, कीं..."

दादा लङ्ठे गर्ररदिशीं त्यांच्याकडे वळून म्हणाला, "आतां कसल्या शंका घेतां तुम्ही अण्णा? अशा थोर विक्रमकाराबद्दल तुम्हांला अजून खात्री वाटत नाहीं?"

घारूअण्णांनीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. ते अजून सुद्धा दूर अंतरावरून हळुहळू येणाऱ्या पायगुडेच्या सायकलीकडे रोखून पाहात होते. तेवढ्यांत एका उत्साही खार्चिक गृहस्थानें बाण, नळे, चंद्रज्योती वगैरे दारूकाम सुरू केल्यामुळें रंगणाजवळची बरीच गर्दी मोडून त्या गृहस्थाभोवतीं जमली. घारूअण्णा मात्र पुढें जागा मोकळी झालेली पाहातांच दादा लङ्ठेच्या अगदीं शेजारीं दोरीला धरून उभे राहिले.

थोड्याच वेळांत पायगुड्यांची सायकल आमच्याजवळ येऊन ठेपली. ह्या वेळेस त्यांचे शरीरसंरक्षक मागें राहिले असून ते एकटेच पुढें होते. गॅसच्या बत्तीचा उजेड लवकरच त्यांच्या मुखावर पडला आणि त्यांचा तो उत्साहानें पुनरपि न्हालेला दमदार चेहरा पाहून आम्हांला क्षणभर आनंद झाला.

पण तो क्षणभरच! दुसऱ्याच क्षणीं पायगुडे ह्यांच्या मुद्रेंत विलक्षण फरक

दिसूं लागला. त्यांचा चेहरा अकस्मात् आश्चर्ययुक्त दिसूं लागला. कांहीं तरी अभूतपूर्व घटना दृष्टीस पडल्यामुळें त्यांचें चित्त एकदम व्यग्र झालें असावें. ही अभूतपूर्व घटना काय असावी म्हणून आम्हीं त्यांच्या त्या किंचित् निस्तेज पण विस्फारलेल्या नेत्रांच्या रोखानें पाहूं लागलों तों आम्हांला घारूअण्णाच दिसले. आणि घारूअण्णा ? घारूअण्णांची स्थिति कांहीं विलक्षणच झाली होती. ते अगदीं डोळे वटारून वटारून पायगुड्यांकडे पाहात होते. त्यांची छाती ताडताड उडत होतीं आणि हाताच्या मुठींनीं त्यांनीं दोरी इतक्या गच्च आवळून धरली होती, कीं त्यांच्या हातांतून रक्ताचे एक दोन थेंबही निघाले असतील.

क्षणभरानें दांतओठ चावून ते म्हणाले, "बदमाष ! पाजी ! रास्कल !" पण ह्यापलीकडे कांहींच शब्द त्यांच्या तोंडून निघेनात. इतका त्यांचा राग अनावर झालेला दिसत होता.

पण एवढें होईपर्यंत पायगुड्यांची सायकल तेथें थांबते आहे थोडीच ! ती केव्हांच पुढें निघून गेली. पण घारूअण्णा थांबले नाहींत. ते सुद्धा दोरी वर करून आंत घुसले व तीरासारखे सायकलच्या मागें धावले. तेवढ्यांत जवळ आलेल्या शरीरसंरक्षकांच्या सायकली त्यांनीं धक्के मारून खालीं पाडल्या आणि हाताच्या मुठी उगारून ते पायगुड्यांच्या सायकलमागें धावूं लागले. तसा पायगुड्यांच्या सायकलीलाही अचानक वेग चढला !

आम्हांला हा प्रकार कांहींच समजेना. आम्ही नुसतेच टकमकां पाहूं लागलों, इतकी आमची बुद्धि हबकून गेली होती. इतक्यांत एकाएकीं आसमंतांत सर्व बाजूंनीं गोंगाट सुरू झाला. कांहीं लोक फळी फोडून आंत घुसले. 'स्टॉप दॅट !' "हाणा, मारा, ठोका !' 'शेम शेम !' अशा गर्जना सुरू झाल्या. आणि कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत राहिला नाहीं.

दादा लट्ठे प्रथम ताळ्यावर आला.

"अण्णांना वेडबीड तर लागलं नाहीं ?"

“ कुणास ठाऊक ? आत्तांपर्यंत तर चांगले होते. ”

“ अरे, पण आपण असे काय उभे आहों ? चला, त्या घारूअण्णांना अजून अडवून ठेवूं, नाहीं तर सबंध विक्रमाची घाण करतील. उद्यां गांवांत तोंड काढायला जागा राहायची नाहीं आपल्याला !”

तत्क्षणीं आम्ही तिघेही रंगणांत धावलों. घारूअण्णांच्या मागोमाग वाऱ्यासारखे जाऊन आम्हीं त्यांना थोपवून धरलें आणि “ अण्णा, काय हें ? अण्णा, काय हें ? ” करीत त्यांना फरफटावीत नेऊं लागलों. दादा लेंढेनें त्यांचे खांदे धरले असून विसू रोडेनें पाय आणि मीं हात धरले होते.

आम्हीं त्यांच्या आंगाला हात लावतांक्षणींच आमच्यावर शिव्यांचा भडिमार करीत घारूअण्णा ओरडले, “ सोडा, सोडा मला ! सोडा म्हणून सांगतों ना ! त्या लबाड माणसाला ठेंचून...”

“ अण्णा ! अण्णा ! तुम्हांला वेडबीड तर लागलं नाहीं ना ? ते पायगुडे नाहींत का ? ”

“ पायगुडे ? पायगुडे ? वा रे पायगुडे ! ” घारूअण्णा तुच्छतेनें म्हणाले, “ हात सोड माझा मुकाट्यानें ! पायगुडे म्हणे. अरे, मीं त्याला पाहातांक्षणींच ओळखलं, कीं हा पांडुरंग पोळ म्हणून ! ”

“ पांडुरंग पोळ ? ”

“ मग कोण वाटलं तुम्हांला ? ” घारूअण्णा आवेशानें उत्तरले, “ अगदीं तोच माझ्या हाताखालचा पांडुरंग पोळ ! माझ्या किशीला मागणी घालणारा पांड्या पोळ ! ”

विस्मयाचा पहिला आवाका ओसरल्यावर मीं शांतपणानें म्हटलें,

" असेल अण्णा, तो पोळ असेल. पण म्हणून काय, त्यानें रेकॉर्ड मोडूं नये ? "

" मोडावं की ! पण तें पोळ म्हणून मोडावं, पायगुडे म्हणून कशाला ? "

घारूअण्णांचा हा मुद्दा आम्हांलाही पटला. पण म्हणून तमाशा करीत किती वेळ तेथें उभे राहायचें ? पायगुडे उर्फ पोळ ह्याला अडचण होत होतीच, शिवाय आमच्या मिरवणुकीभोवतींही लोक जमूं लागले होते.

" कारण आहे त्याला ! " घारूअण्णा मध्येंच हिसकाहिसकी करीत म्हणाले, " ह्या पोळाला मीं रजा दिली नाहीं ना, तेव्हां डॉक्टरचं सिक सर्तिफिकीट घेऊन आला नि रजा मिळवलीन् त्यानें ! पण इथें येऊन तर ही स्वारी रेकॉर्ड मोडायला लागली ! गुपचुप विक्रम करून मला थक्क करायचं होतं गुलामाला ! पण पांडू पोळ म्हणून विक्रम केला असतान् तर मी घोडिवऱ्याहून धावत आलों असतों नि खोटं सर्तिफिकीट दाखवल्याबद्दल फिर्याद ठोकली असती ! तेव्हां पांडू पायगुडे असं घेतलन् बेट्यानें नांव नि केलान् विक्रम सुरू !... शिवाय..."

" शिवाय काय अण्णा ? " मीं त्यांची समजूत घालण्याच्या उद्देशानें म्हटलें. आतां लवकर पळणें भाग होतें. कारण लोक आमच्यावर हल्ला करण्याच्या बेतांत होते.

" शिवाय..." घारूअण्णा म्हणाले, " त्याला रेकॉर्ड मोडूं देतां कामा नये."

" तें कां ? " विसूनें आश्चर्यानें विचारलें.

" एवढं समजत नाहीं तुम्हांला ? " घारूअण्णा ओरडले, " अरे, रेकॉर्ड मोडून तो जगावेगळा पराक्रम करणार होता ! मला पेचांत घालणार होता लेकाचा ! त्याला माहीत आहे, कीं घारूअण्णाचा शब्द म्हणजे रामाचा बाण ! एक सायकल-विक्रम केला कीं मिळालीच किशी आपल्याला ! पण नुसतं पेडल फिरवण्याशिवाय ज्याला कांहीं येत नाहीं अशा हाताखालच्याला मी किशी

देईन ! नांव सोड म्हणावं ! ”

घारूअण्णा हीं वाक्यें इतक्या मोठ्यानें आणि घरघरीत आवाजांत बोलले, कीं तीं पायगुडे ह्यांच्या कर्णरंध्रांत घुसल्याशिवाय राहिलीं नाहींत आणि त्यामुळें पायगुडे ह्यांचा उत्साह आवाका कुठच्या कुठें गेला. शरीरसंरक्षकांच्या प्रयत्नांना आणि प्रोत्साहनांना न जुमानतां श्रीयुत पायगुडे उर्फ पोळ ह्यांचें शरीर धाडदिशीं खालीं आलें आणि विक्रम फिसकटला !

त्याच क्षणीं “ हाः हाः हाः ! ” असें वेड्यासारखें भेसूर हास्य मनःपूर्वक करून घारूअण्णा मूर्च्छित पडले !

नंतर मैदानावर जो गोंधळ उडाला त्याचें वर्णन करण्यास माझी लेखणी असमर्थ आहे ! एवढेंच सांगतों, कीं घारूअण्णांना पोलिस शिपायानें बेशुद्धावस्थेंतच कैद केलें. त्यांना शुद्धीवर आणून परत पाठवून देतों, अशी वाजवी सूचना मीं केली असतां व्यवस्थापकांनीं “ आमच्याकडे आहे त्यांना शुद्धीवर आणणारा डॉक्टर ! ” असें तिरस्कारानें नि संतापानें म्हणून मला गचांडी दिली. त्यांच्याकडे डॉक्टर नाहींत असें कोणीं म्हटलें होतें ? डॉक्टरांची सबंध कमिटीच होती कीं त्यांच्याकडे ! आणि ह्या कमिटीनेंच तर पांडू ‘ पायगुडे ’ ह्याला सर्टिफिकेट दिलें होतें, कीं ‘ तुझें शरीर ठणठणीत आहे, तुला कांहीं होत नाहीं ’ म्हणून !

शेवटीं पोलिसनें आणि व्यवस्थापकांनीं आमचीं नांवें व पत्ते टिपून घेतल्यानंतर घारूअण्णांकडे एक शेवटचा करुण दृष्टिक्षेप टाकून मी, दादा लड्डे आणि विसू रोडे जमिनीवर पडलेली अण्णांची तपकिरीची डबी उचलून घराकडे परतलों. प्रथम जड पावलांनीं चालत होतों; पण जेव्हां खवळलेला जनसमुदाय आंगावर तुटून पडला तेव्हां ढुंगणाला पाय लावून पळावें लागलें.

आणि घरीं येऊन तिघे तीन बिछान्यांवर हाश्हुश् करीत पडलों तेव्हां कुठें माझ्या डोक्यांत ती अजब कल्पना विजेसारखी चमकली.

" हात्तिच्या !" मी ओरडलों.

विसू आणि दादा माझ्याकडे हताश होऊन पाहूं लागले. अण्णांप्रमाणें मलाही वायु होतो कीं काय अशी त्यांना शंका आली असावी.

" हात्तिच्या ! " मी पुन्हा म्हणालों, " सारंच मुसळ केरांत ! अण्णांनीं इतका प्रकार करायलाच नको होता ! "

विसू आणि दादा माझे शब्द ऐकून दोघे दोन कुशींवर वळले आणि मध्यें मी एकटाच भाष्य करीत राहिलों.

" अण्णांच्या मनांत पांडू पोळाला किशी द्यायची नव्हती एवढंच ना ? ठीक आहे तर ! नव्हती द्यायची. पांडू पोळानें विक्रम मोडला असता, तर वचनाखातर अण्णांना आपली मुलगी त्याला द्यावी लागली असती खरी. पण..."

दादा लढ्ठेच्या बाजूनें घोरण्याचा आवाज येऊं लागला.

" पण...पण..." मी विजयी स्वरांत पुढें म्हटलें, " जर पांडू पोळानें रेकॉर्ड मोडलं असतं तरची बात आहे ! रेकॉर्ड मोडीत होता तो पांडू पोळ नव्हताच मुळीं ! तो होता पांडू पायगुडे ! क्वालिफाइड् डॉक्टरांची कमिटीच सांगते आहे...नि पांडोबा पायगुडेला किशी द्यायची असे उद्गार घारूअण्णांनीं कधींच काढलेले नव्हते ! "

माझा हा मुद्दा ऐकून दादा लढ्ठे आणि विसू रोडे ताडदिशीं बिछान्यांत उठून बसले आणि आम्ही दोघेही एकमेकांच्या तोंडाकडे पाहूं लागलों.

# चक्रमपुरांतील विक्रमोत्सव

रेकॉर्ड मोडण्याचें खूळ महाराष्ट्रांत फैलावल्यापासून माझ्या डोक्यांत एक नवीनच कल्पना घोळूं लागली होती. पहिली नोकरी सुटल्यापासून मी स्वस्थच होतों. माझ्या शेवटच्या अर्जाचेंही नकारार्थी उत्तर आल्यावर दुसऱ्याच दिवशीं मी दादा लठ्ठेकडे गेलों आणि त्याच्यापुढें माझी अभिनव योजना मांडली. सुदैवानें विसू रोडे त्या वेळीं तिथेंच असून आपल्या पगारांत वाढ होत नाहीं म्हणून रडकथा गात होता.

“ अरे, मार तुझ्या त्या नोकरीवर लाथ ! ” मी माझी ‘ स्कीम ’ सांगून झाल्यावर ताडदिशीं म्हणालों, “ आपण तिघे एक होऊन हा नवीन पराक्रम केल्यावर पैसे बघ कसे झाडाला लागतील ! ”

विसू रोडे माझ्याकडे प्रथम विस्मयचकित दृष्टीनें पाहूं लागला. नंतर हळूहळू त्याच्या डोळ्यांत आशेचें पाणी चमकूं लागलें.

“ खरंच म्हणतोस किशा ?... खरंच पैसे मिळतील आपल्याला ? ” त्यानें आशाळून विचारलें.

“ अरे, त्यांत शंकाच नको मुळीं ! सगळं चक्रमपूर आपल्या मुठींत येईल ! ”

मी हें अगदीं पूर्ण श्रद्धेनें सांगत होतों खरा, परंतु अद्याप माझ्या योजनेवर दादाचें मत काय आहे तें मला कळलें नव्हतें. दादावर तर आमची सर्व मदार.

दादा लठ्ठे आपल्या ह्या मानमरातबाला साजेशा गंभीरपणानें स्वस्थ बसला होता. बराच वेळ विचार केल्यानंतर त्यानें आपलें मत दिलें : “ किशाच्या सूचनेंत ‘ स्पार्क ’ आहे–ठिणगी आहे, ह्यांत शंका नाहीं. पण प्रश्न

एवढाच..."

" कसला प्रश्न आतां दादा ?" मीं उत्कंठेनें विचारलें. माझ्यांत स्पार्क आहे हे उद्गार आणि तेही दादा लड्डेच्या तोंडून ऐकून मला त्रिभुवनांत धन्य झालें होतें; आणि माझ्या 'स्पार्क' नें भडकून जाऊन बेहोष झालेलें चक्रमपूर माझ्या डोळ्यांपुढें नाचत होतें.

दादा लड्डेनें आपली गंभीर, एकाग्र दृष्टि माझ्याकडे लावून हळुहळू उत्तर दिलें, " हा सगळा भयंकर खटाटोप करायला छन् छन् लागणार तो आपण कुठून आणायचा ?"

खरेंच ! हा मुद्दा माझ्या डोक्यांत मुळींच आलेला नव्हता. मी विचारांत पडलों, पण विसू रोडेचा स्पार्क ह्या वेळीं प्रज्वलित झाला. त्यानें एकाच शब्दांत सांगितलें, " घारूअण्णा !"

त्याच्या त्या नामोच्चारानें चमकून आम्ही म्हणालों, " काय ?"

" तुम्ही जाणतच आहां..." स्वतःचें क्षणिक माहात्म्य ओळखून विसू रोडे शांतपणें बोलूं लागला, " कीं भांडवल मिळवून देण्यांत घारूअण्णांचा हातखंडा आहे. घारूअण्णा प्रयत्न करतील तर हां हां म्हणतां आपल्याला दहा हजारांचं कर्ज मिळवून देतील. एखादा शेटजी दाखवला कीं जळूसारखे चिकटतील ते त्याला."

मीं विषण्णपणें मान डोलवली. मी स्वतः शेटजी नसलों तरी मलाही असेंच चिकटून पन्नास रुपये उसने काढण्याचा प्रयोग घारूअण्णांनीं केलेला होता.

ह्यानंतर वेळ घालवण्यांत अर्थ नव्हता. मी आणि दादा धडाडीचीं माणसें होतों. दादा लड्डेनें विसूची सूचना—अर्थात् त्याला शक्य तों श्रेय देण्याचें टाळून—मान्य केली. आणि नंतर दादाच्या आईनें आमच्यापुढें आदळलेला चहा पोटांत

ढकलीत आम्हीं ताबडतोब त्याच बैठकीला आमचा ‘ प्लॅन ’ तयार केला. ह्या ‘ प्लॅन ’ मध्यें जेव्हां जेव्हां ‘ भांडवल ’ शब्द निघे तेव्हां मीं त्याला जोरानें हरकत घेतली; कारण मी मतानें ‘ सोशालिस्ट ’ होतों. माझी जाज्वल्य तत्त्वनिष्ठा पाहून माझ्या भागिदारांनींही तो शब्द गाळून नुसतें ‘ पैसे ’ असेंच मामुली उल्लेखिण्याचें मान्य केलें.

एक्स्प्रेस तार आणि त्याबरोबर तारेनेंच गेलेला प्रवासभत्ता हातीं पडतांच घारूअण्णा तडकाफडकीं घोडिवऱ्याहून निघून चक्रमपुरास येऊन दाखल झाले. एक महिन्याची ‘ हक्काची ’ रजा घेऊनच ते आले होते, आणि येतांना त्यांनीं ‘ हाताखालच्या मास्तरा ’ ला चार्ज दिला होता.

“ बाकी माझ्या हाताखालचा कोणताही मास्तर घेतला तरी वेळ मारून नेण्याची कला आहे हो त्याच्या आंगांत. ” त्यांनीं अभिमानानें सांगितलें, “ कारण सगळ्यांना शिकवण ह्या घारूअण्णांची आहे. ”

घारूअण्णांच्या या नेतृत्वचातुर्याबद्दल आम्हांला शंका नसल्यामुळें आमच्या नवीन योजनेचे “ प्रिसायडिंग् मॅनेजर ” घारूअण्णांना नेमण्याचें आम्हीं त्याच घटकेला ठरवलें.

ह्यानंतर जाहिरातीचा मसुदा तयार होत आहे तों घारूअण्णा भिकमल शेटजीकडे जाऊन रोखेपत्र तयार करून घेऊनही आले. आम्ही आकृतवक्त्र बसून राहिलों. अण्णांना काय म्हणावें तेंच आम्हांला समजेना ! मीं तर त्याच क्षणीं अण्णांच्या अपूर्व चतुराईचें पारितोषक म्हणून त्यांना दिलेलें पन्नास रुपयांचें कर्ज बाद करून टाकलें. कारण तें परत मिळणार नाहीं ह्याची मला खात्री होती.

विसूनें त्याच दिवशीं हिंडून झाडून साऱ्या दैनिकांत आमची जाहिरात दिली. वाचकांना नमुन्यादाखल ‘ आरोळीं ’ त आलेली जाहिरात इथें देत आहें—

**"चक्रमपुरांत भयंकर खळबळ!"**

कोणीं पाहिला नाहीं, कोणीं ऐकला
नाहीं असा अपूर्व, दणदणीत,

**दि ग्रॅण्ड विक्रम कार्निवाल!!!**

अर्थात् चक्रमपुरांत विक्रमोत्सव!

"आजपर्यंत कोणीं कधीं केला नाहीं आणि पुढेंही करील असें वाटत नाहीं असा अपूर्व चमत्कार करून दाखवून चक्रमपूर सर्व शहरांचें रेकॉर्ड मोडणार आहे. आज रेकॉर्ड मोडण्याची अभिनंदनीय प्रथा महाराष्ट्रांत किती लोकप्रिय झाली आहे हें सन्मान्य नागरिकांना नव्यानें सांगण्यास नकोच! कोणी सायकल रेकॉर्ड मोडतो, कोणी पोहण्याचें रेकॉर्ड मोडतो. कोणी चोवीस तास पखवाज वाजवतो, कोणी चाळीस तास चालत राहातो, कोणी सारखा चहा पीत बसतो, कोणी मूग गिळीत राहातो! तात्पर्य काय, प्रत्येक जण सतत कांहीं तरी विक्रम करतो. पण...

"पण कित्येकांना मनांत असूनही रेकॉर्ड मोडतां येत नाहीं. ऐपत नसते, सुखसोयी नसतात, उत्तेजन मिळत नाहीं, अशा अनेक कारणांमुळें महाराष्ट्रांतले अनेक विक्रमकार झाकल्या माणकांसारखे अप्रसिद्ध राहातात. पण त्यांनीं आतां निराश होण्याचें कारण नाहीं. आमचा ग्रॅंड विक्रम कार्निवाल येत्या शनिवारपासून सुरू होणार असून त्यामुळें ह्या पराक्रमी वीरांची अडचण दूर होणार आहे. आमच्या 'कार्निवाल' मध्यें विक्रमकारांसाठीं उत्कृष्ट सुखसोयी केलेल्या आहेत. तेव्हां आतां—

**उत्साही तरुणांनो! या व विक्रम करा!!**

**नागरिकांनो! या व विक्रम पाहा!!!**

**वि. सू.**—अधिक माहिती आमच्या ' प्रॉस्पेक्टस ' मध्यें वाचा. मागणी करतांच अगदीं ' फुक्कट ' मिळेल ! "

शनिवारचा दिवस उजाडला. चक्रमपुरांत एकच खळबळ उडून गेली. ज्याच्या त्याच्या तोंडीं ' विक्रम कार्निवाल ' हा एकच विषय होता. सर्वांपेक्षां खुद्द आमची धांदल तर विचारूंच नका. चार दिवस आमचा डोळ्याला डोळा लागला नव्हता. सामानाची मागवामागव आणि नेआण करतां करतां पादत्राणें झिजून गेलीं होतीं, हमालांनोकरांवर देखरेख करून घशांना कोरड पडली होती. दादासारखा खंबीर वीर देखील शेवटच्या दिवशीं अगदीं टेकीला आला. पण अखेरीस शनिवार सकाळपर्यंत कार्निवालची सजावट पुरी झाली आणि आम्ही ह्या प्रचंड परिश्रमाचें फळ आतां केव्हां व कसें चाखण्यास मिळतें ह्याची उत्कंठेनें वाट पाहात बसलों.

प्रिय वाचकांपैकीं मोकळ्या पिशवीचे कांहींजण कदाचित् हा महोत्सव पाहाण्यास आलेल्या यात्रेकरूंत सामील झाले असतीलही ; पण जे नसतील त्यांच्यासाठीं आमच्या कार्निवालची अंधुक कल्पना पुढें देत आहें. ठळक कल्पना देतां येणें शक्य नाहीं इतका तो अवर्णनीय होता.

चक्रमपूरच्या वेशीवर असलेलें एक प्रशस्त पडीक मैदान आम्हीं स्वस्त दरानें भाड्यानें घेतलें असून त्याची चांगली साफसफाई केली होती ; आणि सभोवार पत्र्याचें उंच कुंपण घातलें होतें. ह्या कुंपणावर सर्व बाजूंनीं विजेच्या दिव्यांची मालिका लोंबती ठेवली होती. त्यासाठीं बरेच पैसे खर्च करून आम्हांला ह्या बाजूला वीज आणावी लागली होती.

कंपाउंडच्या दाराशीं पायांत सुरवार, आंगांत लांब शेरवानी आणि डोकीला नकली जरीचें पागोटें अशा थाटांत धारूअण्णा येरझारा घालीत होते. युरोपियन ड्रेसांत हजर राहाण्याची आमची कल्पना त्यांनीं मुळांतच खोडून काढल्यामुळें आणि धोतरांतच देखरेख करण्याचा त्यांचा हट्ट आम्हीं चालूं न दिल्यामुळें पोषाखाबाबत अशी तडजोड करावी लागली होती. धारूअण्णांना काम कांहीं

विशेष नव्हतेंच. वडीलकीच्या नात्यानें ते मॅनेजर एवढेंच. वस्तुतः सगळी देखरेख दादा लड्डे आणि विसू रोडे आपल्या हाताखालच्या गणांसह पाहात होते. मी सूटपँट घालून तिकीट ऑफिसांत बसलों होतों. लड्डे आणि रोडे ह्यांनीं खाकी हाफ्‌पँट, बूट नि खाकी लड्ड बटनांचा ट्यूनिक घातला होता. त्यामुळें ती जोडी 'बॉनी स्कॉटलंड' मधल्या लॉरेल-हार्डीप्रमाणें दिसत होती.

कार्निवालच्या अंतर्भागाचे स्टॉल पद्धतीवर पोटविभाग पाडले असून प्रत्येक भागांत विशिष्ट विक्रम करण्याच्या सर्व सोयी जय्यत ठेवल्या होत्या. उदाहरणार्थ सायकल-विक्रमच घेऊं. नाटकांत 'शाकुंतल' त्याप्रमाणें विक्रमांत सायकलविक्रमाची योग्यता आहे हें बहुधा कोणी अमान्य करणार नाहीं. ह्या प्रमुख विक्रमासाठीं अर्थातच मैदानाचा एक मोठा भाग स्वतंत्रपणें राखून ठेवलेला होता. नितांत सुखसोयींनीं सुसज्ज अशा पंचवीस सायकली स्टँडवर पराक्रमी वीरांची वाट पाहात उभ्या होत्या. ह्या सायकलींची सीट आरामखुर्चीप्रमाणें असून तिला दोन्ही बाजूंना दोन लड्ड हात होते. शिवाय डाव्या हाताला थुंकण्याचें तस्त आणि उजव्या हाताला चहाचीं पात्रें, धूम्रपान-साहित्य, तसेंच वर्तमानपत्रें ठेवण्यासाठीं छोटा टीपॉय होता.

वादनविक्रमाच्या विभागांत पखवाज, मृदंग, सनई, डमरू आणि घासलेटचे डबे ओळीनें मांडून ठेवले होते. विक्रमकारांच्या करमणुकीसाठीं ह्या सर्व सुस्वरांत भर घालणारा ग्रामोफोन शेजारींच एका स्टुलावर ठेवला होता. मात्र त्याचें रेकॉर्ड कोणीं मोडूं नये म्हणून एका मुलाला पाहाऱ्यावर बसवलें होतें.

वाचन-लेखन विभाग म्हणजे एक लायब्ररीच होती. लहान लहान टेबलें आणि खुर्च्या; टेबलांवर वर्तमानपत्रांचे आणि कोऱ्या कागदांच्या पॅडचे ढीग रचून ठेवले होते. हवें-नको पुसायला (म्हणजे पुस्तकें झाडायला नव्हेत) पोरगे उभे केले होते. विक्रमकाराचें एक पुस्तक वाचून झालें कीं तातडीनें त्याला लागेल तें दुसरें पुस्तक द्यावें, शाई-कागद संपलीं कीं पुरवावीं, पुस्तकाचें पान उलटून द्यावें, 'वाचकां'चे डोळे दुखूं लागले कीं त्यांत नेत्रांजन ओतावें, त्यांना खाण्यापिण्यास द्यावें, संडासाची वाट दाखवावी, वगैरे कामें ह्या पोरांची होतीं. ह्या

पुस्तकांतल्या किड्यांना उत्तेजन देण्यासाठीं टेबलांवर छोटीं काचेचीं पात्रें ठेवलीं असून त्यांत कसरी वळवळत होत्या.

ह्यानंतर स्वयंपाक–विभाग. हा विक्रम फक्त स्त्रियांनाच खुला होता. परीक्षक मात्र पुरुष आचार्य (!) नेमले होते. ह्या विभागांत अर्थातच सतत पोळ्या, सतत बिस्किटें, सतत लाडू करण्यासाठीं पिठें, साखर, गूळ, मीठ, तिखट वगैरेंचीं भांडीं ठेवलीं असून चूलखंडेंही धडधडत होतीं. ह्या ठिकाणीं मदतनीस किंवा नोकर मात्र नव्हते. ते स्त्रीदाक्षिण्याच्या अभावामुळें नसून ह्या विक्रमाला मदतीची जरूर नाहीं असें अण्णांचें मत पडल्यामुळें. 'स्वयंपाक' ह्या शब्दांत कणिक मापण्यापासून तों पोळीची घडी करण्यापर्यंत सर्व येत असल्यामुळें स्वयंपाकाच्या विक्रमाला मदतनीसाची जरूर नाहीं असें अण्णांनीं जोरांत सांगितलें होतें.

ह्याच्या शेजारींच खाद्य–विभाग होता. ह्यांत विक्रम करण्यासाठीं पोरांटोरांपासून म्हाताऱ्यांपर्यंत सर्वांच्या उड्या पडणार हें ओळखून आम्हीं खाद्य–विक्रमाचे दर जादा ठेवले होते आणि डिपॉझिट्ही जबरें ठेवलें होतें. डिपॉझिट प्रत्येक विक्रमासाठीं होतेंच. डिपॉझिटची कल्पना अशी, कीं कोणताही विक्रम करूं इच्छिणाराची निदान कमींत कमी अमुक एक तास विक्रम करण्याची तयारी पाहिजे. ही मर्यादा आम्हीं कांटेकोरपणानें किंवा कठोरपणानें मुळींच ठेवली नेव्हती. पण तेवढीही मर्यादा न गांठणाराचें डिपॉझिट जप्त होणार होतें. स्तुत्य हेतु एवढाच, कीं विक्रम म्हणजे पोरखेळ नव्हे हें प्रत्येकाला कळलें पाहिजे.

ह्याशिवाय दुसऱ्याही अनेक प्रकारच्या विक्रमांची सोय ह्या ठिकाणीं केलेली होती. सतत टिपऱ्या वाजवीत हिंडणें, सतत डावाउजवा करणें, सतत पोथ्या वाचणें, सतत एका पायावर उभें राहाणें, अगर एका हातानें फांदी धरून लोंबकळणें, सतत टक लावून समोर पाहाणें (ह्या ठिकाणीं स्त्रीप्रेक्षकांची सोय एका कडेला केली होती), वगैरेसारखे जुन्या पद्धतीचे, आणि सतत धूम्रपान करणें, सतत व्याख्यान देणें, सतत गजवलयांकित पिंजरेवजा कोठडींत बसून

राहाणें ( कल्पना तुरुंगवासाची ), सतत टाइप करणें, वगैरे कित्येक आधुनिक पद्धतीचे विक्रमही आम्हीं कार्निवालमध्यें समाविष्ट केले होते. ह्या सर्व विक्रमांसाठीं बादशाही सुखसोयी होत्या हें निराळें सांगायला नकोच. म्हणजे झाडाला लोंबकळणारा पडला तर त्याच्यासाठीं खालीं गादी होती. गादीवर येतांच आपलें विक्रमाचें सिंहासन सोडून विक्रमकारानें पळ काढायचा असे. टाइपरायटरला रहाटगाडग्यासारखी मोठी रिबन लावलेली असून गिरणीच्या पट्ट्याप्रमाणें ती सतत फिरत होती. विड्या ओढणारांसाठीं उद्यानवाटिका होत्याच. तुरुंगांतला विक्रम करणारांना कोणतेंही कमी पडूं नये म्हणून मुद्दाम वाळू घातलेली जाडीभरडी भाकरी ( चिकित्सक प्रेक्षकांना ही नमुन्यादाखल देण्यांत येत असे, पण ती तोंडांत टाकणारा धाडसी वीर एखादाच निघाला ), आणि चाबकाचे फटके ह्यांची सोय केली होती. ( ह्याच्या खरेपणाबद्दल कोणींच संशय प्रकट केला नाहीं ! ) टिपरीविक्रमांत एखाद्याच्या नाकातोंडाला टिपरी लागली तर चोपडण्यासाठीं झिंदाक मलम ठेवलें होतें.

अरे हो ! आणखी एकदोन महत्त्वाचे विक्रम राहिलेच. एक पोहण्याचा. ह्यासंबंधीं ज्यांनीं रॉबिन चतर्जींचा विक्रम पाहिला आहे त्या माझ्या खेळाडू वाचकांना निराळें सांगण्यास नकोच. दुसरा हजामतीचा. ह्या विभागांत एरवीं गिऱ्हाईक मिळण्याची पंचाईत झाली असती. कारण, विक्रमोत्सवाच्या जत्रेला नटून थटून येणारी रसिक मंडळी दाढ्या वाढवून थोडीच येणार होती ? त्याला कांहीं तरी आकर्षण पाहिजे ! तेव्हां आम्हांला मुकाट्यानें ‘ हजामत फुकट ’ अशी पाटी लावावी लागली. आणि त्याचा फायदा होऊन लगेच जंगलवजा थोबाडाचे अनेक चेहरे कार्निवालमध्यें घुसूं लागले आणि डांबरी रस्त्याप्रमाणें सुसंस्कृत होऊन बाहेर पडूं लागले. आमच्या कार्निवालांत आम्हीं काटकसरीचें कसें नमुनेदार धोरण ठेवलें होतें तें इथें नमूद करण्यासारखें आहे. खाद्यविक्रमाला लागणारें सामान शेजारचा स्वयंपाक-विक्रम आपोआप पुरवीत होता. विक्रमकारांची करमणूक वादनविक्रमानें आणि एकमेकांच्या रेकॉर्ड मोडण्याच्या विक्षिप्त अट्टाहासानें आपोआप होत होती. तसेंच विक्रमकारांकडे पाहून जशी प्रेक्षकांची, तशी नाना तऱ्हेच्या त्या प्रेक्षकवृंदाकडे पाहून विक्रमकारांचीही आपोआप करमणूक होत होती. चार चार दिवस विक्रम करणारांची दाढी वाढणें

( स्वयंपाक–विक्रम करणारांखेरीज इतरांची ) साहजिक असल्यामुळें त्यांची ताबडतोब उलटीसुलटी करण्यास दुसरे विशिष्ट विक्रमकार तयारच होते. श्मश्रूविक्रमाचें आणखी स्टँडिंग किंवा वॉण्डरिंग गिऱ्हाईक म्हणजे अण्णा, दादा, विसू आणि मी. ह्यांतला मी विशेष मृदु अंतःकरणाचा असल्यामुळें एक दिवस गिऱ्हाईक न मिळाल्यामुळें मला सारखी पांच वेळां विनाकारण हजामत करून घ्यावी लागली !

अरेच्या ! पण मी वाहावतच चाललों की ! तिकीट ऑफिसांत नुसतें रिकामें बसून राहाणें एवढेंच आतांपर्यंत माझें काम असल्यामुळें माझ्या ऑफिसच्या छोट्या खिडकींतून दिसणारा हा सगळा देखावा मीं संथपणें वर्णन केला. पांच वाजतां मात्र दि ग्रँड कार्निवालच्या बुकिंग ऑफिसपाशीं एक एक गिऱ्हाईक जमूं लागलें आणि पुढें पुढें तर तिकिटें विकण्यांत मी इतका गढून गेलों, कीं सात केव्हां वाजले तेंही मला कळलें नाहीं. एकाएकीं यक्षिणीची कांडी फिरावी त्याप्रमाणें सर्वत्र विद्युद्दीपांचा लखलखाट दिसूं लागल्यामुळें क्षणभर माझा मीच कार्निवालच्या कौतुकांत निमग्न होऊन गेलों. ठिकठिकाणीं हिरव्या, निळ्या, तांबड्या विजेच्या गोळ्यांनीं रंगीबेरंगी प्रकाश पाडला होता. बाहेर विद्युद्दीपांच्या प्रचंड अक्षरांत ‘ दि ग्रँड विक्रम कार्निवाल ’ हें इंग्रजी नांव सरसर डोळ्यांपुढून जाऊन गिऱ्हाइकांना मोह पाडीत होतें. ही सगळी अपूर्व रोषणाई पाहून चक्रमपूरनें यंदा शिमग्यांतच दिवाळी साजरी केली हे त्या दिवशीं एका वृत्तपत्रानें आपल्या अग्रलेखांत काढलेले मार्मिक उद्गार किती खरे होते ह्याची मला साक्ष पटली. ( ह्या अग्रलेखाला चाळीस रुपये फी पडली होती. )

‘ तिकीट द्या हो मास्तर ! ’ ह्या गर्जनेनें चमकून मीं समोर पाहिलें. कोणी खुर्दा, कोणी अधेली, तर कोणी नोट घेतलेले असे दहा पांच हात खिडकींतून आंत घुसले होते. मीं मुष्किलीनें ‘ जरा दमानें घ्या ’ असें सांगून ते बाहेर काढवले आणि तिकिटें वांटण्यांत गुंतलों.

“ साहेब, मला एक विक्रम करायचाय्. ” एक तेरा चौदा वर्षांचा पोरगा

खिडकींत तोंड घालून सांगूं लागला.

" कसला रे विक्रम ?" मीं त्याला कौतुकानें विचारलें.

तो नाक फेंदारून पुढें म्हणाला, " पण तुम्हीं फी घेतली नाहीं पाहिजे माझ्याजवळून."

" मोठा शहाणा आहेस ! " मीं हसून उत्तर केलें. " तोंड काढ पाहूं बाहेर ! दुसरीं लोकं थांबलीं आहेत तिकिटांसाठीं."

" मला तुमचं सामानबिमान कांहीं नको." पोरगा आपलें नाक पूर्वस्थितीवर आणून म्हणाला, " फक्त विक्रम करायला जागा पाहिजे. तिचे कसले हो पैसे ?"

" तर-तर ! जागा फुकटची ठेवली आहे कीं नाहीं तुझ्या बापानें ? आणि काय रे, असा कोणता विक्रम करणार आहेस तूं ?"

ह्यावर त्या पोरानें आपल्या नाकावर बोट घांशीत उत्तर दिलें, " अगदीं नवीन तऱ्हेचा विक्रम आहे. त्याचं असं आहे, आतां शिमगा झालाय् ना सुरू ?..."

" बरं मग ? " मीं साशंक सुरांत विचारलें.

" मग काय ? सतत बोंब मारण्याचं रेकॉर्ड करणार आहें मीं ! " असें म्हणून त्यानें हाताची मूठ उलटी करून आपल्या आकृतमुखाजवळ नेली देखील आणि अवघ्या दहा सेकंदांच्या अवधींत आमच्या कार्निवालचा शेलक्या शब्दांत उद्धार केला !

मी त्याला शासन करण्यासाठीं त्वरेनें तिकिट ऑफिसच्या बाहेर धावलों आणि हाताच्या मुठींची उघडझाप करीत, डोळ्यांतून क्रोधाग्नीचे फवारे सोडीत गर्जना केली, " कुठं गेला तो बद्माष ? ..."

" कोण आहे रे तिकडे ? धरा नि मारा त्याला !"

माझा हुकूम ऐकायला अर्थातच त्या ठिकाणीं [illegible]णी देखील नव्हता. आणि ज्या प्रेक्षकांनीं साध्याच तिकिटांत हा जादा तमाशा पाहिला होता, ते नुसते खो खो हसले. तेव्हां दोन्ही हात खिशांत घालून मी ताडताड पावलें टाकीत परत बुकिंग ऑफिसांत आलों; आणि पाहातों तों त्या पोराच्या साथीदारांनीं एक तिकिटांचें लहान चोपडें लांबवलें होतें. गुन्हेगार अर्थातच फरारी होते.

" जाऊं द्या झालं ! " मी खुर्चींत बसून आपणांशींच म्हणालों, " फार तर तीन रुपयांचीं असतील तिकिटं. पण त्यामुळें ब्याद केवढी टळली ! "

" आणि धडा मिळाला ! " एका गृहस्थानें अनाहूतपणें सांगितलें. मीं समोर पाहिलें तों नाकाच्या बोंडीवर चष्मा धरसलेला असा पांढऱ्या शुभ्र केसांचा एक विनोदी पगडीवाला दिसला. त्याच्या ह्या चोंबडेपणाबद्दल मी त्याची सडकून हजेरी घेणार होतों, पण तेवढ्यांत त्याच्या हातांतल्या दहा दहाच्या दोन नोटा दिसतांच जीभ आवरली.

" विक्रम करायचाय् ? " मीं अत्यादरानें विचारलें.

" छे हो ! ह्या वयांत कसला विक्रम ! " त्यानें हसून उत्तर दिलें, " कालच माझं तिसरं लग्न झालं खरं, पण वयानें आहें मी साठीच्या बाहेरचा. माझं कुटुंब एकवार मोडूं शकेल माझे पांढरे केंस सतत उपटायचं रेकॉर्ड ! "

" आपण विक्रम पाहायला आलांत ? "

" आलों होतों खरं म्हटलं तर विक्रम पाहायलाच. माझ्या लग्नाची चाळीस वऱ्हाडी मंडळी घेऊनच आलों आहें मी. पण म्हटलं, आतां तुमचा विक्रम दिसला कीं ! तेव्हां पैसे खर्चून काय पाहायचंय् जास्ती ? "

" काय मंडळी ? " असें म्हणून त्यानें आपल्या मंडळीकडे वळून पाहिलें नि नंतर पुन्हा माझ्याकडे वळून सांगितलें, " मंडळीचं मत पडतंय् धर्मात्माच पाहूं या. तेव्हां घेतों [illegible] रजा! बाकी धर्मात्म्याला जातों आहें, पण तसा मताचा मी सनातनी आहें हो ! "

एवढें म्हणत त्या बडबड्या म्हाताऱ्यानें चक्क माझ्याकडे पाठ वळवली आणि त्याच्या मागोमाग त्याची चाळीस लोकांची सेनाही घराकडे परतली. ह्या वेळीं मात्र माझा राग पोटांत मावेनासा झाला. मीं हाताच्या मुठी आवेशानें काउंटरवर आपटल्या आणि दौतींतील शाईचे फवारे चौफेर उडवून दिले. नंतर मघां जीभ चावण्यापूर्वी तिच्या शेंड्यावर जे निवडक शब्द आलेले होते त्यांना सपासप तोंडाबाहेर वाट काढून दिली.

" हलकट! पाजी लेकाचा ! त्या नाठाळ तीन वितीच्या नि दीडदमडीच्या पोरानें मला शिव्या द्याव्या नि त्याला मारायला मी धावलों तर त्याला ह्यांनीं विक्रम म्हणावं काय ? बरीच दिसतेयू वल्ली ! बदमाष शेरडी, नकटी...! "

" हें मला उद्देशून आहे काय ? "

शांत गंभीर स्वरांत विचारलेला हा प्रश्न ऐकून मीं चमकून माझा भाषणप्रवाह थांबवला. आणि समोर पाहातांच गारठून गेलों. एक भव्य, उग्र चेहऱ्याची, नकट्या नाकाची, सोवळी म्हातारी बाई काउंटरवर कोपर टेकून माझ्याकडे रोखून पाहात होती. मीं अर्थातच हात पसरून तिची क्षमा मागितली आणि " बाईसाहेब ! आपल्याला कितीचं तिकीट पाहिजे ? " असें नम्र आवाजांत विचारलें. तिच्या नाकावर उडालेला शाईचा ठिपका अजून तिच्या लक्षांत आलेला नव्हता, ह्याचें मीं त्यांतल्या त्यांत समाधान मानलें !

" कितीचं ? " तिनें एकेक डोळा एवढाला करून म्हटलें, " साहेब, मी अनाथ मायलेक मंडळाची सेक्रेटरीण आहे. तुमच्या जाहिरातींत होतं म्हणून आल्यें. कॉम्प्लीमेंट्रीचं द्या एक. "

मीं मुकाट्यानें एक कॉप्लीमेंटरी तिकीट फाडून माझ्या अधिकृत सहीसह तिला दिलें. तें घेऊन ती म्हणाली, " नि सप्लीमेंट्रीचीं वीस ! "

" काय ? "

" सप्लीमेंट्रीचीं वीस. मी एकटी आल्यें नाहीं. माझ्याबरोबर दहा अनाथ माया नि बारा अनाथ लेकरं आलीं आहेत. "

" सप्लीमेंट्रीचा प्रकार नाहीं आमच्याकडे. " मीं नाक मुरडून सांगितलें, " नि कॉप्लीमेंट्रीचीं मिळणार नाहींत त्यांना. त्यांच्यासाठीं तिकिटं काढलीं पाहिजेत तुम्हांला. "

" मग निम्म्या दरांत द्या. " असें म्हणून तिनें ठणूठणू पैसे मोजले आणि मीं किंचित् कुरकुर करून दिलेलीं तिकिटें घेऊन ती आणि तिचा अनाथ गोतावळा निघून गेला.

असे अनेक मासल्याचे अनेक लोक तिकिटें घेण्यास येत होते आणि जात होते. त्या सर्वांचें वर्णन करण्यांत काय अर्थ ? पण आमच्या विक्रम कार्निवालांत भयंकर उलथापालथ करणाऱ्या एका अजब गिऱ्हाइकाची माहिती मात्र जरा विस्तृतपणें सांगितली पाहिजे.

हें गिऱ्हाईक वरील प्रकारानंतर अर्ध्या एक तासानें बुकिंग ऑफिसपुढें येऊन ठेपलें. गृहस्थ उण्यापुऱ्या उंचीचा आणि दणकट दिसला. त्यानें एकदम येऊन पाकीट काढीत म्हटलें, " विक्रम करायचाय् मला. काय तिकीट पडेल ? "

" कसला विक्रम ? " मीं त्याच्या चेहऱ्याकडे विशेष पाहात विचारलें. त्याला पूर्वी कुठेंतरी पाहिलें असावें असें मला वाटलें.

" नगारा वाजवण्याचा. " त्यानें शांतपणें सांगितलें आणि ह्याच क्षणीं मला त्याची ओळख पटली. मी अस्वस्थ होऊन त्याच्याकडे पाहूं लागलों.

कारण, हा गृहस्थ म्हणजे घारूअण्णांचा कट्टा शत्रू पांडोबा पोळच होता. घारूअण्णांच्या हाताखालचा मास्तर असूनही त्यांच्या मुलीला मागणी घालण्याचें धाडस त्यानें कसें केलें होतें, पण घारूअण्णांनीं ' कांहीं तरी पराक्रम केल्याशिवाय मागणी घालूं नकोस ' असें सांगून त्याला गचांडी कशी दिली होती, आणि मग स्वतःची पात्रता दाखवण्यासाठीं त्यानें सायकलविक्रम कसा केला होता आणि तो कसा फिसकटला वगैरे हकीगत प्रिय वाचकांना मीं सांगितलेली कदाचित् आठवत असेल. अर्थात् पांडोबा पोळ म्हटला, कीं घारूअण्णांच्या कपाळावर आठ्या चढत; आणि आतां पुन्हा एकवार विक्रम करून किशीला मागणी घालण्यासाठीं तो आलेला पाहून त्यांच्या आठ्या खात्रीनें द्विगुणित झाल्या असत्या.

ह्या बाबतींत अण्णांना विचारल्याशिवाय कांहीं करण्याचा आपल्याला हक्क नाहीं हें ओळखून मीं पांडोबांना म्हटलें, " आपण बुकिंग ऑफिसमध्यें बसा घटकाभर. मी आत्तां थोडीशी चौकशी करून येतों. फार वेळ नाहीं लागायचा."

इतकें म्हणून त्यानें गुरगुरत केलेल्या " अँ ! " कडे लक्ष न देतां मी धावतच घारूअण्णांच्या शोधार्थ निघालों. अण्णा मंद मंद पावलांनीं प्रेक्षकांच्या गर्दींत हिंडत होते. त्यांना गांठून मीं ताबडतोब ती भयंकर बातमी त्यांच्या कानांवर घातली तेव्हां अण्णा मटकन् खालींच बसले !

" मग काय करायचं अण्णा ? " ते शुद्धीवर आल्यावर मीं त्यांना विचारलें.

" कर्म ! " असें म्हणून त्यांनीं कपाळाला हात लावला.

इतक्यांत विसू रोडे जवळून जातांना दिसला. त्याला बरोबर घेऊन आम्ही दादा लठ्ठेकडे गेलों आणि ह्या प्रसंगीं काय करावें ह्याबद्दल डोकीं घासलीं. बऱ्याच

वेळानंतर विसू रोडेच्या ( आम्ही मठ्ठ मठ्ठ म्हणत असलेल्या ) डोक्यांत एक विलक्षण कल्पना आली आणि त्यानें आम्हांला ती सांगतांच आम्हीं आनंदानें एकमेकाला मिठ्या मारल्या !

पांडुरंग पोळजवळून तिकिटाचे पैसे घेऊन त्याला वादन-विक्रमाच्या दालनाकडे नेण्यांत आलें. ह्या दालनाला लागूनच मागल्या आंगाला आमच्या विद्युद्दीप-नियंत्रणाचें कॅबिन होतें आणि त्यांत विसू रोडे उभा होता. विसू रोडेला इलेक्ट्रिसिटीची माहिती होती, कारण तो वायरमन होता. त्यानें आपल्या ज्ञानाचा आणि एका लांब वायरचा उपयोग करून विक्रम करण्यासाठीं ठेवलेल्या प्रचंड नगाऱ्यावर जादू टाकली होती आणि ह्या जादूचीं सूत्रें हलविण्यासाठीं तो कॅबिनमध्यें उभा होता.

पांडोबा पोळ ह्या दालनांत येऊन मांडी ठोकून बसला. त्यानें आपल्या अस्तन्या वर केल्या आणि एकवार समोरच्या मूठभर प्रेक्षकांकडे आत्मप्रौढीनें पाहिलें. ह्या प्रेक्षकवर्गांत घारूअण्णा नव्हते. कारण त्यांना आपल्या अस्तित्वाची जाणीव ह्या ' हाताखालच्या ' उद्धटाला द्यायची नव्हती. आणि शिवाय त्याचें तोंडही पाहायची त्यांना इच्छा नव्हती.

पांडोबा स्थानापन्न होतांच कॅबिनमधल्या विसू रोडेचा हात स्विचकडे गेला.

पांडोबांनीं त्या जमिनींत पक्क्या बसवलेल्या भल्या मोठ्या नगाऱ्याला डाव्या हाताचें वेष्टण दिलें आणि उजव्या हाताची थाप त्याच्या पृष्ठभागावर मारली. पण विक्रमेच्छु पांडोबा पोळांची ती पहिली आणि शेवटचीच थाप ठरली. कारण, एकाएकीं विंचू डसल्याप्रमाणें नगाऱ्याच्या त्या तांब्याच्या घागरीवरून त्यांनीं आपला डावा हात झटक्यासरशीं काढून घेतला. नंतर भान न राहून थाप मारणारा त्यांचा उजवा हातही एकदम स्थिर झाला.

" काय हो झालं ? " मीं आश्चर्यानें विचारलें.

संतापानें लालबुंद होऊन पांडोबा म्हणाला, "काय म्हणून काय विचारतां? नगारा कढत किती आहे! हाताला चटका बसला ना माझ्या!"

ह्यावर "लबाड लोक! पैसे परत टाका." "कार्निवाल काढून पैसे उकळतात लेकाचे!" "कसचं हो! त्या पायगुडेमध्येंच दम नाहीं. हाफ् मॅड आहे तो! मागें नाहीं का त्यानें सायकलविक्रम अर्धवट सोडला, तेव्हांपासून त्याची अशी स्थिति झाली आहे!" वगैरे अनुकूल प्रतिकूल मतें प्रगट होऊं लागलीं आणि सर्वत्र एकच गोंधळ माजला. पांडोबा तर क्रोधातिशयानें माझ्या आंगावर धावला आणि त्यानें मला खालीं पाडलें! पण लोक मध्यें पडून त्यांनीं मला सोडवलें.

अशा स्थितींत पंधरा मिनिटें गेल्यावर एकानें सुचवलें, कीं नगाऱ्याला खरोखरीच हात लावून पाहावें तो कढत आहे कीं काय? जणूं कांहीं तो पंधरा मिनिटें गरमच राहाणार होता! आणि विसू रोडेनें तर स्विच केव्हांच 'ऑफ' केला होता. नगाऱ्याला हात लावतांच तो थंडगार लागला. तेव्हां क्षणार्धांत पांडू पोळची किंमत 'झीरो' पर्यंत खालीं उतरून लोकांनीं त्याला हाणमार करीत घालवून दिलें. विक्रम फिसकटण्याची त्याची ही दुसरी खेप असल्यामुळें तो अर्थातच अतिशय 'अनूपॉप्युलर' झाला! बिचाऱ्याचें डिपॉझिट जप्त होऊन त्याला जीव मुठींत घेऊन पळ काढावा लागला.

त्याचें संकट दूर होतांच मी आणि अण्णांनीं एकदमच विसूच्या कॅबिनमध्यें उड्या मारल्या आणि एकमेकांनीं एकमेकाला मनसोक्त टाळ्या दिल्या. कार्निवालची व्यवस्था पाहायची आहे हें अजिबात विसरून जाऊन आम्ही ह्या मुक्ततेच्या आनंदांत गर्क झालों. धारूअण्णा छाती फुगवून म्हणाले, "नाहीं तरी असल्या हाताखालच्या मास्तराला मीं कधींच मुलगी दिली नसती. पण विसू, तूं मात्र आज कमाल केलीस! तुझं डोकं इतकं सुपीक असेल असं मला वाटलं नव्हतं!"

विसूच्या आंगावर मूठभर मांस आलें.

" तुझ्या विद्येचा तूं उत्तम उपयोग केलास. " अण्णा पुढें म्हणाले, " वायर पण अशी गुप्तपणें आणली होतीस, कीं ज्याचं नांव तें. पण शॉक जरा ह्याहून जबरा दिला असतास तर बरं झालं असतं, विसू. "

" अण्णा ! "

" तर काय रे ! म्हणजे ही पांड्या पोळाची ब्याद कायमची नष्ट झाली असती. बेटा माझ्या हाताखालचा असून मला न जुमानतां नेहमीं कशी रजा मिळवतो हरि जाणे ! विशा ..." क्षणभर थांबून घारूअण्णा पुढें म्हणाले, " पांडूची ब्याद कायमची घालवायला दुसरी एक युक्ति आहे. "

" काय ती, अण्णा ? " दादानें मध्येंच विचारलें.

" विसूची बुद्धि मला आज दिसून आली आहेच. तो होतकरू आहे. दिसायलाही चांगला आहे. किशीचा न् त्याचा–"

पण विषय बदलून टाकण्यांत विसू रोडेचा हातखंडा आहे. घारूअण्णांच्या मनांतलें जसें हळुहळू बाहेर येऊं लागलें तसतसा विसूचा चेहरा क्षणभरच्च काळवंडलेला दिसला. पण दुसऱ्याच क्षणीं एक हात वर करून त्यानें घोषणा केली : " थ्री चिअर्स फॉर घारूअण्णा ! हिपू हिपू–हुर्रे–"

आम्हीं तिघांनीं कोरस केला, " हिप – हिप हुर्रे – हिप – हिप – हुर्रे ; हिप – हिप – हुर्रे ! "

ह्यानंतर दादा लड्डे पुस्ती जोडूं लागला. " थ्री चिअर्स फॉर किशी !–"

दादाच्या त्या धीरगंभीर आवाजानें चमकून मी डोळे किलकिले केले, आणि एकदम विस्मयचकित झालों. कारण दादा लड्डे ' किशी ' असें ओरडत

नसून ' किशा ' अशी मलाच हांक मारीत होता ! दार उघडून तो नुकताच माझ्या खोलींत आला होता असें मला समजून आलें.

आणि तसेंच खिडकीवाटे सूर्यकिरणही आंत आले आहेत असें मला कळलें. मी बिछान्यावर पडलेला होतों तो ताबडतोब उठून बसलों नि डोळ्यांची उघडझाप केली.

" किती रे झोपतोस किशा ? " दादा लठ्ठेनें म्हटलें.

मीं त्याच्याकडे डोळे फाडून पाहात विचारलें, " कार्निवालचं काय झालं मग दादा ? "

" अँ ? " त्यानेंही माझ्याकडे डोळे फाडून पाहात उलट प्रश्न केला. " कार्निवाल कसचा ? झोंपेंत बरळतो आहेस वाटतं ? "

होय ! एकंदरींत स्वप्नांतच सारा प्रकार झाला होता. मीं किंचित् कडू तोंड करून बिछान्याजवळच्या स्टुलाकडे पाहिलें. स्टुलावर काल संध्याकाळचें टपाल पडलें होतें. त्यांतच माझ्या नोकरीच्या अर्जाचें नकारार्थी उत्तर होतें. तें वाचून मला जागच्या जागींच ग्लानी आली होती. एकूण मी दादा लठ्ठेकडे गेलोंही नव्हतों आणि आम्हीं " विक्रम कार्निवाल " उघडलाही नव्हता !

बाकी तेंही बरेंच झालें. उद्यम-कप्तान होणें मुळांतच मला पसंत नाहीं. कारण मी सोशालिस्ट तत्त्वाचा आहें !

# पंपूवरील प्र सं ग

परंतप परांजपे—जो आमच्या टोळक्यांत ' पंपू ' ह्या आटोपशीर नांवानें ओळखला जाई—आफ्रिकेची सफर संपवून परत येणार असें कळतांच, दादा लठ्ठे, विसू रोडे आणि मी चक्रमपुराहून निघून थेट मुंबईस आलों. पंपूच्या आगमनवार्तेनें विसू रोडेच्या वायरमन्-देहांत विद्युत्-संचार झाला होता; दादा लठ्ठेनें दहा जोर जास्ती काढून आटीव दुधाचे तीन पेले उडवले होते; पंपू येतांच त्याची बकोटी धरून आपल्या व्यायामशाळेंत त्याचें व्याख्यान करविण्याचा त्याचा बेत होता! आणि मींही पंपूच्या धाडसाची खास रोमांचकारी हकीगत वर्णून महाराष्ट्रांत खळबळ उडवण्यासाठीं आपली लेखणी सरसावली होती. पंपू बंदरावर उतरतांच गाण्यासाठीं ' स्वागत तव पंपो... ' हें पदही मीं तयार केलें होतें. घारूअण्णांनाही घोडिवऱ्याहून पंपूच्या स्वागतार्थ बोलावून घ्यावें अशी एक सूचना मीं केली. पण त्यावर दादानें ' घारूअण्णा मुलीला—किशीला स्थळ शोधण्याच्या नादांत आहेत; त्यांना दुसरें तिसरें सुचेनासें झालें आहे; त्यांना पत्र लिहून कशाला त्रास द्या ? ' असें म्हणून पत्र लिहिण्याची स्वतःवरची आपत्ति टाळली होती. वास्तविक दादाला व्यवहारी वाटणारी ही उपसूचना होती अव्यवहारीच. कारण लोडाशीं पडल्या पडल्या तो हें बरळत होता, तेवढ्यांत तीन पत्रें लिहून तीं तीन वेळां पोस्टांत टाकतां आलीं असतीं. शिवाय असल्या गोष्टींनीं त्रास मानून घेण्याइतके घारूअण्णा हळवे नव्हते.

पंपूचा मागील इतिहास आम्हांला माहीत असल्यानें तो बहुधा एडनजवळ उडी टाकून उरलेला प्रवास पोहत पोहत करील अशी आमची कल्पना होती. तरी पण जनरीतीप्रमाणें बूट पाटलोण घालून नि हारतुरे घेऊन आम्ही बलार्ड पियरवर गेलों आणि लवकरच इतर माणसांप्रमाणें पंपूही बोटीच्या दादरावरून उतरतांना दिसला तेव्हां थक्क झालों. पंपूची दाढी वाढलेली असून आपल्या साहेबी टोपींत त्यानें एक लांब पीस खोवलेलें होतें. बाकी इतरेजनांत आणि पंपूच्या अवतारांत तसूचाही फरक नव्हता.

पंपूनें बंदरावर येतांच आमच्याकडे स्मितपूर्वक पाहिलें, हॅट काढून घेतली, दोन्ही हात आकाशाकडे नेले आणि मग डोळ्यांचें पातें लवतें न लवतें तों अशी डुकरासारखी मुसंडी मारली, कीं दोन तीन क्षण काय झालें तेंच आम्हांला समजेना! नंतर मी डोळ्यांपुढचे काजवे मोजण्यांत गर्क झालों आहे तों विसू रोडेच नाक पुशीत म्हणाला, "अरे बापरे! ह्यानें मुका घेतलान् आपल्या सर्वांचा!"

पंपू गमतीनें उत्तरला, "तुम्हांला आपली एक जम्मत दाखवली. नेऊनटांगा प्रांतातल्या रानटी लोकांची नमस्काराची रीत म्हणजे नाकाला तोंड लावायचं."

ह्यावर दादा लठ्ठेही हसला आणि म्हणाला, "बरं झालं, ही म्हणत होती कीं मीही येत्यें बंदरावर म्हणून. पण आम्हींच आणलं नाहीं."

ह्याप्रमाणें नमस्कार चमत्कार चालले असतांना मी आतुरतेनें इकडे तिकडे पाहात होतों. पलीकडे सुटसुटीत लोकरी सुटांतला एक युरोपियन बातमीदार घोसाळ्याच्या नबाबाला गांठून त्याचें 'हिंदी क्रिकेट' वरचें मत आपल्या वहींत नोंदत होता. उभी आफ्रिका पालथी घालून आणि ञ्याहात्तर वेळां धाडसानें जीव बचावून जो मायभूमीला परतला [ आतां तिचा जीव कोण बचावणार ? ] त्या शूर पंपूला भेटायला मात्र उपसंपादक सुद्धा हजर नाहीं! देशी पत्रांचा धंदा अजून बाल्यावस्थेंत आहे असें म्हणतात तें उगाच नाहीं!

पंपूचा सरंजाम म्हणजे एक बंदुकीची पेटी, एक वळकटी, गळ्यांत अडकवलेली खाकी पिशवी आणि पेंढा भरलेलें हिप्पोचें डोकें एवढाच होता. हमालाकडून आम्हीं तो घोडागाडींत चढवला आणि माधवाश्रमाकडे कूच केलें. वाटेंत पंपू मुंबापुरींत झालेल्या अनेक सुधारणांचा सकौतुक उपहास करीत होता. "तूं कांहीं म्हण किशा," तो आपला लांब पाइप काढून मला म्हणाला. त्याचा पाइप वेताच्या छडीसारखा असून इतका लांबलचक होता, कीं त्यांतून निघालेला धूर पार उपशेजाऱ्याच्या—म्हणजे 'एक सोडून एक'च्या—नाकांत गेल्याशिवाय राहात नसे. "तूं कांहीं म्हण, हा दिव्यांचा लखलखाट

नि इमारतींचा दिमाख ह्यांत आमच्यासारख्या शूर मर्दांना कांहीं ‘मजा’ वाटत नाहीं. ह्या डांबरी रस्त्यांवरून लखलखीत बशींत बसून, आपल्या पॉलिश केलेल्या बुटांत स्वतःचा मुखडा पाहात तुम्हीं जे गांवभर हिंडतां त्या तुम्हांला साधं झुरळ मारण्याची तरी धमक आहे का रे? आमच्या बोंगारो जातीचे पन्नास लोक उद्यां हल्ला करायला आले तर तुम्हीं चीं चीं करीत पळाल!”

ह्यावर मुंबईस झालेलें विमानहल्ल्याचें प्रात्यक्षिक पाहाण्यासाठीं मुद्दाम ‘झोनां’त इकडे येऊन गेलेला विसू रोडे सुधारणेच्या जगातर्फे म्हणतो—

म्हणतो कसचा? त्यानें केलेल्या ‘आ’ कडे आम्ही कुतूहलानें बघतों आहों तों त्यानें गप्पकन् तोंड मिटलें. पंपूच्या पाइपमधून निघालेल्या विषारी धुरानें विसू घुसमटला होता.

वर्तमानपत्रांकडून झालेली पंपूची उपेक्षा मला राहून राहून डांचत होती. थोड्या वेळानें अगदीं न राहावून मी त्याला सद्गदित कंठानें म्हणालों, “पंपू, तुझी मुलाखत घ्यायला कुणीं सुद्धा येऊं नये ह्याचं नवल वाटतं!”

पाइप काढून त्यांतली राख दादाच्या पोटावर ओतीत पंपू म्हणाला, “दैनिकाबद्दल म्हणतोस होय? तें असं आहे. मोंबासाला बोटींत चढलों तेव्हां चिटणीस म्हणाला खरा...”

“चिटणीस?”

“नांव मिळवणारांचं शुक्रकाष्ठ तें!” पंपू विषण्णपणें हसून उत्तरला, “सफर आटपून परत आलों तेव्हां लोक इतके सतवायला लागले, कीं एक चिटणीस ठेवावाच लागला. खांद्यावर काय घेत, फोटो काय काढीत, लेख काय मागत, अगदीं विचारूं नकोस! तर सांगत काय होतों, मोंबासालाच चिटणीस म्हणाला, कीं सव्वीस पत्रं आलीं आहेत. प्रत्येकाची मुंबईला उतरल्या-बरोबर स्वतःला खास मुलाखत द्यावी अशी मागणी. पण मीं कमींत कमी तीन

हजार शिलिंग मागितले, तेव्हां सगळेच दडपून गेले!"

दादा लठ्ठे पोट साफ करीत म्हणाला, "पण...पण चिटणीस म्हणतोस तो आहे कुठें तुझा?"

हें विचारतांना दादाचा स्वर कंपित झाला. त्याला कसली भीति पडली होती हें त्या वेळीं आमच्या ध्यानांत आलें नाहीं; पण पंपूच्या उत्तरानें सर्वांची खातरजमा झाली.

तिरस्कारयुक्त मुद्रा करून पंपूनें उत्तर दिलें, "पटलं नाहीं त्याचं माझं. उत्तरं द्यायला लागला; शेवटीं पोर्ट सय्यदजवळ ढकलून दिला."

"ढकलून?"

"उचलून मोटळी करून टाकली! झुलू लोक पेटलेल्या जाळांत जसं हरीण फेंकतात तशी....मग तरंगत तरंगत लागला म्हणे तो कांठाला...रेडिओवर बातमी ऐकली."

ह्यानंतर दहा एक मिनिटें आम्ही सर्व शांतपणें बसलों होतों. मनांतल्या मनांत मी पंपूच्या शौर्याची जशी तारीफ करीत होतों, तशी त्याच्या विनयाचीही प्रशंसा चालविली होती. तीन हजार शिलिंग मागण्यांत हावरेपणा दिसत नसून माझ्या मतें त्याची प्रसिद्धिविन्मुखताच प्रगट होत होती. नाहीं तर त्यानें अशी अचाट मागणी केली नसती.

पण पंपू स्वतः कितीही शालीनपणें पडद्यांत राहूं लागला तरी जगाच्या फायद्यासाठीं त्याला उजेडांत आणणें आम्हां मित्रांचें कर्तव्य होतें. चक्रमपूरला पोचतांच पंपूचा तिकॉलमी फोटो 'आरोळीं' त प्रसिद्ध करण्याचा निश्चय मीं विसू रोडेला एकीकडे सांगितला आणि विसू रोडेनें लगेच डोकें चालवून पंपूच्या शेजारीं आपल्या मिनी मांजरीचा 'एन्लार्ज्ड' फोटो द्यावा नि खालीं

‘प्रख्यात प्रवासी परंतप हे सिंहिणीशीं खेळत आहेत’ असा मथळा टाकावा असें सुचवलें. त्यावर मीं पुन्हा त्याच्या कानांत व्याख्यान झोडलें: ‘मनुष्यप्राणी कितीहि सुधारला तरी त्याचा न्यूनगंड जात नाहीं. त्यापेक्षां खरा मथळा असा हवा...आफ्रिकेंतली एक सिंहीण प्रख्यात प्रवासी परंतप ह्यांच्याशीं खेळत आहे.’

इतक्यांत माधवाश्रम आला.

मला आणि विसू रोडेला एक एक, दादा लड्ढेला दीड आणि वहिनींना अर्धें, तसेंच पंपूला तीन मिळून सात ताटें आम्हीं माधवाश्रमांतील आमच्या खास खोलींतच मागवलीं. गप्पाटप्पा मारीत स्नेहभोजन पार पाडल्यावर पंपूला बसवलें हिप्पोच्या डोक्यावर आणि बाकी मंडळी कोणी खाटेवर, कोणी टेबलावर, कोणी खुर्चीवर आणि कोणी खिडकींत बसली. ह्यांत पंपूचा मुंबईतील दोस्त सदोबा शिंत्रे ह्याची भर पडली होती. त्याला जेवायचा आग्रह केला तेव्हां त्यानें चुकून ‘नाहीं’ म्हटल्यामुळें आतां पस्तावून आंबट तोंडानें तो कोपऱ्यांत उभा होता.

अशा रीतीनें बैठक बसल्यावर पंपूला आफ्रिकेंतील गमती सांगण्याबद्दल आग्रह करण्यांत आला. मंडळीच्या विनंतीला मान देऊन त्यानें कांहीं वेळ पाइप न ओढण्याचें उदार मनानें कबूल केलें. नंतर हिप्पोला भिंतीशेजारीं ओढून त्यावर दोन मऊ उशा टाकून भिंतीला आरामशीरपणें तो टेकला आणि सुधारलेले नाजूक लोक ओढतात तसली ‘बायकी’ सिगारेट त्यानें तुच्छतेनें दांतांत धरली.

नंतर शेजारची बॅग हातानें ओढून त्यानें ती उघडली नि आंतून फोटोचें एक बंडल बाहेर काढलें. प्रत्येकाला दोन दोन तीन तीन फोटोंचे नमुने देण्यांत आले. माझ्या वांट्याला आलेल्या फोटोंपैकीं एकांत पुरोभागीं पंपू स्वतः उभा असून दूर पार्श्वभागीं एक प्रचंड आयाळाचा सिंह बसलेला दिसत होता. पंपूच्या अविर्भावावरून

तो सिंहाला बोलावीत असावा असें वाटत होतें. पंपूच्या आणि सिंहाच्या दरम्यान काळ्या उभ्या रेषा दिसत होत्या; त्या प्रथम मला राणीच्या बागेंतल्या पिंजऱ्याचे गज दिसावेत तशा वाटल्या. पण हा तर्क ऐकून पंपूनें एक प्रचंड हास्य केलें नि मांडीखालची सरकलेली उशी सारखी करून तो म्हणाला, " तुमच्या कल्पनेची धांव इतकीच जायची! बाबा रे, पाऊस पडतो आहे तो पाऊस! कांगोच्या जंगलांत एकदा बरसात सुरू झाली, कीं तुम्ही मुसळधार कीं काय म्हणतां ती कांहींच नव्हे त्यापुढें! नायगाराचा धबधबाच पडतो म्हणेनास आकाशांतून! नि आमची स्वारी काय, लहर लागली कीं चालली शिकारीला! मग पाऊस नाहीं, पाणी नाहीं, ऊन नाहीं, थंडी नाहीं...."

विसू रोडे डोकावून माझ्या हातांतल्या फोटोकडे पाहात होता. त्यानें एक शंका विचारली, " सिंहाची शिकार करतांना हातानें बोलवावं लागतं ! "

" चुचकारतोंय्. " पंपूनें विजयी मुद्रेनें आमच्याकडे पाहात खुलासा केला. " जवळ बोलवायचा, नि आला रे आला कीं दंड थोपटून आडवा लोळवायचा! मराठ्याचा गनिमी कावा ! "

बोंगारो, झुलु आणि हाटेंटाट लोकांवरून पंपू एकदम मराठ्यांकडे वळलेला पाहून मला समाधान वाटलें. मीं हातांतला नंबर दोनचा फोटो नीट निरखून पाहिला. त्यांत पंपू स्वतःच आडवा लोळत होता आणि पंपूनेंही तें कबूल केलें. मात्र ह्या ठिकाणीं पुढें वाकून पंपूनें अगदीं हलक्या आवाजांत आम्हांला एक अंदरकी बात सांगितली. ज्या गादीवर पंपू लोळत होता, ती प्रख्यात पदच्युत राजा रासतफारी ह्याची गादी होती.

हें ऐकून आम्ही सर्व थक्कच झालों! वहिनी तर उघड उघड म्हणाल्या देखील, " बाई बाई ! काय सांगतां भावजी ? पदच्युत का झाला तो ? "

पंपूनें सिगारेटचा एक जबरदस्त झुरका घेऊन अर्धी सिगारेट जाळून टाकली.

“आणि उशाशीं ‘प्रभाकर’ कंदील!” विसू रोडे फोटो नीट पारखून ओरडला, “जीते रहो हिंदुस्थान! जीते रहो रासतफारी!”

“आदिस अबाबाला अजून विजेचे दिवे...’ पंपूनें मध्येंच थांबून पुढें म्हटलें, “ तितके म्हणण्यासारखे चमकत नाहींत.”

“कुठून चमकणार?” दादा लड्डेनें म्हटलें, “आदिस अबाबाचीच म्हणे राखरांगोळी झाली!”

पंपूनें खिशांतून रुमाल बाहेर काढला होता, तो त्यानें डोळ्यांजवळ नेला. आम्ही सर्व पुन्हा थक्कच झालों. पंपूसारखा हडेलहप्पी मर्द पण तोही जुन्या आठवणींनीं रडायला लागतो! ‘वज्रादपि...’ का कायसें म्हटलें आहे त्याचा अर्थ आम्हां दगडांना कुठून कळणार?

क्षणभरानें रुमाल बाजूला करून एक दीर्घ निःश्वास टाकीत पंपू उद्गारला, “ हूंः ! ओघाओघानें आलं म्हणून सांगतों. हेले सेलासीची नि माझी ही दोस्ती! एकदा तर...एकदा तर...त्यानें मला फराळाला बोलावलन्.”

सदोबा शिंत्रे खिडकीजवळ जाऊन निरिच्छपणें पंपूकडे पाहात एक संत्रें सोलीत होते. त्यांनीं दचकून गप्पकन् तीन फोडी गिळल्या.

“ फराळ केला, उशीर झाला, तशी हेले म्हणाला, इथेंच झोप.”

“ हो ना.” दादानें गंभीरपणानें पुन्हा रुमाल काढीत म्हटलें, “ विंचू असतो, कांटा असतो.”

“ विंचूकांट्याच्या बापाला नाहीं भीक घालणार मी.” पंपू रागानें ओरडला. “ पण...पण...” ह्या ठिकाणीं त्याचा स्वर एकदम मृदु आर्द्र झाला. “ पण दिलदार मन पाहिलं कीं पंपूला राहावत नाहीं. एवढ्या मोठ्या बादशहानें मला

आपली गादी दिली. स्वतः खालीं झोपला. राहिलों झालं. ”

वहिनींची फोटोपरीक्षा अजून चाललीच होती. त्यांनीं कोड्यांत पडल्यासारखें तोंड करून विचारलें, “ गादीखालीं सतरंजी आहे का हो ? ”

“ असेल, ” पंपू म्हणाला, “ किंवा नसेल ! तो कांहीं दिल्लीचा विलासी बादशहा नव्हे. स्वातंत्र्याचा वीर हेले सेलासी. मला जर त्या वेळीं किंचित् कल्पना असती कीं त्याच्या राज्याची सहा महिन्यांत धूळधाण उडणार, तर...”

“ सतरंजी म्हणावी तर दशा नाहींत तिला. ” वहिनी.

“ तरी मीं हेलेला थोडासा कानमंत्र दिलाच होता. वरतीं सुदान मोरोक्को नि खालीं थेट केप टाऊनपर्यंत भटकलेला मी ; त्यामुळें मला सगळ्या देशांची हालचाल काय ह्याची बित्तंबातमी ! इरिट्रिआंत इटलीचं पहिलं लढाऊ जहाज आलेलं मीं ह्या डोळ्यांनीं पाहिलं. ”

ह्यावर फारच नवल वाटून विसू रोडे पंपूच्या डोळयांकडे बघूं लागला. सदूचें आश्चर्य तर इतकें पराकोटीला पोचलें, कीं त्यानें खिडकींत पडलेली संत्र्याची साल जोरानें दाबली. पंपूला अर्धा क्षण असा भास झाला, कीं इटलीनें चुकून आपल्यावर ‘ घुसमटी वायु ’ सोडण्याऐवजीं ‘ विलापी वायु ’ सोडला कीं काय !

“ असो, ” पंपू पुन्हा डोळे पुशीत म्हणाला, “ झाल्या गेल्या गोष्टीला इलाज नाहीं. आदिस अबाबा पडला, त्याच्या दुसऱ्याच दिवशीं नायजेरियांत मीं मासमीटिंगपुढें भाषण केलं. ‘ आख्खी आफ्रिका गोऱ्या माणसांची दफनभूमि करा ’ असं मीं दणदणीत आवाजांत सांगितलं. ”

“ म्हणजे विलायतेहून प्रेतांच्या पेट्या आफ्रिकेला मागवाव्या म्हणतोस ? ” विसू रोडेनें विचारलें. “ कल्पना वाईट नाहीं. विलायतेंत जमीन थोडी, माणसं फार. आफ्रिकेंत माणसं थोडीं, जमीन फार. पण पी. अँड ओ. नें सवलत

दिली पाहिजे. ”

सदू म्हणाला, “ हो. नाहीं तर लोक म्हणतील, मुद्दाम मरायला नेतो कोण आफ्रिकेला ! ”

“ इथेंच पुरूं. ” विसू.

दादा लड्डे बराच वेळ कसला तरी विचार करीत होता. बहुधा संध्याकाळीं पंपूला भेटायला मित्रांची धाड येईल तेव्हां चहाचा अंदाजी आंकडा किती होईल त्याचा विचार असावा. पण त्याचें आत्मसंयमन जबर !

लवकरच त्यानें प्रश्न विचारला तो असा–“ तुला टोळ भेटले असतील आफ्रिकेंत. तिकडे खूप असतात म्हणे. एकदम येतात, झाडं खातात, पहाटे उठून चालते होतात. ”

“ पंपूनें सातवी सिगारेट पेटवली. “ नांव घेण्यासारखी टोळधाड मीं पाहिली, ” तो आठवून बोलत होता, “ ती कलाहारी वाळवंट ओलांडतांना. त्या वेळीं पांचावर धारण बसली होती आमची. होतों दोघेच–मी नि माझा झुडपी नोकर. ”

“ झुडपी ? हा काय ‘ उडपी ’चा भाऊ कीं काय ? ”

“ रंगीत. ” पंपूनें हसून सांगितलें. “ अरे, ज्याला हे इंग्रज लोक ‘ बुशमन ’ म्हणतात त्यालाच मीं ‘ झुडपी ’ म्हटलं. झुडपी लोक हेच खरेखुरे आफ्रिकन होत. हजारों वर्षांपासून ते तिथें राहाताहेत. अजून कच्ची शिकार खातात नि दगडी भांड्यांतून जेवतात. ”

संत्रीं संपवून सदोबा कसला तरी निश्चय करून हळूच माझ्याजवळ आले आणि कानांत म्हणाले, “ आतां वाढतील का रे ? जाईन म्हणत होतों, पण

पंपूच्या आख्यानानें अगदीं रंगलों बुवा. आतां दुसरं तिसरं कांहीं सुचत नाहीं. इथेंच राहीन म्हणतों."

ह्यावर दादाशीं खलबत करून वाढप्याकरवीं एक ताट मीं खोलींतच मागवलें. सदू जेवत जेवत ऐकूं लागला.

"तर सांगत काय होतों, मी नि झुडपी नोकर दोघेच होतों प्रवासांत. अर्धं वाळवंट ओलांडलं..."

"कशाला तें ?" सदोबानें भात कालवीत विचारलें.

"त्याशिवाय उरलेलं अर्धं कसं ओलांडणार ?" पंपूनें प्रतिप्रश्न केला आणि सदू शिंत्रेचें समाधान होऊन त्यानें एक भुरका मारला.

"मी होतों शहामृगावर नि झुडपी होता उंटावर. मीं शहामृग असा पळवला, कीं जसं वाऱ्यावरचं वारू. वाटेंत पाण्याचा थेंब नाहीं कीं गवताची पात नाहीं. नुसती तापलेली वाळू नि रसरशीत सूर्य."

दादा लट्ठेची नजर सदू शिंत्रेच्या हातांतल्या रश्शांतल्या बटाट्याकडे गेली होती.

"गॉगल घातले होतेस ?" त्यानें विचारलें.

"गॉगल ?" पंपू उपहासानें हुंकारला, "पाऊण डझन गॉगलची पेटी घेतली होती. सगळे एकामागून एक तडकत गेले. मीच होतों म्हणून टिकलों. तूं तर दादा, डोळेच पांढरे करतास !"

दादाला हें बोलणें आवडलें नाहीं. पण यजमानगिरीचें माहात्म्य जाणून सदूच्या ताटाकडे पाहात त्यानें आवंढा गिळला.

“ शेवटीं सहा दिवस पाण्याशिवाय काढल्यावर शहामृग मेला. ”

“ आणि तुम्ही जिवंत ! ” दादानें साश्चर्य उद्गार काढला. त्याच्या स्वरावरून त्याला म्हणायचें होतें, “ लाजबीज अगदींच गुंडाळलीत ? ”

“ न्यूबियापासून तों अलेक्झांड्रियापर्यंत साऱ्या आफ्रिकेचं पाणी...अर्थात् मिळेल तिथें प्यायलेला हा गडी...” पंपूनें रास्त अभिमानानें छातीवर हात ठेवून म्हटलें, “ मी काय मरणाला दाद देतों! बिचारा शहामृग! वाईट वाटलं, पण करतां काय ? तिथेंच अग्नि दिला. ”

वहिनींच्या डोळ्यांत पाणी आलें ; तें त्यांनीं पदरानें पुसलें.

“ अर्धा खाल्लान् झुडपीनें, अर्धा मीं.” पंपू पुढें म्हणाला. “ पुन्हा वणवण वणवण चाललों. अकराव्या...नाहीं, मला वाटतं दहाव्याच दिवशीं उंट फाडला.”

मला वाटलें आपण बरोबर ऐकलें नाहीं; म्हणून मी ‘ आँ ?’ केलें. सदूनेंही ‘ आँ ?’ केलें, पण तो ढेकर होता.

“ काय करणार ? दाढीवरून हात फिरवीत पंपू म्हणाला, “ प्रसंग आला कीं कॅनिबॉल सुद्धा बनावं लागतं. पोट दिलंय् ना देवानें ? ”

दादा लट्ठेनें नुकतेंच सुपारीचें तबक पुढें ओढलें होतें, तें उचलून सगळी सुपारी तोंडांत ओतीत पंपू बोबडला, “ ह्रूंट खाल्लूळा. पोटांतलं पाणी प्यालों. तीन दिवस पुरलं हें. नंतर....”

माणसाला कान हलवतां येत नाहींत ना ? मला जबर संशय आहे, कीं ह्यावेळीं ससाप्रमाणें खरोखरीच मीं कानांची हालचाल केली होती. दादा लट्ठे, वहिनी, विसू रोडे आणि खुद्द सदोबा देखील आतां झुडपीबद्दल काय ऐकायला मिळणार ह्या उत्कंठेनें पंपूकडे पाहात होते. पण पंपू मध्येंच थांबून खिडकीजवळ जाऊन,

सुपारीचा बोकणा बाहेर टाकून परत आला आणि म्हणाला, "सुदैवानें लवकरच आम्हांला पाणथळ जमीन लागली."

ह्यावर माधवाश्रमाच्या त्या खोलींत सुटलेले पांच दीर्घ निःश्वास 'रेकॉर्ड' करण्यासारखे होते.

"आणि ह्याच ठिकाणीं तंबू ठोकून रात्रीं झोपलों असतांना आम्हांला ती टोळधाड भेटली. दरोबस्त रात्रींत त्यांनीं त्या बेटांतलीं—ओयासिसमधलीं—तेरा नारळीचीं झाडं, अर्धा खंडी गवत, आमच्या तंबूचं कापड न् झुडपी नोकराचा उजवा कान ह्यांचा फडशा उडवला."

"तुझी दाढी नाहीं का ओरपली ?" सदूनें आचरटासारखा प्रश्न केला.

"दुसऱ्या दिवशीं उठून पाहातों तों कसचं बेट नि कसचं पाणी! पुन्हा आपले रखरखीत वाळवंटांत उभे ! खालीं वाळू नि वर आकाश. त्यावर झुडपीनें माझ्याकडे नि मीं त्याच्याकडे बघितलं."

पंपूनें झुडपीकडे कशा दृष्टीनें बघितलें असेल ह्याची मला कल्पनाच करवेना.

"'आपलं कातडी पांघरूण घेऊन झोपला नाहींस म्हणून तुझं असं झालं.' असं मीं झुडपीला त्याचा डावा कान धरून सांगितलं. पुन्हा मजल दरमजल कूच केली नि मग आठ दहा दिवसांनीं माताडीला पोंचलों."

एवढें सांगून पंपू थोडा वेळ विसांवा घेत बसला. सदूनें तेवढ्यांतच त्याची बैठकीची उशी सारखी करण्याची सेवकवृत्ति दाखवलीं आणि ओघालाच आलें म्हणून प्रश्न केला, "हा हिप्पो कुठें मारलास ?"

"बेल्जियन कॉंगोंत हिंडत होतों. सोला हॅटची जरूर नव्हती. कारण जंगल इतकं दाट, कीं किरण दिसण्याची पंचाईत! हातांत पांखरं मारण्याची माझी



"मगरीच्या पिलांचं काय झालं?" वहिनींनीं वात्सल्यानें विचारलें. [ पृष्ठ ७१

साधी डबलबॅरलची शॉटगन होती. वाटेंत तहान लागली, नदीवर पाणी प्यायला गेलों. डाव्या हातानें मगरीचीं पिल्लं बाजूला करीत उजव्या हातानें पाणी प्यालों. इतक्यांत एक हिप्पो पाण्यांतून चाल करून आला."

विसू रोडे हिप्पोच्या त्या मुंडक्याकडे पाहूं लागला.

"मीं बंदुक सावरली; पण एवढा मोठा पाणघोडा! एवढ्याशा बंदुकीनें काय होणार त्याचं? तेव्हां आसपास पाहिलं. पलीकडे एक गोरिला माकड छातीवरचे केस ओढीत माझ्याकडे बघत होतं. मला एक युक्ति सुचली. मीं उजव्या खिशांतून पावाचा तुकडा काढला; डाव्या खिशांतून लोण्याची पुडी काढली. मनांतल्या मनांत किरण न पाठवल्याबद्दल सूर्याचे आभार मानले. कारण नाहीं तर लोणी वितळून गेलं असतं. मग पावाच्या फांकीला नीट लोणी लावून ती गोरिल्याला दिली. गोरिला खूष झाला. माझे उपकार फेडण्यासाठीं त्यानें तडकाफडकीं पाणघोड्यावर उडी मारली. हिप्पोचं तोंड नीट दाबून त्यानें त्याचे डोळे फोडले नि ती संधी साधून मीं सटासट गोळ्या झाडल्या. शिवाय मगरींना चिथावलं. तेव्हां त्यांनीं एकतृतीयांश, गोरिल्यानें एकतृतीयांश नि उरलेला मीं असा सबंध हिप्पो ठार केला. मगरी नंतर गोरिल्यावर उलटणार होत्या; पण त्यानें ताडदिशीं उडी मारून झाडाची फांदी पकडली नि माझ्याजवळ येऊन आणखी पाव मागायला लागला. तेव्हां मीं मुकाट्यानें कोट काढून त्याच्यापुढें टाकला नि 'यः पलायते स जीवति' केलं."

"मगरीच्या पिल्लांचं काय झालं?" वहिनींनीं वात्सल्यानें विचारलें.

"तुला कधीं रानटी लोकांनीं पकडलं होतं?" संध्याकाळीं 'वैमानिक हल्ला' पाहिल्यावर रात्रीं लगेच 'तुफानी टारझान' पाहून आलेल्या विसू रोडेनें दुसरा प्रश्न टाकला.

सदूचें पोट एव्हांना भरलें होतें. त्यानें उठून हातबीत धुऊन पुन्हा आमच्या कोंडाळ्यांत येऊन बैठक मारली.

" उत्तर सुदानमध्यें झालं होतं तसं. " पंपूनें मोकळया मनानें कबूल केलें, " माझा स्वाहिली गडी जिंबो नि मी. आम्हांला दोघांना एका बुटकेल्या जातीच्या लोकांनीं पकडलं नि वाजतगाजत भाजायला नेलं. पण त्याच वेळीं तिकडून कांहीं इथिओपिअन सैनिक चालले होते; त्यांना मीं हस्तपल्लवीच्या खुणा करून बादशहाची ओळख दिली. तेव्हां बुटक्यांशीं घनघोर संग्राम करून त्यांनीं आम्हांला सोडवलं. हातपाय बांधलेले होते, त्यामुळें आम्हांला लढाई नुसती डोळ्यांनीं पाहावी लागली. पण तो शहारे आणणारा प्रसंग मी जन्मोजन्मीं विसरणार नाहीं. तुम्हांला इथें बसून 'युद्धस्य कथा रम्याः' ऐकायला काय होतं! माझ्यावर एकेक अशीं संकटं आलीं कीं दर वेळीं दांतखिळी बसायची!"

वहिनी म्हणाल्या, " खरंच, पंपूभावजी, तुम्ही म्हणे कवळी वापरतां! खरं कां हो तें?"

दादा लड्ठेनें बायकोकडे पाहात म्हटलें, " तिचा गैरसमज झाला आहे. तूं लिहिलं होतंस ना एका पत्रांत, कीं एका हबशी मुलीनें आपले दांत पाडले म्हणून. तर हिला आपलं वाटतं, खरेखुरेच दांत पडले! अग, अशी बत्तिशी त्याची कितीक वेळां रंगली असेल!"

" त्याला माणसाचा इलाज नाहीं." पंपू विनयपूर्वक उत्तरला. " कीर्ति म्हटली कीं हीं लचांडं यायचींच मागें. जिकडे जाईन तिकडे मुळीं हबशी काय, हाटेंटाट काय, तरुण सुंदर मुली मागेंच लागायच्या! अगदीं सरदार दरकदारांच्या बरं! (गंभीर मुद्रा करून) त्यांच्या दृष्टीनें बरोबर आहे तें. रानटी मुलखांत राहायचं; परचक्रापासून रक्षण करील असा शूर लढवय्या नवरा मिळण्यासारखा असला तर तो कोणत्या मुलीला नको असेल? पण हा पंपू अजून तरी कनक न् कांता ह्यांच्या मोहांत पडलेला नाहीं."

राकट विषयावरून भाषणौघ आतां नाजूक गोष्टीकडे वळला होता. आमच्या प्रत्येकाच्या विचारांना खाद्य मिळाले होतें...सदूच्याही! इतक्यांत

माधवाश्रमाच्या नोकरानें एक तारांचा गठ्ठा नि दोन तीन पत्रें आणून दिलीं. तारा अर्थात् पंपूच्या अभिनंदनात्मक होत्या. त्या फोडून वाचण्याचें काम दादानें पत्करलें.

पंपूचें मात्र ह्या मानसन्मानाकडे लक्ष नव्हतें. त्याच्या मनांत कांहीं निराळेच विचार चाललेले असावेत असें त्याच्या डोळ्यांतील तेजावरून दिसत होतें. त्याला रिझवावें म्हणून विसू रोडेनें प्रश्न केला, "काय पंपूराव, पुढचा कार्यक्रम काय आतां ? चल, आज सिनेमाबिनेमा बघूं, रेष्टोरांमध्यें खाना खाऊं. विसावा घे तूं. पुन्हा शिकारीला न् सफरीला जायचा बेत नाहीं ना तुझा ?"

"एवढ्यांत नाहीं." पंपूनें सरळ मनानें सांगितलें. "सध्यां खरं म्हणशील तर विश्रांतीच हवी आहे मला. पण आम्ही काय बोलूनचालून सिंदबादसारखीं माणसं ! केव्हां मन फिरेल नि बंदुक खांद्यावर टाकून भटकायला लागूं याचा नेम नाहीं. आणि आयुष्यांत केव्हां ना केव्हां तरी आफ्रिकेला पुन्हा एकवार जाऊन आजपर्यंत कधीं केलं नाहीं असं एखादं जबरं प्रचंड साहस करावं अशी जबरदस्त इच्छा आहे माझी."

"बरं बाबा !" विसू रोडेनें निःश्वास टाकला. नंतर दादा लठ्ठेनें भराभर विद्युत्संदेश वाचून दाखवले. जवळजवळ सर्व एकाच आशयाचे होते. कोणी म्हणत होता, 'शाबास ! नांव केलेस.' कोणी 'हजारों धन्यवाद' तर कोणी 'महाराष्ट्राचा सिंह आहेस !' उलट कोणी 'सिंहाच्या दाढेंतून निघालेल्या शूर वासरा, मायभूमीला आलास !' म्हणून प्रेमाश्रु ढाळले होते. कोणी ताबडतोब गाडी पकडून पाहुणचार भोगायला ये' म्हणून आमंत्रण दिलें होतें. ह्या सर्वांना पंपूनें स्वतः उत्तरें दिलीं आणि दादानें तीं रवाना केलीं. नंतर, एक लिफाफा होता तो स्वतः न फोडतां त्यानें पंपूजवळ दिला. पंपूनें तो फोडून वाचण्यास सुरवात केली. विसू रोडे, सदू शिंत्रे, मी नि दादा लठ्ठे तारांच्या ढिगाकडे नि पंपूकडे आळीपाळीनें कौतुकानें बघत होतों. असें बघतां बघतां आमच्या लवकरच ध्यान्यांत आलें, कीं पंपूच्या चेहऱ्यांत बराच फरक पडत आहे. त्याच्या चेहऱ्याचा तांबडा रंग

जाऊन काळसर दिसूं लागला आणि कांहीं वेळानें तर त्याच्या झुडपी नोकरा-इतका तो काळा ठिक्कर पडला. आम्हीं सर्व आश्चर्यानें त्याच्याकडे बघतों आहों तों काळ्या तोंडावर अधिक भेसूर दिसण्याइतके त्यानें डोळे पांढरे केले. त्याच्या ओठांतून तर फेसच यायला लागला आणि मी त्याला सावरणार तों विसूच्या हडकुळ्या खांद्यावर मान टाकून तो बेशुद्ध पडला!

" अगबाई! पंपूभावजी! पंपूभावजी!" वहिनी किंचाळल्या.

" पाणी! पाणी!!" दादा लट्ठे ओरडला आणि स्वतः उठून इकडे तिकडे धावाधाव करूं लागला. ' हातांत कळसा नि गांवाला वळसा ' ह्या म्हणीची आठवण होऊन मी स्वतःशींच हसलों. कारण पाण्याचा तांब्या तिथेंच स्टुलावर होता.

सदू शिंत्रेनें उठून खिडकीबाहेर मान काढली आणि आरोळी ठोकली, " डॉक्टर! डॉक्टर!!"

ह्या सर्व गोंधळांत पंपूच्या हातांतून पत्र निसटून खालीं पडलें होतें. पंपूवरील प्रसंगाला तेंच कारण असावें असा कयास बांधून मीं तें एकीकडे नेलें आणि भराभर वाचलें.

पत्र पुढीलप्रमाणें होतें—

' चि. पंपूस सप्रेम आशीर्वाद

हें पत्र पोचेल तेव्हां तुझे पाय मुंबईच्या जमिनीला लागलेले असतील. किती दिवसांनीं परत येतो आहेस! आणि तो सुद्धा इतकें मोठें नांव मिळवून! तुझीं एकेक शूरपणाचीं कृत्यें ऐकलीं कीं वाटतें तूं आधुनिक पार्थच! सुखी हो बाबा! माझा म्हाताऱ्याचा तुला आशीर्वाद आहे. हाताखालच्या मास्तरांवर सगळी जबाबदारी टाकतां येत नाहीं रे, नाहीं तर मी स्वतः मुंबईला तुझ्या स्वागतासाठीं आलों असतों.

बरें, आतां पुढचा बेत काय? चांगला सुखवस्तु आहेस. आतां सफरीच्या फंदांत न पडतां स्थाईक हो. तुझ्या फायद्याचा एक सल्ला देऊं? ऐक तर. आमच्या किशीचा आणि तुझा जोडा...'

मला पुढे वाचवेना. लिफाफ्यावरील घोडिवऱ्याच्या छापाकडे मी आ वासून पाहात राहिलों.

# हवाई हल्ल्यांतील बेहोषीची कथा

"स्टॅलिनला मी तीन बार मुजरा करतों."

परंतप परांजपे उर्फ पंपू कम्युनिस्टाला न आवडणाऱ्या शाही थाटांत म्हणाला.

आणि त्याच्या त्या रोमांचकारी उपोद्घातामुळें क्षिप्रेच्या कांठीं जमलेले तमाम चक्रमपूरकर आपली किलबिल थांबवून त्याच्याकडे पाहूं लागले. मीं चटदिशीं सदूकडे नजर टाकली. सदू आपला लांबट चेहरा खाडदिशीं वर करून पाहात होता. दादा लठ्ठेनें आणि मीं दोन समाधानाचे सुस्कारे सोडले.

विसू रोडेप्रमाणें सदूचा चेहरा मूळचा लांबट नव्हता. त्याच्या कर्मानें तो तसा बनला. म्हणतात ना, माणसावर येणारे प्रसंग त्याच्या चेहऱ्यावर अवकळा आणतात! आणि सदूवर आलेला प्रसंग तर दोन बगलांचा होता.

त्यांपैकीं एक बगल सदूनें टाळली होती. पण ती केवढ्या मुष्किलीनें! आणि अजून तरी आपण 'पार' झाल्याची त्याला खात्री कुठें होती? म्हणून तर त्याचा चेहरा असा लांबट झाला होता.

विसूला आणि मला सदूबद्दल अपार अनुकंपा वाटायची! कारण आम्हीं दोघेही अशाच दिव्यांतून पार पडलों होतों. इतकेंच काय, पण पंपूसारखा बहाद्दुर गडीही त्यामुळें बेशुद्ध पडला होता. सदूचा लेचापेचा प्रतिकार अपुरा पडेल अशी आम्हांला धास्ती वाटायची. आमच्यापैकीं कोणाजवळ हजार रुपये असते तर आम्हीं सदूची हौस पुरवून त्याला ह्या पेचांतून सोडवलें नसतें का?

भानगड अशी होती. सदूला एक दुकान उघडायचें होतें. दुकान उघडल्याशिवाय सदूला चैनच पडणार नव्हतें. गेलीं चार पांच वर्षें सदूनें अनेक नोकऱ्या केल्या आणि अनेक सोडल्या. शेवटीं गुदस्ता त्यानें नक्की ठरवलें, कीं दुकान काढायचें. पण जेव्हां भांडवलासाठीं तो लोकांकडे याचना करूं लागला, तेव्हां ज्यानें त्यानें त्याला 'हुडुत्' केलें. बिचाऱ्याला ही गोष्ट फार लागली. पण त्याहीपेक्षां जास्त, त्याला पैसे लागत होते !

सदूचे हाल पाहून त्याचा परम मित्र पंपू ह्यानें तार करून त्याला चक्रमपूरला बोलावलें. आपला किडकिडीत तीन फुटी आफ्रिकन पाईप तोंडांतून काढून पंपूनें त्याचें स्वागत केलें आणि तो म्हणाला, "सदू, तूं सध्या इथेंच माझ्याजवळ ( दादा लठ्ठेच्या घरीं ) राहा. आपण तुझ्यासाठीं भांडवलाची व्यवस्था करूं. चक्रमपुरांत तुझं दुकान कसं शहामृगासारखं चालेल !"

सदू राहिला ... तूर्त तरी शहामृगासारखी रेतींत मान खुपसून. थोड्याच दिवसांनीं पंपू सगळें विसरून गेला आणि सदूलाही आपलें दुःख दोन वेळच्या जेवणांत बुडवावें लागलें.

एक दिवस अचानक घोडिवऱ्याहून दादाला धारूअण्णांचें पत्र आलें. अ. आ. वि. वि. करून त्यांनीं लिहिलें होतें: "तुझ्या घरीं शिंत्रे नांवाचा कोणी तरुण उतरला आहे असें ऐकतों. ऐकीव माहितीवरून तो चांगला होतकरू असावा. त्याला स्वतंत्र धंदा करायचा आहे असें कुणी तरी सांगत होतें. स्वतंत्र धंदे आपल्या देशांत हवेच आहेत...तरी ही सल्ला मशारनिल्हे शिंत्रे ह्यांना कशी काय पटते तें कळव. हुंड्यापरी हुंडा मिळेल आणि किशीसारखी दक्ष बायको मिळून जन्माची भगभग दूर होईल."

सदूसारख्या टीचभर माणसाला पेचांत पाडायला एवढें कारण पुरेसें होतें. वरील पत्र आल्यापासून तीन दिवस सदू बावचळल्यासारखा वागला आणि एखाद्या दारुड्यासारखा चहा प्याला. वहिनींनीं त्याला आवडणारी शिक्रण केली-आणि त्यानें ती पातेलीभर खाल्ली...पण भात समजून ! एकीकडे

किशी आणि एकीकडे दारिद्य त्याला खायला येत होतें. एक मन म्हणत होतें, "घेच तूं उडी!" दुसरें मन सांगत होतें, "भलतेंच! एकदा उडी घेतलीस कीं जन्माचा मेलास!"

पंपूचा मात्र असा सल्ला पडला, कीं "दोन्ही हातांत आत्माराम घे आणि टाकच उडी. हजार रुपयांचा असा मोका पुन्हा थोडाच येणार आहे!"

सदू उसळला, "रावजी, मग घारूअण्णांनीं तुम्हांला विचारलं होतं तेव्हां तुम्हीं कां हो नकार दिलांत?"

त्यावर लिबियापासून केनियापर्यंतचें पाणी प्यालेल्या पंपूनें न डगमगतां उत्तर दिलें होतें, "त्याचं खास कारण कांहीं किशी नाहीं. मला मुळीं लग्नाचाच तिटकारा आहे. किशीला काळी कीं गोरी सुद्धा मीं पाहिलेली नाहीं!"

पण पंपूचा सल्ला सदूनें ऐकला नाहीं. पंपूला तो मोठ्या भावाप्रमाणें मानायचा आणि आपल्या स्वभावाप्रमाणें भ्यायचा! तेव्हां त्याच्याजवळ नुसतीच टोलवाटोलवी करीत सदूनें घारूअण्णांना नकाराचें पत्र तर लिहून टाकलें. त्यानें पत्र लिहिलें तेंही मोठ्या खुबीनें–"आपण देऊं केलेल्या सन्मानाबद्दल आभारी आहें. पण दुर्दैवानें आतां मुहूर्त उरलेले नाहींत. शेवटचा मुहूर्त परवां मंगळवारीं आहे. तो आपल्याला जमणें अर्थात् शक्य नाहीं. आणि माझ्यासाठीं आपण चालढकल करावी हेंही योग्य नाहीं. तेव्हां...इ. इ."

पण पत्र पोस्टांत टाकल्यावर 'आपण दिलेला नकार कमजोर तर नाहीं?' अशी सदूला धाकधूक वाटूं लागली. "सर्व कांहीं या 'मशारनिल्हे'ला पसंत आहे; फक्त मुहूर्त संपले एवढीच चिंता! ठीक आहे. थांबतों आम्ही मार्गेसरापत्तर!" असें म्हाताऱ्यानें उत्तर दिलें तर?... त्यापेक्षां म्हाताऱ्याला स्वच्छ झाडला असता तर?...

पण सुदैवानें, आज मंगळवार दुपारचे तीन वाजून गेले तरी अण्णांकडून कांहीं

उत्तर आलें नव्हतें. त्यामुळेंच चार वाजतां आमच्या सर्वांच्या बरोबर क्षिप्रेच्या तीरावर ‘ ह-ह-हु ’ वर्गाला येण्याजोग्या मनःस्थितींत तो होता. तो आला इतकेंच नाहीं, तर पंपूच्या वक्तृत्वानें इतरांप्रमाणें तोही रंगला हें पाहून आम्हांला समाधान वाटलें.

ह-ह-हु म्हणजे हवाई-हल्ला-हुश्शारी. तिनें बड्या बड्या शहरांप्रमाणें चक्रमपुरावरही आपलें मोहिनी अस्त्र टाकलें होतें. अनेक विक्रमांमुळें विख्यात झालेल्या त्या शहरांत पूर्वी झालेल्या अनेक घालमेलींनाही ‘ ह-ह-हु ’नें मागें टाकलें.

आणि याला कारण युद्ध हिंदुस्थानच्या वेशीवर आलें होतें. आणि म्हणून चक्रमपुरांत हवाई-हल्ला-हुश्शारी वर्ग उघडण्याचें ठरलें. कारण आजकाल युद्धाची तयारी म्हणजे दुसरें काय असतें ? शिरस्त्राण उचलतांना उसासे टाकले तरी चालतील; पण ह-ह-हु बरोबर झालें पाहिजे ! आणि साधी यांत्रिक बंदुक पाहिलेली नसली तरी चालेल; पण ‘ स्टिरप-पंप ’ चा फवारा मात्र प्रत्येक नागरिकानें बरोबर सोडला पाहिजे ! हां हां म्हणतां ह-ह-हु या अक्षरत्रयीनें चक्रमपूर असें व्यापून गेलें, जसें ‘ व्ही ’ या अक्षरानें म्हणे युरोप !

ह-ह-हु वर्गामुळें पंपूची सुप्त प्रतिभा जागृत झाली आणि हवाई हल्ल्यापासून चक्रमपुराचें आबारशिबार बचावण्यासाठीं त्यानें कंबर कसली. “ मला माहीत आहे ह-ह-हु म्हणजे काय तें ! ” तो ताडदिशीं म्हणाला. “ मला पैसे द्या, मी शिकवतों तुम्हांला ह-ह-हु ! ” पैसे अर्थात् त्याला वेतन म्हणून नको होते. उपकरणांसाठीं. लगेच आम्हीं मारुतीच्या देवळांत एकत्र जमून डोकीं घासलीं आणि दुसऱ्याच दिवशीं वर्गणीचे पैसे घेऊन सदू शिंत्रे मुंबईला रवाना झाला. अंदाजापेक्षां त्याला तीन दिवस जास्त राहावें लागलें. परत आल्यावर त्यानें शक्य तेवढी कांटेकोर दृष्टि ठेवून सादर केलेलें बिल बऱ्याच बाचाबाचीनंतर मंजूर झालें. तें असें होतें—

| | रु. आ. |
|---|---|
| प्रवासखर्च ... ... ... | १२–० |
| हॉटेलखर्च ( रोज ३ रु. दरानें ) ... ... | २१–० |
| कोटांत ' आर्प ' कंपनींत उपकरणें घ्यायला गेलों तेव्हांचा खर्च ... | ३–८ |
| आर्प कंपनींतून उतरतांना विजेच्या पाळण्यांत पाय चिमटला तेव्हां डॉक्टरकडे जाऊन मलमपट्टी केली. ... | ५–० |
| चिमटलेल्या पायासाठीं नरम बूट घेतला ... | ७–८ |
| बुटाला पॉलिश ... | ०–२ |
| " ह--ह--हु " चा लघुपट व सोबतचा कार्यक्रम " प्रणयाची झळक " पाहिला. ... | २–६ |
| " ह--ह--हु " मनावर नीट बिंबावें म्हणून आणखी बोलपट पाहावे लागले. ... | ४–८ |
| डोळे दुखले म्हणून बाम घेतला. ... | ०–८ |
| उपकरणीं—( ३ स्टिरप--पंप, एक अग्निशामक द्रवाची बाटली, अमोनिया, स्फोट–शामक, ३ वायुसंरक्षक मुखवटे. ) ... | ५–० |
| एकूण खर्च ... | रु. ६१–८ |

नारळी पौर्णिमेच्या मुहूर्तावर " ह–ह–हु "चा वर्ग उघडण्याचें ठरलें. क्षिप्रेच्या कांठच्या भव्य पटांगणावर आसपासचे लोक येऊन जेठा मारूं लागले आणि मग वाळवंटांतल्या एका प्रशस्त खडकावर क्षिप्रामातेच्या कुशींत पंपूला बसवून आम्हीं त्याला प्रारंभीं बोलायला सांगितलें.

पंपू बोलला. मीं सुरवातीलाच सांगितलें आहे, कीं आपल्या सुरवातीच्याच शब्दांनीं त्यानें सर्वत्रांवर छाप पाडली. त्यानें कुणाला भाऊ म्हटलें नाहीं, कुणाला बहीण म्हटलें नाहीं! हिटलरच्या डुक्करमुसंडीप्रमाणें त्यानें एकदम धडक मारली स्टॅलिनवर! मंत्रमुग्ध नागाप्रमाणें जो तो ऐकायला लागला.

पंपू पुन्हा एकवार ओरडला, " स्टॅलिनला मी तीन दफे मुजरा करतों....कां ?

तर तो अस्सल मराठा आहे!...(ऑ ?–सभेंत कुजबुज )–मराठ्यांचा गनिमी कावा त्यानें सही सही उचलला आहे. (टाळ्यांचा कडकडाट) त्याची 'जाळून पोळून पळून जा' नीति म्हणजे काय ? हेंच ! मी हबसाणांत होतों तेव्हांची गोष्ट आहे..."

ह्या ठिकाणीं 'हरे राम!' म्हणून श्रोते कुजबुजूं लागले. पण त्यांच्या विरोधाला न जुमानतां पंपूनें अर्धा तास आपल्या आवडत्या आफ्रिकेंतील अनुभवांचा पाढा वाचला आणि अखेरीस तो म्हणाला, "टोळांसारखींच विमानंही येतात नि टोळधाडींतल्यांप्रमाणेंच विमानधाडींत वागायचं असतं. टोळ आले कीं सर्वांना झोपडींतून दडावं लागतं. ह्याच तत्त्वावर ह-ह-हु शिक्षणाची उभारणी केलेली आहे. लपून बसणं हें तत्त्व त्यांत दडून बसलेलं आहे." इतकें बोलून पंपू दम लागून खालीं बसला.

मग गांवांतला एक प्रतिष्ठित इसम ह्या नात्यानें दादा लट्ठेनें चार शब्द सांगितलें. तो म्हणाला "पंपूसाहेबांचं बहुमोल भाषण आपण ऐकलंच आहे. त्यांची मगरमिठी 'ह–ह–हु'वर बसली आहे आणि शेवटपर्यंत ते ह्या विषयाचा पिच्छा सोडणार नाहींत अशी माझी खात्री आहे. (टाळ्या) हवाई हल्ल्याचा प्रत्यक्ष अनुभव त्यांनीं घेतलेला आहे, आणि त्या अनुभवाचा फायदा आपल्याला ते आतां रोज क्षिप्रातीरीं देणार आहेत."

नंतर 'ह-ह-हु'कडे दादाही वळला. त्यानें विचारलें, "आमच्याकडे बचावाचीं हत्यारं आहेत कुठें आज ? जें असेल त्यांच्यावर भागवायचं. जुन्या वाड्यांत गंजून पडलेली मोडकी तोफ ही आमची हवाई-हल्ला-विरोधिका नि पोरांची बेचकीं म्हणजे यांत्रिक बंदुका ! त्याच पोरट्यांच्या कृपेनें चक्रमपुरावर पतंगांचं जें अखंड छत्र पसरलेलं असतं तो आमचा बलून–बराज ! (हशा) पण हीं झाली गंमत. आलींच समजा विमानं, तर तुम्हीं काय करावं, कुठें दडावं, कसं पडावं, नि पडतांना लागलंच तर कितपत रडावं हें सगळं पंपूसाहेब तुम्हांला ह्या मालेंत सांगतील. बचावाचीं मुख्य कामं अर्थात् तुम्हीं निवडून दिलेले तुमचे प्रतिनिधि करतील. त्यासाठीं आपले मित्र सदोबा शिंत्रे ह्यांनीं आपला

अमूल्य वेळ खर्चून ( हः ! ) पुष्कळ मेहनत घेऊन ( हः ! ) मुंबईहून मुखवटे, पिचकाऱ्या वगैरे साधनं आणलीं आहेत. ( हूः ! ) ह्या मुखवट्यांचं खातं माझ्याकडे सोपवायचं ठरलं आहे ( टाळ्या ). विद्युत्‌नियंत्रण खातं आपले यंत्रज्ञ विसोबा रोडे ह्यांच्याकडे राहील. आग विझवण्याचे फवारे शिंत्रे महाशयांकडे दिले आहेत...."

इतक्यांत सभास्थानाच्या एका कोपऱ्यांत थोडासा गोंधळ माजला. दादाच्या घराकडून दौडत येऊन एका पोऱ्यानें सदू शिंत्रेच्या हातांत एक मळकट बदामी कागद दिला. सदूनें त्याच्यावरून नजर फिरवली. दुसऱ्याच क्षणीं त्याला फेपरें येणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं. त्यानें डोळे फिरवले आणि त्याचीं बोटें ढिलीं पडून कागदही निसटला आणि वाऱ्यावर उडून दूर दूर दिसेनासा झाला.

" काय रे सदू ? " म्हणून मीं विचारलें. तेव्हां कांहींतरी बरळून तो बेशुद्ध पडला. स्वयंसेवक धावून आले आणि त्यांनीं त्याला उचलला. दादानें माझ्याकडे पाहिलें. मीं दादाला सुचवलें, कीं भाषण बेशक चालू ठेव. साधा सन-स्ट्रोक आहे.

आणि विसू रोडेला सदूबरोबर घरीं पाठवून मीं पुन्हा सभेकडे लक्ष पुरवलें. माझ्या या कर्तव्यबुद्धीचें पंपूलाही कौतुक वाटलें.

"हं..." दादा पाणी पिऊन पुढें म्हणाला, "तर...तर...ही झाली कामाची वाटणी. जेव्हां हवाई हल्ल्याची घरघर होईल तेव्हां शीळवादनाबद्दल नांवाजलेले आपल्या गांवचें आणखी एक भूषण—कुमार सणसणे—तोंडांत बोटें घालून आपल्या गांवाला इषारा देतील. मग तुम्ही धावत आसराघरांतून घुसायचं..."

"तिथें..." पंपू एकदम उठून म्हणाला, "तुम्हांला हवं नको तें दाखवायला मी तयार असेनच. कारण आसराखातं माझ्याकडे राहायचं आहे."

" पण आसराघरं आहेतच कुठें ?" एक सुशिक्षित गृहस्थ प्रश्नाळले.

पंपू धीरोदात्तपणें म्हणाला, "आसराघरं नाहींत म्हणून हातपाय का गाळायचे आहेत ! अरे, इच्छा आहे तिथें मार्ग आहे. जरा विचार कराल तर चक्रमपुरांत पुरेशीं आसराघरं आहेत असं तुम्हांला आढळेल."

दीड एक मिनिट श्रोते विचार करीत होते. नंतर...

**एकजण :** लखमल मारवाड्याचं तळघर !

**दुसरा :** जुन्या वाड्यांतून निघालेलं भुयार ...!

**तिसरा :** पण तें ढमळाकाकूंच्या खाणावळींत निघतं म्हणे ! आगींतून निघून फुपाट्यांत पडण्यांत काय अर्थ आहे ?

**चौथा :** बोंगळाई मातेचीं लेणीं !

पंपू उत्तेजून म्हणाला, "पाहिलंत ? एक नाहीं, चार वाटा निघाल्या. अहो, इतकंच काय, पण तुम्हांला नाहीं कुठें दुसरीकडे जायला मिळालं तर..." असें म्हणून तो थांबला, वळला, वाकला आणि त्यानें आपले दोन्ही हात तो बसला होता त्या उंच खडकाखालच्या कपारींत नेले. खडकाच्या कपारीखालीं गुहेसारखें एक मोठें भगदाड होतें.

अशा अनेक भगदाडांनीं क्षिप्रेचें ऐलतीर नि पैलतीर अगदीं खचलेलें नि खोदलेलें होतें. बॉबमाऱ्यापासून बचाव करायला ह्या निसर्गसिद्ध आसऱ्यासारखी दुसरी जागा सापडणें अशक्य होतें.

त्या कपारीखालीं कसें लपावें ह्याचें प्रात्यक्षिक पंपूला दाखवायचें होतें कीं काय नकळे ! कारण पुढें तो जें कांहीं बोलणार होता नि करणार होता तें जागच्या जागीं जिरलें. "ळ...ळ...ळ...बृ !—अ...य...इ..." असें कांहींतरी असंबद्ध बरळून त्यानें आपला हात झटक्यासरशीं मागें ओढला. दाढीनें

भरलेला त्याचा चेहरा पांढराफटक पडल्याचा संशय येत होता. त्याच्या हातावरचीं रोमटें साळूच्या काट्यांसारखीं ताठ उभीं राहिलीं होतीं आणि पावसांत नुकत्याच न्हालेल्या वृक्षानें जलबिंदु झटकावेत तसा त्याच्या कांपणाऱ्या आंगांतून घाम टिपकत होता.

आणि ह्याला कारण बेडूक! चांगलाच मोठा म्हणजे नारळाएवढा होता तो. कदाचित् बेडकुळी असेल न् गाभण असेल. कदाचित् बैलाशीं चंग बांधणारा तो इसापनीतींतला वीर असेल.

पंपूचा हात कपारीखालीं जातांच हा बेडूक विद्युद्वेगानें टुणदिशीं बाहेर येऊन आपल्या टोलेजंगी डोळ्यांनीं पंपूकडे पाहात होता. मग त्यानें इकडे तिकडे तांडव घातलें.

हें चित्र आम्हीं क्षणभरच पाहिलें आणि मग पंपू कोलमडून क्षिप्रेंत पडला.

पंपू पडला आणि इकडे चक्रमपूरला घरघर लागली. अगदीं खरीखुरी शंभर टक्के घरघर लागली. त्या घरघरीनें अस्मान व्यापून थैमान उडवलें. ती एका राक्षसी पक्ष्याची घरघर होती...मानवनिर्मित राक्षसी पक्ष्याची !

चक्रमपुरावर हवाई हल्ला आला होता !

त्या वेळीं जिकडे तिकडे उडालेल्या कल्लोळाचें नीट वर्णन करायला माझी लेखणी असमर्थ आहे. एवढेंच सांगतों, कीं कुणाचा पायपोस कुणाच्या पायांत उरला नाहीं. दाही दिशांना हाहाःकार उडाला. ते प्रथमोपचार दळांतले स्वयंसेवक, ते मुखवटावाले वीर नि ते स्टिरप-पंपच्या गोष्टी करणारे आगविझवे ह्यांनीं प्रथम जर कोणता उपचार केला असेल तर तो पळ काढण्याचा. हां हां म्हणतां विषारी धुराऐवजीं पायदळींच्या धुळीनें अस्मान व्यापून गेलें. वाचेंतलें आणि कृतींतलें अंतर दाखवण्यासाठींच कीं काय थोड्याच वेळांत क्षिप्रेच्या अफाट वाळवंटांतील त्या सभास्थानांत फवाऱ्याचे

पंप, भेसूर मुखवटे आणि अग्निशामकाच्या बाटल्या ह्यांशिवाय दुसरें कांहीं उरलें नाहीं !

आवंढ्यामागून आवंढे गिळीत आणि पडणाऱ्या दादा लट्ठेला सावरीत मीं वर पाहिलें आणि " एकच विमान दिसतंयू रे " असें जरासा जोर येऊन म्हटलें.

दादानें भीत भीत वरतीं नजर टाकली. " आपल्या गांवाला तेवढं पुरें आहे. आतां कसं करायचं रे ? " तो रडत म्हणाला.

" कसं करायचं ? " मी आवेशानें म्हणालों. " आसराघरांत लपायचं. आमचे लोक म्हणजे एकजात बेअकली आहेत. आपल्याच बैठकीखालीं आसराघर आहे न् हे वेडे लोक इथून पळताहेत ! "

घर्...घर्...घर्...

दादा लट्ठे बावरून म्हणाला, " मग चल किशा ! आतां वेळ कां घालवतोस ? दडूं या तरी ह्या कपारीखालीं ! हीं बिनमोल आसाराघरं पंपूनें आपल्याला दाखवलीं आहेत. बिचारा गांवावर एवढे उपकार करून स्वतः मात्र हुतात्मा बनला. "

" काय दादा कांहींतरी बडबडतोयूस रे ! " मी त्याच्या तोंडावर हात ठेवून म्हणालों. " हुतात्मा कसला नि काय कसला ! तो पंपू तरंगतोय् पाण्यांत...पण चल. तूं अगोदर कपारींत लप नि मग मी पंप्याला सोडवतों. "

असें म्हणून मी दादा लट्ठेला खेचून त्या कपारींत नेला आणि मग नीट काचा मारून क्षिप्रेंत उडी टाकली.

" संभाळ बरं का !...नीट हात मार...माझ्या पंपूला सोडव...वरचं विमान बघ..." दादा कांठावरून इषारे देऊं लागला. पण तिकडे दुर्लक्ष करून मी पाणी कापीत पंपूजवळ पोचलों. तो घाबराघुबरा होऊन एका शेवाळाशीं झगडत होता.

मोठ्या प्रयासानें मीं त्याची सोडवणूक केली आणि मग त्याचा देह घेऊन वर आलों. पंपूला आम्हीं कपारींत निजवला तोंवर त्याची शुद्ध गेली होती.

मी कपारीखालून एखाद्या सशासारखी टुणकन् उडी मारली नि खडकावर पडलेली अमोनियाची एक बाटली घेतली. कानठळ्या बसवणारी विमानाची ती घरघर थांबल्याचें माझ्या कानांनीं तेवढ्यांत पुसटपणें नमूद केलें. मी बाटली घेऊन झपाट्यानें खालीं आलों नि पंपूला अमोनिया हुंगवला. पंपू शुद्धीवर आला. त्यानें आमच्या गळ्यांभोंवतीं हात टाकले. मग आठवल्यासारखें करून त्यानें घाबऱ्याघुबऱ्या सभोंवार पाहिलें.

"ब...ब...ब..." तो बोबडला. "बे...डू...क..."

"बेडूक नाहींत बरं आतां." दादा त्याची समजूत घालीत म्हणाला.

आणि मग आकाश निरभ्र पाहून एकीकडे नवल करीत, एकीकडे समाधान मानीत, भिजलेल्या पंपूला दोन्ही बगलांत धरून आम्हीं अडखळत अडखळत घराकडे नेला. वाटेंत राहून राहून माझ्या मनांत त्या विमानाबद्दलचे विचार येत होते. झालें कुठें तें गडप ?

शुकशुकाट झालेल्या त्या गांवांतून आम्हीं पंपूची वरात घराकडे नेली. चक्रमपुरावर प्रेतकळा आली होती. दारें, खिडक्या, शटर, झरोके, सगळे लिंपल्यासारखे बंद झाले होते !

दादा लट्ठेच्या घरीं पोचलों तों दार बंद ! दार ठोकलें, खडखडावलें आणि मग पंपू नि दादा या दोघांचे देह दारावर रेटून त्याचा विध्वंस केला. आंतल्या अंधारांतून विसू रोडेचें सकंप आव्हान आणि मग कोसळलेली एअर-गन ऐकूं आली. "कोण येतंय् तें ? द-द-दुष्मन् कीं दो-दो-दोस्त ?"

आम्ही तिघे मिळून एकसुरांत ओरडलों, "दोस्त!" आणि त्यानें दचकून विसू रोडे खालीं पडला. पण पडतांना त्याचा हात स्विचला चाटून गेल्यामुळें दिवे लागून चक्क उजेड पडला.

"ह-हः-हुः! तूं तरी आहेस का रे आतां शुद्धीवर?" मीं विसूला वारा घालीत विचारलें.

"ह-हःहुः!" विसू एक मुक्ततेचा श्वास सोडून म्हणाला. "म...म...मला वाटलं, श...श..."

"शत्रूबित्रू कांहीं नाहीं." दादानें त्याला आश्वासन दिलें. "आम्हीं केव्हांच त्याला पिटाळून लावला."

"आम्हीं दोघांनीं हातवारे केले. ते होते मॉर्स सिग्नलिंगचे. शत्रूनें त्याचा अर्थ घेतला, कीं 'चक्रमपुरांत कांहीं अर्थ नाहीं. कूच करा.' आणि कूच केलन् त्यानें!"

"म्हणजे तुम्ही पांचव्या खांबांतले आहांत कीं काय?" विसू आपली एअरगन शोधीत म्हणाला, "सूर्याजी पिसाळ..."

पंपूला हें कांहींच समजेना. तो अचंबून आमच्याकडे पाहूं लागला.

"कांहीं नाहीं. कांहीं नाहीं." मीं म्हटलें, "त्या विमानहल्ल्याचा फैसला आपण मग करूं..."

"आलं होतं रे एक विमान. स्वस्तिक पाहिलं नि लोक भेदरले! शेळपट लेकाचे!...पण तें जाऊं दे. पंपू, तूं पडून राहा बरं. तुझं कपाळ बरंच फुटलं आहे."

पंपूला कपाळाचें स्मरण झाल्यावर मात्र गरगरल्यासारखें झालें. त्यानें

कपाळाला हात लावला. आम्हीं त्याला सावरून माजघरांत नेलें. तिथें दोन खाटा टाकलेल्या होत्या. एकीवर सदू निजलेला होताच. दुसरीवर लवकरच पंपू पडला. मग पुन्हा त्याची शुद्ध गेली. दादा ब्रॅण्डी आणायला आंत धावला. हें बेशुद्ध पडण्याचें आतां सदाचेंच झाल्यानें मी नुसताच उभा राहिलों. वहिनी सदूला चमच्याचमच्यानें लापशी पाजीत होत्या. त्या म्हणाल्या, " आज आहे काय बाई ! पंपूभावजींना काय झालं आतां ? "

लापशीचें भांडें खालीं ठेवलें आणि पंपूची मलमपट्टी करायला त्या आंत निघून गेल्या. तेव्हां मीं म्हटलें, " वहिनींचे बिचाऱ्यांचे हाल आहेत. पण काय रे सद्या, तुला काय झालं एकदम बेशुद्ध पडायला ? "

सदूनें मुकाट्यानें उशाखालचा एक कागद काढून थरथरत्या हातांनीं माझ्याजवळ दिला.

" उ...उ...उडत आली ती घराकडे. "

" कोण ? "

" ही...उडाली होती ना !...पण पाठच सोडीना ! त...त...तारूअण्णांची घार ! "

मीं तार वाचली. ती अशी होती—

" मंगळवारचा गोरज पकडा. किशीला घेऊन विमानानें येतों. "

अस्सें ! एकूण घारूअण्णांचें विमान तें म्हणायचें ! ठीक. म्हणजे अण्णा एव्हांना तळावर उतरून किशीसकट घराच्या मार्गालाही लागले असतील !

माझ्या मनांत एवढे विचार येत आहेत तों दरवाजांतून आमच्या ओळखीचा

गगनभेदी आवाज आला—

" काय रे पोरांनो ! छत्तीसगुणी मुहूर्त काढला मीं, नि गांवांत पाहातों तों हरताळ जिकडे तिकडे ! ही काय भानगड आहे म्हणतों मी ! "

दादा पंपूच्या घशांत ब्रँडी ओतीत होता तोंवर मी झपाट्यानें बाहेर धावलों आणि घारूअण्णांना तिथेंच रोखून म्हणालों, " अण्णा ! तुम्ही काय म्हणतांय् तें स्पष्ट ऐकूं येतंय् ! जरा हळू बोला. अगदीं शांत. खोलींत दोन पेशंट आहेत. त्यांना जरा सुद्धा आवाज सहन होत नाहीं. "

अण्णा बावरले. " पेशंट ?...काय आहे हें किशा ? म्हणतोस काय तूं ? कुठला पेशंट ? तुमच्याकडे कुठून आला ? दादा कुठांय् ?...सूनबाई कुठांय् ? "

" सगळीं जागेवर आहेत. पण अण्णा, कृपा करून आत्तां एक अक्षर बोलूं नका....कृष्णाबाई, तुम्ही आंत चला. "

प्रवासामुळें केस जास्तच पिंजारले आहेत आणि डोळे तारवटले आहेत अशी ती महामाया अण्णांच्या मागें उभी होती. ह्याशिवाय तिचें अधिक वर्णन करायला शब्द नाहींत. तंट्या भिल्लाप्रमाणें किशीचें नांव घोडिवऱ्याच्या पंचक्रोशीची भीति बनलें होतें. किशीला घेऊन घारूअण्णा येताहेत असा सुगावा लागला रे लागला, कीं उपवधू तरुण आसराघरांत तोंड लपवायचे ! ' आलबेल ' चा इषारा मिळेपर्यंत त्यांच्या माना कधीं वर व्हायच्या नाहींत !

असंख्य दांत्यांची साखळी फिरावी तसे किशीनें क्षणभर दांत विचकले आणि मग तिचा रणगाडा पुष्कळसा आवाज करीत आंत निघून गेला.

" किशा...किशा..." अण्णा चाचरले. " अरे हें काय ? कोण आजारी आहे ? अरे, मी ज्या कामासाठीं एवढा पैसा खर्चून आलों, कधीं नव्हे तो ह्या विमानाचा अचाट प्रवास केला, त्या कामाचं कसं काय ? नवरदेव

कुठें आहेत ?"

"अण्णा !" मी चांगलाच गरम होऊन ओरडलों, "तुमचा नवरदेव तुम्हांला जिवंत हवा असेल..."

"किशा !"

"बसा खालीं,...जिवंत हवा असेल, तर आजचा दिवस लग्नाचं नांव काढूं नका. गूळपाणी घ्या नि आराम करा."

"पण...मुहूर्त..."

अण्णांचें तोंड बंद करायला एकच उपाय मला दिसला. स्टुलावरचा तांब्या उचलून मीं त्यांच्या घशांत घटघटां पाणी ओतलें.

थोडी सामसूम झाल्यानंतरची गोष्ट आहे. अण्णा आपल्याशींच जळफळत एका कडेच्या खोलींत बसले होते. किशीला कांहीं तरी काम सांगावें म्हणून वहिनींनीं तिला एका कपांत लापशी देऊन पंपूकडे पाठवलें होतें. पंपू नुकताच शुद्धीवर आला होता. दादा टोपी घालून घारूअण्णांच्या आगमनापूर्वीं गांवांत 'आलबेल' द्यायला गेला होता, तो अजून परत आला नव्हता. मी असाच इकडे तिकडे करीत होतों. इतक्यांत अण्णांची स्वारी तडकाफडकीं कांहीं तरी निश्चय करून उठलेली मला दिसली. इकडे तिकडे डोकावल्यासारखें करून ते घाईघाईनें 'रोग्यां'च्या खोलीकडे गेलेले मीं पाहिले. त्यांना रोखणें आतां शक्य नव्हतें.

"कोण ?...पंपू ?" खोलींत शिरल्याबरोबर ते म्हणाले, "तूं...तूं...तूं का तो पेशंट ?...आणि..." डोळे बारीक करून म्हणाले, "तें दुसरं कोण ?"

"तो आहे सद्या शिंत्रे. पण घारूअण्णा, तुम्ही इकडे कधीं आलांत ?"

पण घारूअण्णांचें तिकडे आतां लक्ष नव्हतें. ते हळुहळू सदूच्या शय्येकडे गेले आणि त्याच्या चेहऱ्याकडे नीट पाहूं लागले. सदू मेल्यागत पडला होता.

" च्...लागलंय् कीं काय त्यांना फार ? "

" कांहीं नाहीं हो अण्णा. " पंपू मध्येंच म्हणाला. " चक्कर प्राणी आहे तो, असाच मधून मधून बेहोष पडतो. होईल बरा. "

" होईल ना ? " अण्णांनीं एक श्वास सोडला. " हूंः ! पण सहा तर वाजले आत्तांच..."

अण्णांनीं पुन्हा तो विषय काढूं नये म्हणून मी खोलींत शिरलों. पंपूच्या बिछान्याजवळ स्टूल घेऊन त्या वेळीं किशी बसली होती आणि चमच्याचमच्यानें त्याला लापशी पाजीत होती. मध्येंच तिनें लापशीचें भांडें खालीं ठेवलें आणि पंपूचें घसरत चाललेलें बँडेज सारखें केलें.

पंपूनें तिच्याकडे पाहिलें. " छान झाली आहे लापशी. " तो म्हणाला.

किशीनें लाजल्यासारखें आणि इतरांना लाजवणारें हास्य केलें.

" माझ्या किशीला ओळखत नाहींस पंपू तूं ? नवल आहे ! " अण्णा म्हणाले.

" कृ...कृ...कृष्णा...."

इतक्यांत लापशीचा चमचा आल्यामुळें पंपूला आपलें वाक्य गिळावें लागलें. शेवटीं लापशी संपल्यावरच तो म्हणाला, " कृष्णाबाई का ह्या ? ओः ! मला ठाऊकच नव्हतं. नाहीं तर...च् ! " एवढेंच बोलून त्यानें जीभ चावली. एखाद्या अपराध्यासारखा दिसत होता तो.

" च् कां केलंस ? " अण्णानीं विचारलें.

" कांहीं नाहीं...कांहीं नाहीं..." पंपू म्हणाला. तेवढ्यांत किशीनें त्याच्या पायाजवळचें पांघरूण उलगडून त्याच्या आंगावर टाकलें.

" घ...घ...घारूअण्णा, आतां समजलं तुम्ही कां आलांत तें !... कृ-कृ-कृष्णाबाईच्या लग्नासाठीं...होय ना ? "

" होय. " अण्णा खिशांतलें लठ्ठ घड्याळ काढून म्हणाले. " सव्वासहा वाजले. गोरज धरलाय् आम्हीं उभयतांच्या मतानें. पण काय रे किशा, जावईबुवा उठतील ना आतां ? "

" उठतील ! " मी बेडकासारखे डोळे वटारून म्हणालों. आणि मग पंपू पुन्हा डोळे फिरवीत होता म्हणून त्याच्याकडे नजर वळवली.

" तुला चक्कर येतेय् पंपू ? " प्रथमच त्याच्या कपाळावर हात ठेवून घारूअण्णांनीं विचारलें. " किशे, बाळ, आपली ती बॅग उघडून वैद्यबुवांनीं दिलेली गोळयांची डबी काढ ग. "

किशीनें कोपऱ्यांत टेवलेली बॅग उघडली. त्याच वेळीं बॅगेंतला भोकाभोकांचा पत्री डबाही उघडून बाहेर पडला. किशीनें तो पायानें दूर केला. त्या वेळीं अण्णांचे डोळे मला तांबारलेले दिसले. किशीनें गोळयांची डबी काढून एक गोळी पंपूला दिली. पंपूनें तिच्याकडे पाहात ती गिळली आणि वर तिनेंच दिलेलें पाणी तो प्याला.

" ड्रांव...ड्रांव..."

किशीकडे पाहातां पाहातां पंपू थबकला. त्याच्या हातांतलें भांडें गळून पडलें आणि घशांतलें पाणी गळ्गळ् घर्घर् करूं लागलें.

" ड्रांव...ड्रांव..."

" क...क...काय..." पंपू डोळे पांढरे करून म्हणाला, " ब...ब... बेडूक..."

बेडकुळीच होती ती. भोकाभोकांच्या डब्यांतून तिनें टुणकन् उडी मारली होती आणि आतां इकडून तिकडे नि तिकडून इकडे ती कुदत होती.

पंपू घामानें भिजला. मला त्याचे हाल पाहावेनात. त्याची बोबडी वळली होती नि तो पुन्हा बेशुद्ध पडणार अशीं लक्षणें दिसत होतीं. हा प्रकार आमच्या लक्षांतच येईना. आम्ही सगळे गोंधळून गेलों. किशीला हाक मारीत आलेल्या वहिनी दारांतच उभ्या राहिल्या. मीं सूक्ष्म नजरेनें पाहिलें. बेडकुळीच्या एका तंगडीला सुतळ बांधलेली स्पष्ट दिसली.

इतक्यांत किशीनें वाघिणीसारखी झडप घातली. डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच तिनें ती सुतळ पकडली आणि खेचत खेचत बेडकुळीला बॅगेपाशीं नेलें.

मीं अण्णांकडे प्रश्नार्थक मुद्रेनें पाहिलें. म्हातारा खचला होता. एवढा मोठा, हाताखालीं चार मास्तर वागवणारा शाळाधिकारी; पण त्यानें कपाळावर हात मारला होता. त्यानें सदूकडे एकवार भीत भीत नजर फेकली आणि मला हळूच म्हटलें, " कार्टीसाठीं रक्ताचं पाणी करावं मीं; पण आयत्या वेळीं ही पोरगी अवसानघात करून इंप्रेशन घालवते!...किशा, जावईबापू उठले नाहींत ना अजून ? ठेव, निजवून ठेव त्यांना तसेच. क्लोरोफॉर्म दे. पण हा तमाशा नको दिसायला..."

" पण अण्णा, मुहूर्त ? "

" मुहूर्ताचा बाप धरीन. उद्यां लावील लग्न हा घारूअण्णा घोडिवरेकर ! " आणि धीरोदात्त पावलें टाकीत म्हातारा बाहेर निघून गेला.

बेडकुळी बॅगेंत टाकल्यावर, कांहींच झालें नाहीं अशा आविर्भावात किशी पुन्हा रुग्णशय्येजवळ आली.

" ललडीला बाळगलंय् मीं अगदीं शेंपटाची होती तेव्हांपासून. ललडी फार फार चांगली आहे. कुणाला कांहीं करायची नाहीं कध्धीं. पण आमच्या अण्णांना आवडत नाहीं. ते म्हणतात, ' बेडकुळी कसली बाळगायची ! ' पण त्यांत हो काय झालं ? जसा कुत्रा तसाच बेडूक. " असें म्हणून तिनें पंपूचा घाम पुसला.

" पण...पण... " पंपूचा ' आ ' अजून वासलेलाच होता. " पण तुम्ही भीत नाहीं तिला ? "

" भीत ? " असें म्हणून किशीनें दांत विचकले. " भ्यायचं कशाला बाई...? ती काय, खाते थोडीच आपल्याला ? " आणि मग किशीनें एवढें अचाट हास्य केलें, कीं मी थोडासा गांगरून मागें सरकलों.

हें सगळें चाललें होतें तेव्हां सदूची कांहींच हालचाल नव्हती. उलट कुशीवर तोंड करून तो पडला होता.

" मीं...." पंपू आदरमिश्रित भावानें किशीकडे बघत म्हणाला, " मीं पाणघोडे, मगरी नि जिराफ ह्यांच्या शिकारी केल्या आहेत. पण बेडूक म्हटला कीं माझ्या आंगावर कांटा उभा राहातो ! "

नंतर बराच वेळ त्याची नजर एकाग्रतेनें किशीकडे लागली होती. मी जवळच उभा आहें हें लक्षांत येऊन त्यानें स्वतःला सावरलें असावें. मग त्यानें नुसताच एक निःश्वास सोडला. पंपूवरील हा अचाट प्रसंग वहिनींनीं अथपासून इतीपर्यंत पाहिलेला होताच. त्यांनीं आतां जरा दरडावून सांगितलें, " पंपूभावजी, तुम्ही आतां स्वस्थ पडा पाहूं. सारख्या कसल्या मेल्या शिकारीच्या गोष्टी ! आणि आतां कुणीं म्हणतां कुणीं इकडे रोग्यांना त्रास द्यायला

यायचं नाहीं! भावजी, चला! ...किशे..."

लापशीचें भांडें आणि चमचा घेऊन किशी माजघराबाहेर जाईपर्यंत पंपू तिच्याकडे रोखून बघत होता. मग तो उठून बसला.

मला वाटतें, मीही खोलीबाहेर गेलों असा त्याचा समज झाला असावा. वास्तविक मी खोलींतच होतों. पण जरा कडेला कपाटाजवळ उभा होतों; आणि तिथें बराच काळोख असल्यामुळें पंपूला किंवा सदूला मी दिसणें कठीण होतें. त्यामुळें आडून ऐकण्याची इच्छा नसूनही पुढें त्यांचा झालेला संवाद माझ्या कानांवर पडला.

पंपूनें कांहीं तरी ठाम निश्चय केल्यासारखी मुद्रा केली. तो उठला आणि दबा घेत जाणाऱ्या चित्त्यासारखा सदूच्या बिछान्यापाशीं गेला.

"सदू!"

"कोण?" सदू सातव्या सुरांत किंचाळला. त्याची प्रकृति फारच नाजूक झाली होती. पण त्याच्यांत धुगधुगी होती हें उघड दिसलें. पंपू थोडा मागें होऊन म्हणाला, "अरे, कुणी नाहीं रे! मी—पंपू—"

"काय हवंयू तुला?" सदूनें घसा फोडून विचारलें.

"तूं असा एकेरीवर कां येतोस?" पंपू म्हणाला, "सदू, तूं नि मी दोस्त नाहीं कां? माझ्यावर असा गुरकावतोस? आपण चौथ्या यत्तेंत असतांना...."

"तुला काय सांगायचंयू?" सदू खेकसला.

"मला विचारायचंयू..." पंपू धीर करून म्हणाला, "कीं...कीं...तूं लग्नाचं नक्की ठरवलंस का अगदीं?"

“ अर्थात् ! ” सदूनें बेंबीच्या देठापासून किंकाळी ठोकली.

“ कांहीं झालं तरी तूं हें लग्न करणारच ? ”

“ हें लग्न म्हणजे काय ? ” सदूनें संतापून विचारलें.

“ हें...कृष्णाबाईशीं लग्न ?... ”

“ बेशक ! ! ” सदू दांतावर दांत दाबून किंचाळला.

“ हूं ! ” पंपूनें एक दीर्घ सुस्कारा सोडला.

सदूला बिचाऱ्याला हा प्रकार कांहीं समजतच नव्हता. गुरफटून घेतलेलें पांघरूण दूर करून तो बावळटासारखा पंपूकडे पाहात होता. किशीची दहशत, मनांत उसळणारा सात्त्विक संताप आणि त्यांत पंपूच्या विचित्र वर्तनाची भर ह्यांमुळें सदूच्या लहानशा मेंदूची फारच दुर्दशा उडालेली दिसली.

कांहीं वेळ पंपूही गप्प होता. नंतर त्यानें सदूच्या खांद्यावर हात ठेवला.

“ सदू... ” तो घोगऱ्या आवाजांत म्हणाला, “ तुला हा विचार रद्द केला पाहिजे. ”

“ काय म्हणून ? ” सदूनें हट्टाला पेटून विचारलें.

“ कारण...कारण... ” पंपू जास्तीच घोगरा बनून म्हणाला, “ तुझं किशीवर प्रेम नाहीं. ”

“ शहाणा आहेस ! ” सदू चिडून म्हणाला. “ तुला काय कळतंय् त्यांत ! माझ्या प्रेयसीबद्दल बोलूं नको भलतंसलतं ! ”

हें वाक्य बोलतांना सदूनें आणलेलें चंद्रबळ त्याच्या ओढलेल्या आवाजांत उमटलें होतें.

"प्रेयसी?" पंपू म्हणाला. "ती तुझी प्रेयसी नाहीं, सदू! तूं पक्कं जाणून आहेस तें. ती...म-म-माझी प्रेयसी आहे."

"पं...पू!"

"माझी प्रेयसी आहे." पंपू जोरांत पण एकेक शब्द नेटानें तोंडांतून काढीत म्हणाला. "मी गद्धा म्हणून पायाशीं चालून आलेलं रत्न लाथाडलं. मला किंमत कळली नाहीं रे सद्या...किंमत कळली नाहीं. सदू, माझं तिच्यावर प्रेम जडलं आहे. तूं सोड ना रे तिचा नाद मित्रासाठीं!"

"आणि माझं दुकान कसं थाटेल? पैसे कोण देणार मला...तुझा सासरा?"

"बरोबर सांगितलंस!" पंपू एकदम उत्तेजित होऊन म्हणाला. "माझ्या गळ्याची शपथ, सदू. घारूअण्णा तुला हजार रुपये हुंडा देणार होते ना... मला ते थोडा जास्तही देतील. मागेंच त्यांनीं कबूल केलं होतं...कांहीं झालं तरी मी आहे आफ्रिका-रिटर्न्ड!"

सदूनें खालचा ओठ गोरिलासारखा पुढें करून पंपूकडे पाहिलें.

"तेव्हां त्यांतले हजार रुपये तुला दुकान थाटायला नि वरचे पांचशें रुपये तूं मित्राखातर एवढी झीज सोसतोय्स म्हणून मी तुला भेट देईन. मग तर झालं, सदू?"

तोंडांत बोट घालून सदूनें कांहीं क्षण विचार केला. मग त्यानें दुसऱ्या हाताचें बोट तोंडांत घातलें.

सदू शिंत्रे आयुष्यांत प्रथमच शीळवादन करीत होता.

परांजपे–दांपत्य मधुचंद्रासाठीं टायगर पाथवर गेलें कीं सैतान–दरींत तें नक्की कळलेलें नाहीं.

पण एवढें खरें, कीं तत्पूर्वी त्यांचा वेदोक्त विवाह झाला. आल्याबरोबर अपघातांची सीरियल पाहावी लागल्यामुळें घारूअण्णांचें अवसानच गळालें होतें. त्यांनीं पंपूला आनंदानें पंधराशेंचा करकरीत चेक दिला. ( त्यानें अर्थातच पुढें हस्तांतर केले. ) आणि करकरीत लुगडें नेसलेली किशी त्याला सुपूर्द केली. चक्रमपुरांतल्या झाडून सगळ्या उपाध्यांना धाब्यावर बसवून त्यांनीं दुसऱ्याच दिवशीं मुहूर्त असल्याचें सांगितलें. आणि स्वतः पौरोहित्य करून मांडवपरतणी उरकून ते घोडिवऱ्याला हाताखालच्या मास्तरांवर गर्जायला निघून गेले. पाठोपाठ जेव्हां " चार दिवस जाईन म्हणतों कुठें तरी ! " असें म्हणून परंतप परांजपे उर्फ पंपूही सहकुटुंब चक्रमपूर सोडून निघाला, तेव्हां त्याला पोचवून आलेल्या आम्हां चौघांचे—दादा लड्डे, विसू रोडे, सदू शिंत्रे नि मी—जीव हौदांत पडले.

आम्ही घरीं येईतों वहिनींनीं ' ह-ह-हू-'चें साहित्य बंबांत टाकलें होतें.

# यूयूनगरचा युद्धमहोत्सव

## [अर्थात् हिटलर भूमिगत कसा झाला]

' यंत्रज्ञ पाहिजे. पगार अडीचशें. लिहूं नका. प्रत्यक्ष भेटा. वेळ अमूक तमूक. तारीख फलाणी. '

' यूयूवान ' पत्रुकल्यांतली ही जाहिरात वाचून आम्हीं विसू रोडेकरवीं एक अर्ज टाकवला होता. आणि त्याचें अनुकूल उत्तर येतांच, नाताळची सुट्टीच असल्यानें त्याच्याबरोबर 'करवल्यां 'च्या थाटांत मुलाखतीसाठीं यूयूनगरकडे निघालों होतों. ' न गच्छेत् ब्राम्हणत्रयम् ' ह्या म्हणीला भिऊन निघण्यापूर्वी एकदा घोडिवऱ्यास घारूअण्णांकडे ' कम् यू-यू-यू ' (म्हणजे तुम्ही यूयूला या) अशी तातडीची तार केली होती. पण दोन दिवसांनीं अण्णा येण्याऐवजीं त्यांचें पत्र आलें. त्यांत त्यांनीं लिहिलें होतें, " सुट्टी असली तरी स्पोर्ट आहेत. हातांखालच्या मास्तरांवर विसंबलों तर खेळखंडोबा होईल. तिघांनीं जाऊं नये म्हणून भिऊन तार केलीत काय ? तसं असेल तर जा. मूळ वचन ' नः गच्छेत्...' असें आहे. म्हणजे आपण तिघे भटजी जेवायला जाऊं या. मधल्या एका खादाड पिढीनें तो विसर्ग खाल्ला. तेव्हां जा. शिवाय तुमच्या तारेचा अर्थ काय ? मला कुत्राबित्रा समजतां काय ? तेव्हां जा. त्यांतून थांबायचें जमत असेल तर चार दिवसांनीं येईन. "

थांबायचें जमत नव्हतें. कारण पळांमागून पळें जात होतीं आणि विसू-पुढें चालून आलेल्या नोकरीच्या ताटावर चहूंकडून दबकत दबकत आलेले बोके, कोल्हे, कुत्रे नि गृध्र केव्हां तुटून पडतील ह्याचा नेम नव्हता. तेव्हां आम्ही निघालोंच.

यूयूनगर हें दक्षिण हिंदुस्थानांतलें एक नामवंत संस्थान असून आपल्या सहार्थे

वीस कीं कायशा देशी राज्यांत त्याचा नंबर म्हणे सहाशें एकोणिसावा लागतो. हिंदुस्थान ही एक गोधडी आहे अशी कल्पना करा आणि एखादं मोठ्ठं बाळ आपल्या वखवखलेल्या दांतांनीं त्या गोधडीच्या कोपऱ्याचें टोक चावून चोथा करतें आहे असें समजा. अशा वेळीं गोधडीला त्या ठिकाणीं पडलेलें छिद्र झाकण्यासाठीं आई पोस्टाच्या तिकिटाएवढी चिंधी त्या जागेला बेमालूम शिवते असेंही मनांत आणा. साधारणपणें त्या चिंधीएवढेंच स्थान ह्या यूयूनगरला आहे. त्याचें क्षेत्रफळ सोळा हजार सहाशें सोळा घनफूट असून त्याच्या चौसीमा पुढीलप्रमाणें आहेत. पूर्वेला वैतरणी (ह्याची व्युत्पत्ति साधीसुधी नसून 'व्हाय तरुणी' अशी सूचक होती असें आम्हांला नंतर कळलें.) ओढ्याची उगमाची बाजू, दक्षिणेला वायतरुणीच्या मुखाची बाजू (इथेंच हा ओढा भीमेच्या एका उपनदीला मिळतो), पश्चिमेला पश्चिमघाटचा पायथा आणि उत्तरेला हिमालय पर्वताच्या दीड हजार मैल अलीकडे आलें कीं लागणारा 'माऊंट प्लेझंट'चा एक लक्ष ऐंशी हजार इंच उंचीचा सुळका. ह्या सुळक्याच्या पलीकडेच भुकभुकाबाद नांवाचें दुसरें संस्थान होतें. दोन्ही संस्थानांमधून एक डफ्फर आगगाडी ठेचाळत जायची; पण विस्तव कधीं जायचा नाहीं. कारण भुकभुकाबादच्या नबाबानें शाही सरकारकडे दरखास्तीवर दरखास्त करून यूयूनगरला अन्यायानें मिळालेला 'हड्डूक' प्रांत आपल्याला परत मिळावा म्हणून कोशिश चालवली होती. यूयूनगरनें ह्यामुळें चिडून, ज्यादा शिबंदी म्हणून एक पोलिस हड्डूकमध्यें ठेवला होता. एक...कारण दोघांना त्यांत उभें राहायला जागा नव्हती. संस्थानचें उत्पन्न विशेषत: बोरी बाभळी नि टाकळा नांवाची कॅफिनयुक्त वनस्पति. इथल्या बाभळी ओरपायला दूरदूरच्या बकऱ्या येत असतात आणि इथल्या मधुर नि रसाळ बोरांत वावरणारी कीड लठ्ठपणांत नि तजेलदार कांतींत तोतापुरी भुंग्याला मागें टाकणारी असते. यूयूनगरच्या महाराजांना तीन तोफा, चार बंदुका (ह्यांतल्या तीन एअरगन्स असतात आणि चौथी मात्र ताज्या अस्सल कडब्याची असते), एक पिस्तूल नि नऊ आपटबार एवढ्या सलामीचा मान आहे. पण दुर्दैवानें ते प्रकृतीनें अत्यंत क्षीण नि बिछान्याला खिळलेले असल्यामुळें त्यांच्या कानांचे पडदे फुटून सगळ्याचवर पडदा पडूं नये म्हणून समारंभप्रसंगीं फक्त एक फुसका बार सोडण्याची संस्थानांत प्रथा

आहे. महाराज सदाच आंथरुणाला खिळलेले असल्यामुळें औषधांबरोबर ( त्यांत ब्रॅण्डीच जास्त असे ) त्यांना शय्यासोबतिणीही ज्यादा लागत. सरकारस्वारीच्या ह्यां कायम रुग्णावस्थेवर टीका करतांना 'आरोळी' नें एकदां त्यांचें 'महारोगाधिरोग' असें वर्णन केलें होते; आणि त्याबद्दल दुसऱ्याच दिवशीं त्याला महाराजांपुढें त्रेचाळीस रुपये भुर्दंड मोजून सपशेल माफी मागावी लागली होती. ( दरम्यान आरोळीचा खप अर्थातच त्रेचाळीसशेंनें वाढला होता. )

रेल्वेच्या मुख्य लायनीवर 'कुत्तेकी अवलाद' हें छोटें जंक्शन लागतें. तिथेंच ब्रॉड गेज बदलून आम्हीं मॉर्टगेज लायनीवरच्या स्टेट एक्स्प्रेस ५५६ मध्यें बसलों. 'हिज एक्झॉस्टेड हायनेस दि महाराजा ऑफ यूयूज् प्रॉमिसरी रेल्वे'ची, मधलें एकही स्टेशन न घेतां थेट यूयूला जाणारी ही झंझावात मेल होती. एंजिनचा नि गार्डाचा धरून एकंदर तीन डबे असून तींत ड्रायव्हर, फायरमन, गार्ड नि गार्डाचा पित्त्या धरून एकंदर त्रेचाळीस इसम ( त्यांना तशी इच्छाच झाली तर ) बसूं शकत.

जागा भरपूर मिळाल्यामुळें खूष होऊन मी खिडकीशीं बसलों. आत्तांच सांगितलेल्या बुभुक्षित बकऱ्यांपैकीं एक वेडें कोकरू उड्या मारीत यूयूनगरकडे निघालें होतें. त्याच्या लीला पाहाण्यांत माझा अर्धा तास मोठ्या मजेत गेला. नंतर तेवढ्या वेळांत तें बरेंच पुढें निघून गेलें. तेव्हां मग मात्र जरा कंटाळून मीं आंत नजर फेकली. दादा लड्डेनें खिशांतून काढलेलें ढेरपोटें घड्याळ दोन्ही हातांनीं पोटावर धरलें होतें आणि तो ओठांची कांहीं तरी पुटपुट करीत घड्याळाकडे टकटक पाहात होता. मीं किंचित् आसावून त्याला विचारलें, "किती वेळ राह्यलाय्, दादा?"

"आं?" दादानें वर मान करीत म्हटलें. "आहेत अजून सुमारें सव्वादोन तास. पण मी वेळ पाहात नव्हतों. सेकंद स्थलांच्या रेघा मोजीत होतों."

"त्या कशाला?"

" मग दुसरं करायचं काय, तें सांगा ना. बाहेर पाह्यलं तर दूर दूर क्षितिजापर्यंत खडे नि वाळकं गवत ह्यांशिवाय दुसरं कांहीं दिसत नाहीं. खिडकीबाहेर वाकून जरा एकटक पाह्यलं तर कुणा उतारूनें फेकलेल्या फराळाच्या उष्ट्या कागदावर चालून येणारी डोंगळ्यांची रांग दिसते म्हणा. पण तेवढा पेशन्स मला नाहीं. आंत ! ...आंत आहे काय, तुझ्या नि विशाच्या तोंडांशिवाय ? चीफ ट्रॅफिक मॅनेजरच्या त्या धोक्याच्या सूचना मीं पन्नास वेळां वाचल्या आहेत. त्यांत ओरिजिनॅलिटी आहे. कारण ' चीट्रॅम्या 'चं म्हणणं असं कीं आमच्या रेल्वेलाच उतारूंपासून वेळोवेळीं धोका पोचलेला आहे. तरी काळजी घ्यावी. झालंच तर, झेप घालूं पाहाणाऱ्या जर्मन गिधाडाकडे किलकिल्या डोळ्यांनीं पाहाणारा तो हिंदुस्थानचा मत्त वाघही पाहून झाला. कंटाळलों बाबा ! ह्या भागांतनं रेल्वे बांधणारा तो एंजिनियर शुकमुनीचा बाप असला पाहिजे."

एंजिनियर शब्द ऐकतांच विसू रोडेचे ते हडकुळे कान एकदम टवकारून उभे राहिले. आतांपर्यंत तो हातांतल्या छोट्या नोटबुकांतलीं टिपणें, परीक्षा दालनांत शिरूं घातलेल्या विद्यार्थ्याच्या हावरटपणानें पुन्हा पुन्हा चाळत होता. चटदिशीं आमच्याकडे लागलेले त्याचे ते घारे डोळे चष्म्याआडून कवड्यांसारखे चमकले आणि तोही आमच्या भाषणांत सामील झाला.

आणि मग स्टॅफोर्ड क्रिप्सपासून पोटॅटो चिप्सपर्यंत शेंकडों चिजांचा समाचार घेत आम्हीं ते सव्वादोन तास घालवले.

यूयूनगरांत प्रवेश करतांना आम्ही जरा चकित नि उत्फुल्ल झालों होतों एवढें कबूल केलें पाहिजे. कारण सबंध शहर जणूं कांहीं तेजाळ प्रकाशानें न्हाऊन बसलें होतें. पताका, तोरणें नि 'नेऑन्लाइट'ची दणकट व्ही ह्यांनीं शृंगारल्यामुळें स्टेशनच्या दोन्ही फलाटांचें दैन्य अधिकच उजळून दिसत होतें. पहिल्या वर्गाच्या विश्रामस्थानांतून बाटलीच्या बुचांचे फूत्कार निघत होते आणि बाहेर कुठें तरी वाजत असलेल्या लष्करी वाद्यध्वनीला त्यांची

धृपदधमारासारखी फोडणी मिळत होती. स्टेशनापासून शहरापर्यंतची ती भारतमातेसारखी रोड नि हाडेंखडे वर आलेली सडक, दिव्यांचा लकलक चमकणारा चंद्रहार गळ्यांत घातल्यामुळें जास्तच भेसूर नि शरमिंदी झालेली दिसत होती. टांग्यांत बसून आम्ही शहराकडे निघालों तेव्हां ' राजशालकाच्या अकराव्या बायकोला सत्ताविसावं मूल झालेलं असावं ' असा अंदाज मीं प्रगट केला. पण तो ताबडतोब खोडून काढून टांगेवाल्यानें माहिती दिली, कीं संस्थानांत युद्धमहोत्सव चालू आहे, तन्निमित्त ही रोषणाई असून रात्रौ प्रदर्शन, नृत्य वगैरे कार्यक्रम आहे. उदईक मैदानावर कांहीं कसरतीही असून गरिबांना बर्फी वाटण्यांत येणार आहे. टांगेवाल्याचें दिल विशेषतः ह्या शेवटच्या कार्यक्रमांत गुंतलें होतें ही गोष्ट त्याच्या ओठांच्या कोपऱ्यांतून त्या वेळीं लाळेचे दोन थेंब गळले त्यावरून उघड दिसलें. तोंडांतून फेस गाळणाऱ्या आपल्या तट्टाशीं चाललेली आपली ही स्पर्धा त्याला लज्जास्पद वाटून त्यानें लगेच सदऱ्याच्या कोपऱ्यानें ती लाळ पुसून काढली आणि मग तो कोपरा परत जागच्या जागीं सोडून दिला. पण तो थेट सडकेवर पडला. कारण त्याच्या सदऱ्याचीं लक्तरें इतकीं तुटायला झालीं होतीं, कीं एवढ्याशा धक्क्यानें तीं निखळून पडत.

आपल्या ह्या दैन्यावस्थेची जाणीव होऊन बिचाऱ्यानें आणखी लाजूं नये म्हणून दादानें मुद्दामच त्याला म्हटलें, " शहर आलंच कीं जवळ. रस्त्यांतून गर्दी पण खूप दिसते लोकांची. पण...पण..."

मी म्हणालों, " दादा, तुला बरोबर तडकलं. बायका बिलकुल दिसत नाहींत रस्त्यांत, असंच ना म्हणायचं होतं तुला ! "

माझ्या ह्या प्रश्नानें विसू रोडेची ती भेदक नजर आपोआप माझ्याकडे खेचली.

" आणि..." तो एकेक शब्द मोजून बोलत म्हणाला, " घटकाभर नाहींत दिसल्या बायका, तर आकाशपाताळ एक करायची काय जरूर आहे, म्हणतों मी ! "

मीं कांहींच उत्तर दिलें नाहीं; नुसती तोंडांतल्या तोंडांत जीभ घोळवली. घारूअण्णांच्या किशीच्या तडाक्यांतून थोडक्यांत सुटल्यापासून तो बायकांच्या बाबतींत जरा उदासच बनला होता.

" बायका ! " तो टांगेवाला एखादें जिवाणू दिसावें तसा चपापून म्हणाला. " बायका हत रस्त्यांतून हिंडत नाहींत साहेब. "

" कां ? इतक्या नाजूक आहेत त्या ? "

" जी. नाजूक नि साजूक बी....( आवाज खालावून ) " आमच्या महाराज-साहेबांना तरी तसं वाटतं. त्यांचा दिल भारी उदार हाये साहेब. गरिबांच्या पोरीबाळींना पण ते आपल्याच समजतात आणि उचलून नेतात. "

" अस्सं. " दादा गंभीर सुरांत म्हणाला. " प्रजा म्हणजे राजाची एक परीनें लेकरंच. तेव्हां तीं त्याला उचलून घ्यावींशीं वाटली तर नवल नाहीं. "

" पर साहेब, तुम्हांआम्हांला थोडाच उचलणार आहे हा राजा ! उचलील. पर टेकशावर न्हाइ बशिवणार....थकडं टाकील. " असें म्हणून अर्ध्या मैलावर एका उंच टेकाडावर एक छोटी पांढरी इमारत दिसत होती तिकडे त्यानें बोट दाखवलें. भारताच्या संरक्षणासाठीं नवीनच बांधलेला तो एक ज्यादा तुरुंग होता असें आम्हांला नंतर कळलें.

दुडुक दुडुक करीत आमचा टांगा शहरांतून मध्यवस्तीकडे निघाला होता. रस्त्यांत गर्दी खूप होती.

सर्वत्र रोषणाईचा झगझगाट असून बत्त्यांभोंवतीं बावरलेल्या पतंगांचे घोळके फिरत होते. बत्त्यांच्या जोत्यांजवळ नागडीं उघडीं भिकार गलिच्छ पोरें वर्ष वर्ष काळोखांत घालवल्यानंतर मोठ्या मोक्यानें लाभलेल्या ह्या सुप्रकाशाची लयलूट करीत होतीं. धुळीचे कण हवेंत उंच उसळून, उजेडांत उन्मत्त गिरक्या

मारीत होते आणि त्यामुळें ग्रहगोलांची एक नवीनच स्वप्नसृष्टि जणूं त्यांनीं तयार केली होती. पृथ्वीसारख्या एका क्षुद्र ग्रहावरचीं क्षुल्लक कोडीं सोडवण्यांत अपयश मिळालेला मानव त्यामुळें पराकाष्ठेचा बावरत होता. रस्तोरस्तींच्या तारांवरून युनियन जॅकें नि पट्टयाताऱ्यांचे अमेरिकन ध्वज ह्यांचीं धुणीं वाळत घातलीं होतीं. त्यांतले निम्मे बावटे जरी त्या नागड्या उघड्या पोरांना मिळते तरी त्यांनीं बापासाठीं त्या कापडांतून लंगोट्या नि आईसाठीं चोळ्या शिवल्या असत्या. आणि मग त्या चित्रविचित्र पोषाखांत खुलून दिसणाऱ्या आपल्या लज्जान्वित पितरांचें त्यांनीं टाळ्या पिटून नि नागवें नाचून अभिनंदन केलें असतें. पण त्या पवित्र पताकांचा मान बारीक लोखंडी तारांवर डौलानें फडफड करण्याचा होता. गलिच्छ मानवी देहाला चिकटून मलिन होण्याची शिक्षा त्यांना कुणीं फर्मावलेली नव्हती.

टांगा खडखडत चालला असतांना मध्येंच लफ्फेबाज रुमाल बांधून माझ्या निरखीत चाललेला एखादा रंगेल सोकाजी आपल्या कानांतल्या फायाचा खुषबू आमच्यावर उधळी आणि तो मागें पडला कीं लगेच पुन्हा बाजूच्या उघड्या गटारांतून निघणारा बदबू आमच्या नाकपुड्यांभोवतीं पिंगा घालूं लागे.

ह्या उलटसुलट गंधांचें सेवन करीत आम्हीं राजरस्ता लवकरच मागें टाकला आणि एका अरुंद बोळांत शिरलों. आणि त्याच क्षणाला एक तिसराच स्वादिष्ट सुवास आमच्या नाकांत शिरला. आम्हीं तिघांनींही चकित न् प्रसन्न होऊन वर पाहिलें. टांगा उभा राहिला होता. एका मिणमिणत्या दिव्याखालीं पाटी लोंबत होती: 'सुग्रास भोजनालय.'

पण 'पहिली छाप ही नेहमींच खरं ठशवीत नाहीं' असें कायसेंसें सुभाषित आहे. दादा लड्डेनें साशंक सुरांत विचारलें, "खरोखरीच सुग्रास असतं ना रे पण इथें जें मिळतं तें!"

विसू रोडेनें आंबलेलें आंग झाडण्यासाठीं खालीं उडी टाकली आणि वासरासारखें लांबट तोंड करीत विचारलें, "कीं ग्रास म्हणजे इंग्रजींतलं

समजायचं ? ”

टांगेवाल्यानें चाबूक बाजूला ठेवला आणि आमच्याकडे वळून तो एखादें सरकारी रहस्य सांगण्याचा आव आणून म्हणाला, “ साहेब, चक्रमपुरांतच काय, पर आख्ख्या दक्षिणमधीं या अन्नाला तोड गावायची न्हाय. करनारं सुग्रण हैती. बाप्ये न्हवंत. बायका हायेत बायका. येक घास गिळाल त घरची आठवण पर व्हायची न्हाय...”

मोठ्या मुष्किलीनें टांग्याखालीं उतरत असलेल्या दादाला ह्याच वेळीं ठेच लागली. त्यानें एका हातानें विसूचा खांदा दडपीत दुसऱ्या हातानें पायाचा आंगठा दाबला आणि म्हटलें, “ त्याचे पैसे देऊन टाक रे किशा.”

मीं पाकीट काढलें आणि ठरल्यापेक्षां एक अधेली टांगेवाल्याच्या हातावर ज्यादा टिकवून म्हटलें, “ इतकं गोड खायला मिळणार असेल, तर...”

टांगेवाल्यानें हात जोडले. “ मायबाप आहां.–पर अक्षी खरं सांगतुया हां ?... म्यां बी खाल्लंया इथं एकदा कारभारीण म्हाइराला गेलती तवां. म्यां बी तवां पैका बाळगून व्हतों. आता कुठं जमाया...”

“ कां रे ? आतां तर लढाईची कमाई ?...”

“ लढाईची कमाई कशाची साहेब ? ती जातेया ट्याक्साच्या पायीं. हा राजा म्होप ट्याक्स लावतोया. नि आम्हां गरिबांवरच जास्ती नजर त्याची...” बोलतां बोलतां टांगेवाल्याची नजर अन्नालयाच्या अंतर्भागाकडे लागली होती. तो एकदम म्हणाला, “ हतं बी सरकारस्वारी येते कधीं कधीं. ”

“ इथें ? ” त्या चंद्रमौळी इमारतीकडे पाहात विसू नवलला.

“ जी. हतं सुग्रास अन्न खायास्नी. पर त्या सुग्रास अन्नापरीस त्या सुगरणीवरच

सरकारचा जास्ती जीव." आणि अशा रीतीनें सगळें सांगून झाल्यावर तो आमच्यापैकीं विसू रोडे सर्वांत सोयिस्कर वाटल्यामुळें त्याला म्हणतो, "जरा कान करा साहेब इकडे."

विसूनें कान केल्यावर त्यानें सर्वांना ऐकूं येईल एवढ्या आवाजांत सांगितलें, "हुजूरस्वारीची मर्जी हाये इथें भारी. सरकारवाड्यांतून बलावणं येतं ना दर पंधरा दिसाला!"

"कुणाला?"

"त्या सुगरणीला...चटकचांदणीला. मालकाच्या प्यारीला! साऱ्या गांवभर झालंया ना? पर साहेब बोलूं नका कुणापाशीं!"

'सुग्रास अन्नालया'च्या 'अंदरकी बात'नें उमटवलेली ती विषण्णतेची काजळी, नंतर आम्ही जेवून खाऊन बाहेरच्या ओसरींत पानसुपारीचा समाचार घेत बसलों तरी आमच्या मनावरून पुसली गेली नाहीं. पण बाकी गोष्टी कांहीं असोत, टांगेवाल्यानें दिलेल्या एका गॅरंटीचा मात्र आत्तांच आम्हांला पडताळा आला होता. आणि तें म्हणजे, खाणावळ खरोखरीच नांवाला जागणारी होती. उशीर झालेला होता, तरी मालकांनीं आमच्यासाठीं खास भोजन तयार करण्याचा हुकूम सोडला आणि आम्ही हातपाय तोंड धुऊन आमच्या खोलींत येतों न येतों तों पानें मांडून तयार असल्याची वर्दीही आली. पानें देखील सैंपाकघराला लागून असलेल्या माजघरांतच मांडलेलीं होतीं; आणि तिथें एकच मेणबत्तीचा ठाणदिवा मिणमिण जळत होता. आंबेमोहराचा घमघमीत भात, तूप लावलेल्या पोळ्या, कोबीची खमंग भाजी नि गाजराची करकरीत चवदार कोशिंबीर...पदार्थ साधेच पण इतके चविष्ट लागत होते कीं आम्हीं अगदीं खूष खूष होऊन गेलों. कडेलाच पाट टाकून मालकही आमचा समाचार घ्यायला बसले होते आणि 'अहो, भाजी आणा...' 'अग कमळे, कोशिंबीर हवीयू त्यांना बघ...' इत्यादि इत्यादि सहास्य प्रेमळ फर्मानांनीं आपल्या कुटुंबीयांची धावपळ

करवीत होते. त्यामुळें अगदीं घरासारखें वाटत होतें.

विसूला गाजर आधींच प्रिय, त्यांतून आजची ती कोशिंबीर म्हणजे शिकरणीपेक्षांही मधुर झालेली. मग तो मागचा पुढचा पोच कशाला ठेवतो? जवळ जवळ सात वेळां त्यानें—पहिल्यानें लाजत नि नंतर निर्लज्जपणें—कोशिंबीर मागून घेतली. त्यानंतर त्याला मागण्याचें कारण पडलें नाहीं. मालकाची चतुर मुलगी मग दाराशींच विनयानें उभी राहिली आणि विसूच्या पानाच्या डाव्या बाजूवर तिनें आपल्या विलोल डोळ्यांनीं जागता पहारा ठेवला. ते डोळे म्हणजे मूर्तिमंत कमळेंच होतीं दोन...सात्त्विक श्रद्धा त्यांत ओतप्रोत भरलेली होती. आणि अशा मुलीबद्दल...

मला वाटतें, पानसुपारी खातांना माझ्याप्रमाणेंच माझ्या दोघा मित्रांच्याही मनांत त्या अभागी मुलीबद्दलचेच विचार चाललेले असावेत. नाहींतर नवख्या गांवांत आल्यावर नि जेवणखाण मनसोक्त झालेलें असतांना दादा लड्डे एरवीं मुक्यासारखा बसला नसता. विसू रोडे तर स्वप्नांत असल्यासारखाच वागत होता. त्याचा मूळचा सुतकी चेहरा आणखीच गंभीर नि लांबट झाला होता. मालकांनीं कातरून दिलेली सुपारी त्यानें यंत्रासारखा हात वर करून तोंडांत टाकली, तेव्हां अर्धी अधिक त्याच्या शर्टावर सांडली आणि बरेचसे कण त्याच्या घामानें डंवरलेल्या नाकाला चिकटले.

मी त्याचा हात धरून हळूच म्हणालों, "तुझा हात गरम लागतोयू विसू. कांहीं होतंयू का?"

"कांहीं नाहीं."

दादा लड्डेची जीभ डावीकडचा चोथा उजवीकडे ढकलीत मोठ्या श्रमानें बोलली, "प्रवासाचा शीण वाटणं शक्य आहे."

पण दादाला सुद्धा आपण हें अगदींच सामान्य माणसासारखें बोललों असें

वाटलें असावें. थोड्या वेळानें तो जरा ताठ बसला आणि बैलाचीं शिंगें धरण्याच्या आवेशांत म्हणतो, “मॅनेजरसाहेब, आपलं हें यूयूनगर म्हणजे संस्थानी राज्याचा नमुना दिसतो एक. बऱ्याच गोष्टी ऐकल्या आम्हीं येतां येतां...”

मालकांचा अडकित्ता काम करायचा थांबला. तो टेबलावर ठेवून सुपारी तोंडांत टाकून मालक म्हणाले, “हं. तुम्हीं काय ऐकलंय् तें तुम्हांला न विचारतांच सांगून टाकतों...तुम्ही जेवढं ऐकलंय् त्यांतलं नव्याण्णव टक्के खरं आहे...” आणि मग सुपारी लागली म्हणून कीं काय कुणास ठाऊक, थोडें थांबून घसा साफ करून ते पुढें म्हणाले, “स्वानुभवावरून सांगतोंय् मी, बरं!”

अगदीं न राहावून मीं विचारलें, “म्हणजे तुम्हांलाही झळ पोंचलीय् म्हणतां?...”

“झळ?...”

उद्वेग, तिरस्कार, संताप ह्यांचे सूर त्या एकाच शब्दांत इतके प्रतिध्वनित झाले होते, कीं आम्ही तिघेही अगदीं चपापून त्यांच्याकडे पाहूं लागलों.

“झळ?” ते म्हणाले. “अहो, आम्ही होरपळून निघालोंय् पुरते. आमचा हा राजा म्हणजे साधासुधा नाहीं. पुराणांतला कीचक आहे हा. कीचकांत बैलाची रग तरी होती. हा राजा मेषपात्र आहे. रोज एका बकरीचा बळी घेण्यापुरतीच मस्ती आहे त्याच्यांत!”

थोड्या वेळानें ते एकदम म्हणतात, “आमच्या कमाबद्दल बोललाच असेल टांगेवाला! सारा गांवच बकबक करतोय् तिथें त्यानें तरी कशाला गप्प बसावं?”

थेट दादाचेंच धोरण उचलून मालकसाहेब रंगणांत उतरले होते. त्यांच्या

धिटाईनें आम्ही सर्द बनलों...आणि पुतळ्यांसारखे निश्चल! विसू रोडे अर्धवट आ करून त्यांच्याकडे पाहूं लागला. त्याच्या चेहऱ्यावर जें काळजीचें सावट पसरलें होतें त्यांत उत्सुकतेची एक तिरीप झळकली. आमच्या समोर मिणमिण जळणारा मेणबत्तीचा दिवा होता त्याच्याच सारखी ती भेसूर वाटली मला.

आम्ही कोणी कांहीं न बोलतांच मालकांनीं पुढें सांगून टाकलें, "वर्षापूर्वीची गोष्ट आहे. आमची कमा धुणीं घेऊन नदीवर गेली होती. जरा एकीकडचा खडक होता. तिनें वास्तविक त्या बाजूला जायचं नव्हतं. पण गेली. कपडे आपटलेन्, चोपलेन्, धुतलेन्, आणि दगडावर पिळे रचतेय् तोंच मागून कुणीं तरी कपडा टाकून तिच्या मुसक्या बांधल्या...पोरीला ओरडतां पण आलं नाहीं. सरकारी माणसंच होतीं. धरलेंनी, नेलेंनी,...दिवसभर पोरीचा पत्ता नाहीं. मध्यरात्रीं केव्हां तरी आणून सोडलेंनी..."

मालकांनीं एक आवंढा गिळला.

"रडून रडून पोरीचे डोळे लाल झाले होते, सुजले होते. एक शब्दही तोंडून निघेना, इतकी ती घाबरली होती. आम्हीं पण तिला जास्त कांहीं विचारलं नाहीं..." जरा थांबून मालकांनीं एक शुष्क हास्य केलें. "किंवा घराबाहेरही घालवली नाहीं. आठपंधरा दिवसांनीं पोरीला वाचा फुटली. आईला अगदीं रडत रडत सांगितलन् तिनें...कीं...कीं...आपण निष्पाप आहोंत, शुद्ध आहोंत..."

थोडें वाकून मालकांनीं डब्यांतला लवंगांचा कप्पा थरथरत्या हातानें बाहेर काढला, पुन्हां आंत ठेवला. एक लवंग उचलली, तोंडांत टाकली.

"...पण लोक तोंडांत शेण घालायचे थोडेच थांबणार आहेत! गांवभर नांव बद्दू झालं तें झालंच."

मीं खालचा ओठ दाबून त्यांना म्हटलें, "पण...पण तुम्ही राहिलांतच

कशाला इथें मग ?...असल्या गलिच्छ देशांत ? "

मालक विषण्ण हास्य करून म्हणाले, " हं ! कां राहिलों ?...गरिबी ! गरिबीच त्याला कारण ! साहेब, गरिबांना संताप येतो, पण टिकत नाहीं तो. जिरतो... जिरवावाच लागतो. इथून उठून जायचं कुठें मी ? करायचं काय ? खाणावळ इतक्या वर्षांची...टामटुमींत चाललीयू ! दुसरीकडे नवी विट्टी न् नवं राज्य घेऊन कसला संसार मांडूं मी ? "

" पण..." दादा म्हणाला, " तुमच्या धंद्यावर नाहीं परिणाम झाला ह्याचा ? "

" झाला. " मालकांनीं रुक्ष सुरांत सांगितलें. " गिऱ्हाईक वाढलं. "

रात्रीं आम्हांला कोणालाही नीट झोंप लागणें शक्य नव्हतें. पहाटे पहाटे जरा डोळा लागला. पण एकाहून एक विचित्र स्वप्नें पडून मी एकसारखा जागा होत होतों. एकदा तर मला आमचा तो बडबड्या टांगेवाला दिसला. आपल्या टांग्याची नाव करून एका खवळलेल्या समुद्रांतून तो दूर दूर कुठें तरी चालला होता. आपल्या म्हाताऱ्या तितीर्षु घोड्याला त्यानें नावेंत बसवलें होतें. त्याच्या चिरगुटांचें शीड हवेंत फडफड करीत होतें.

ती फडफड माझ्या त्रस्त मनाला जणूं विंझणवाऱ्यासारखी वाटली आणि मग मी जो शांत झोपलों तो दहा वाजतां जागा झालों.

चौकशीअंतीं कळलें कीं विसू रोडे केव्हांच उठून दिवाणांच्या मुलाखतीला गेला आहे ; आणि दादा लष्ठ ओसरीवर मालकांशीं गप्पा मारीत बसला असून, विसू परत येण्याची, मी उठण्याची नि दुसरा चहा मिळण्याची वाट पाहात आहे.

दादाच्या तिन्ही अपेक्षा एकदमच पुऱ्या झाल्या. मीं चूळ भरून टाकून एका दारानें सदरेवर येतों तोंच दुसऱ्या दारानें माजघरांतून कमाताई

चहाचें तबक घेऊन कप न हिसळतां पण बांगड्यांचा मंजुळ आवाज करीत आल्या आणि त्याच वेळीं दाणदाण पाय आपटीत पुढच्या दरवाजांतून विसू रोडेनें प्रवेश केला.

" म्हणजे ? आणि हें काय ? " माझें ' हें ' विसूच्या हातांतल्या एका टोलेजंगी कुलपाला उद्देशून होतें.

दादानें मला आवरलें. " थांब. त्याला जरा विसावा घेऊं दे. मग कळेलच सगळं. "

" मीं म्हटलंच होतं आपल्याला. इतक्या पहाटे उठून जायचं कारण नाहीं. दिवाणसाहेब घोरत असायचे. अहो, त्यांनीं लाख म्हटलं असेल नऊ वाजतां...आपण आपलं विडा चावीत अकरा वाजतां जावं. संस्थान आहे हें... " मालक गाल चोळीत म्हणाले. जणूं कांहीं विसूला बसलेली निराशेची थप्पड त्यांनाच जाणवत होती.

" संस्थान आहे म्हणूनच वेळेवर गेलों. कारण वाघोबा म्हटलं तरी तें खाणार, वाघ्या म्हटलं तरी खाणार, तेव्हां सरळ वाघ म्हटलेलं काय वाईट ?... "

" बरं बरं... " दादा त्याचा वाघ-प्रवाह अडवीत म्हणाला. " तुला कितीसं खाल्लं तें सांग. "

" मला खाताहेत ! " विसू तोऱ्यांत उत्तरला. " फत्ते केली. नोकरी मिळाली. "

" म्हणजे ?... एवढ्यांत ? "

" तर मग त्याला काय मोठे मुहूर्त नि तासेवाजंत्रीं लागताहेत ?...पण नीट ऐका. मी काय काय झालं तें सांगतों. "

विसूनें तबकांतला एक चहाचा पेला उचलून रिकामा केला. माजघराच्या दाराआड उभी राहून कोणी व्यक्ति आपलें भाषण ऐकते आहे ह्याबद्दल खात्री करून घेतली आणि म्हटलें, "मी गेलों तेव्हां दिवाणसाहेबांची नुकतीच उपासमोड झालेली होती. दिवाण मारवाडी खाक्याचे दिसतात ; त्यामुळें त्यांना हें इंग्रजी पद्धतीचं ब्रेकफास्ट मानवलेलं नसावं. पण करतात काय ? पोलिटिकल एजंट अगदीं साडेआठाच्याच गाडीनें जायचा होता आणि त्याला नि सरकारस्वारीला दिवाणसाहेबांकडे खाजगी खाना द्यायचा राहिलेला होता. तेव्हां झकत बिचाऱ्याला पुण्याहून बटलर बोलवावा लागला आणि अगदीं पहाटे उठून ह्या ब्रेकफास्टची तयारी करावी लागली. तो राजकीय गुमास्ता अगदीं खूष झाला म्हणे !

"मी दिवाणसाहेबांच्या वाड्यापाशीं पोचलों तेव्हां बाहेर उष्टयाखरकट्याचे ढीग पडले होते आणि उघडीं नागडीं पोरं केळीचीं पानं ओरपीत होतीं. 'साहेब आत्तांच न्याहारी करून बसलेत, ते भेटायचे नाहींत.' असं दरडावून दरवान मला हाकलतच होता. पण सुदैवानें झोपाळ्यावर बसलेल्या लठ्ठ पोटाच्या दिवाणसाहेबांनीं तेवढ्यांत आपली जाड गर्दन वळवून माझ्याकडे पाहिलं आणि मला आंत आणण्याबद्दल खुणावलं. म्हणजे त्यांनीं मला एकदम ओळखलं असं नाहीं किंवा स्वाभाविक सौजन्यानेंही नाहीं. भरल्या पोटीं बहुधा त्यांना कांहीं तरी करमणूक हवी असावी...कांहीं असो, मला आंत प्रवेश मिळाला खरा.

"आंत गेलों, जरा चुळबुळ केली. साहेब 'बसा' म्हणाले तेव्हां एका जागीं उभा राहिलों. कारण बसायला खुर्ची स्टूल कांहीं नव्हतं.

"दिवाणसाहेबांना मागून झोका देण्यासाठीं एक चपरासी सोनेरी नाड्यांचा लाल डगला घालून उभा होता, आणि झोका पुढें आला कीं तो मागें ढकलण्यासाठीं तसाच दुसरा चपरासी पुढें उभा होता. झोपाळ्यावर लठ्ठ तक्क्याशीं दिवाणसाहेब रेलून बसले होते आणि कुठें खुट्ट झालं तर तक्क्या हलवायला जवळ पडावं म्हणून एक हुजऱ्या डावीकडे, आणि साहेबांचा जठरवायू

कमी जास्त होईल त्या वेळीं त्यांना जरूर ती लवंग, बडीशेप, विडा, जिनतान, सेनसेन किंवा बिस्मॅग टॅब्लेट देण्यासाठीं दुसरा हुजऱ्या उजवीकडे उभा होता. ह्या वंदनीय पंचायतनापासून शक्य तितक्या दूर खांबाजवळ मी उभा होतों.

" लवकरच दिवाणसाहेबांचे ओठ हलूं लागले. पण नुकताच खाल्लेला उपाहार जिरलेला नसल्यामुळें तोंडांतून शब्द काढायला त्यांना फार जड जात होतं.

" ' आपलं नांव...' त्यांनीं आ केला आणि दुसरा शब्द पुरा होतो न होतो तों, प्रश्नचिन्हाच्या तिथें हुजऱ्यानें लवंग टाकली.

" ' पृथ्वीराज हडकुळे. '

" ' काम ? '

" हुजऱ्याला मालकाच्या ' टोनिंग ' वरून ' टेंपर ' जाणण्याची हातोटी असावी. कारण ह्या खेपेला त्यानें जिनतानची गोळी घशाखालीं सरकवली.

" मीं काम सांगितलं, आणि मग दिवाणसाहेबांनीं प्रसन्न मुद्रा करून माझी परीक्षा घेण्यासाठीं ' टरबाइन ' चे ' पार्ट ' विचारले. अर्थात् तेवढे इंग्रजी शब्द उच्चारतांना त्यांच्या आंतड्यांची बरीच ताणाताण झाली असावी ; कारण त्यांना ह्या वेळीं एक सबंध आलेपाकाची वडी च्घळावी लागली. मीं घडाघड पुस्तक बोलून दाखवलं. आणि माझ्या नादमधुर सयमक उत्तरामुळें म्हणा किंवा मुखशुद्धीच्या विपुल जिनसांनीं म्हणा, पण दिवाणसाहेब चक्क घोरायला लागले. माझं उत्तर पुरं होतांच ते उठले नि दचकून म्हणाले, ' आँ !... यस्, यस् ! बरोबर. पास ! '

" ' पास ? ' मीं जरा रागावून विचारलं.

" ' अहो, तुम्ही पास. नेमलंय् तुम्हांला. ( बोट दाखवून ) प्पॉइंटेड ! तनखा

अडीचशें. आज संध्याकाळीं यायचं तुम्हीं प्रदर्शनाच्या ठिकाणीं. यू मॅनेज दि पॉवर हाऊस देअर!'

"मी थक्क झालों. काय बोलावं तें मला सुचेना. आ करून मी पाहात राहिलों.

"'काय हो ? तोंडसं उघडं ? पानबीन पाह्यजे ?...अरे...' दिवाणसाहेबांनीं हुजऱ्याला खूण केली. लगेच पानांचं तबक माझ्यापुढें उभं राहिलं. मीं एक विडा उचलला, खिशांत टाकला, नि वळलों...

"'एक मात्र लक्षांत ठेवा, बरं का ?' झोपेनें तरतरीत बनलेले दिवाणसाहेब म्हणाले, 'राजकारण बोलायचं नाहीं आमच्या राज्यांत. काय वाटेल तें केलंत तरी चालेल. पण राजकारण नको.'

"'राजकारण ?' मीं यंत्रासारखा बोललों.

"'म्हणजे डेप्युटेशन डेलिगेशन असलं चालेल हो. घटनाबिटना सुद्धा करा एखादी तयार. आम्हांलाही हवंच आहे कांहींतरी युद्धोत्तर. पण ती चळवळ, सत्याग्रह, झेंडे न् बिंडे...अयाया...'

"दिवाणसाहेबांना भयातिरेकानें झीटबीट येणार असं दिसूं लागलं. हुजऱ्यांची धावपळ झाली. मी जास्त वेळ थांबलों नाहीं. काढता पाय घेतला..."

विसू रोडे थांबला. जरा वेळ शून्याकडे पाहात तो गप्प बसला. मग खिशांत हात घालून त्यानें एक सुरेख पुष्ट विडा काढला आणि त्याच्याकडे रोखून पाहिलें.

मला कळेना, कीं विडा तोंडांत न टाकतां आधींच हा प्राणी दांत ओठ कां चावतो आहे ?

दादाला नि मला अगदीं रुखरुख लागली. विसूला आम्ही कित्येक वर्षांपासून ओळखून होतों! त्यामुळें अडीचशेंची नोकरी मिळवूनही विसू खुषींत नाहीं, त्याला कांहींतरी डाचतें आहे हें आम्ही केव्हांच ताडलें होतें. त्याचा नूरच सांगत होता. विसू जखमेसारखा आहे. वरून दिसायला खप्पड खपली; पण आंतून नाजूक त्वचेसारखा मृदु नि वाहात्या गुलाबी रक्तासारखा रोमँटिक. कमाताईच्या कहाणीनें त्याचें काळीज हलवलें असावें हें उघड होतें. आम्हांला सर्वांनाच वाईट वाटलें होतें. पण तेवढ्यावरून त्याचें मन इतकें आंतल्या गांठीचें बनून कुठें भिरीभिरी भरकटत होतें कोणास ठाऊक!

आमच्या कंपूंत कोणीही असें चोरटेलें बनलेलें दादाला अगदीं खपत नाहीं. तो वडीलकीच्या नात्यानें विसूला छेडायचा बेत करीत होता; पण दुपारीं चहाच्या वेळेला विसूनेंच एकाएकीं जागृत बुद्धाप्रमाणें आम्हांला सर्वांना संदेश दिला आणि आमचें कुतूहल, शंकाकुशंका नि भीति पार जिरवून टाकली. विसूबद्दल खुद्द दादालाही कमालीचा अभिमान वाटूं लागला.

आम्ही सगळे चहासाठीं मुकाटपणीं जमलों होतों. जाजमावरच कोंडाळें केलें होतें. अमक्यासाठीं अमकी जागा ठरलेली होती असेंही नाहीं. पण विसूला मिळालेल्या कपावर पोपट रंगवलेला होता एवढें मीं पाहिलें.

विसूनें कपाचा कान धरला आणि गंभीरपणें म्हटलें, "सर्वच आलीं तर नाहीं चालणार?"

"सर्वच?" मालकांनीं तोंड न उघडतां विचारलें. आम्हीं बाकीच्यांनींही गोंधळून विसूकडे पाहिलें.

"म्हणजे असं...कीं मला कांहीं विशेष बोलायचं आहे. सगळींच आलीं तर बरं होईल!...काय तात्या, सांगतां काकूंना?"

तात्या विसूकडे बघत बघतच आंत निघून गेले. ते परत आले तेव्हां

त्यांच्याबरोबर काकू नि कमाताई होत्या.

विसू आदरानें म्हणाला, " बसा आपण. संकोच करूं नका. मी आपल्याला मुलासारखा आहें...म्हणजे काकूंना."

विसूनें जमवून आणलेलें एकंदर वातावरण इतकें नाटकी नि विचित्र होतें कीं विसूचें तें बोलणें आम्हांला मुळींच विचित्र वाटलें नाहीं. आणि त्यामुळें कोणी हसलेंही नाहीं.

विसू रोडेनें इतका वेळ झाकलेली उजव्या हाताची मूठ उघडली. तो मघांचा सुकत चाललेला विडा त्याच्या मुठींत होता आणि आपल्यांत अजून जीव आहे हेंच जणूं दाखवण्यासाठीं फर्रकन् उलगडत चालला होता.

विसूनें तमाम सभेला उद्देशून आपलें भाषण सुरू केलें :

" हा विडा मीं खाण्यासाठीं उचलला नव्हता. पैजेचा म्हणून उचलला तो."

एवढेंच बोलून तो जरा थांबला. सर्वत्र नाटकी शांतता पसरली.

विसूनें पुन्हा फैर झाडली :

" मी इथें नोकरी मिळवायला म्हणून आलों खरा. त्याप्रमाणें नोकरी मिळवली हेंही खरं. पण आतां पूर्वीचे सगळे बेत रद्द करून उद्यां झुंजुमुंजु होण्यापूर्वीच मी इथून निघून जाणार आहें. पण हात हलवीत मात्र नाहीं. इथल्या चौपट राजाचे जे प्रताप आम्हीं आमच्या बारा तासांच्या मुक्कामांत ऐकलेत, त्यानें आमचीं कर्णरंध्रं तापून लाल झालीं आहेत. अन्याय सहन करणं आम्हां चक्रमपूरकरांचं ब्रीद नव्हे. ( दादा इथें ' हियर हियर ' म्हणाला. ) मिळून गोळाबेरीज उत्तर काय, तुमच्या राजाला जाण्यापूर्वी चेचला पाहिजे."

" साहेब ! "

सभेंत एकच हाहा:कार उडाला. विस्मयाचे, शंकाकुशंकांचे नि घबराटीचे अस्फुट उद्गार निघूं लागले. पण विसू जागचा ढळला नाहीं. त्यानें आपलें भाषण तसेंच चालूं ठेवलें.

" तेवढं एक काम करील आणि आमचं शिष्टमंडळ इथून हलेल. हा सगळा प्रकार आज रात्रीं घडणार. कारण आज चोराच्या हातांत जामदारखान्याच्या किल्ल्या तशी माझी लोभनीय स्थिति आहे. ह्या कामांत, तात्यासाहेब, तुम्ही ...किंवा तुम्हीं म्हणण्यापेक्षां,...कमळाबाईनीं आम्हांला मदत करायची आहे. "

कमाताईनें आपले टपोरे डोळे वर करून विसू रोडेकडे क्षणभरच पाहिलें. मालकांनीं आ करून विसूकडे बघितलें. नंतर माझ्याकडे एक प्रश्नार्थक नजर टाकली. त्या प्रश्नाचा अर्थ मी तेव्हांच समजलों आणि उदासीनपणें मान हलवली. विसू रोडे शुद्धीवर नव्हता असें विधान मीं स्वप्नांतही केलें नसतें.

" कमानें मदत करायची ? तिनें काय करायला हवं असं आपलं म्हणणं आहे ? " मालकांच्या स्वरांत आश्चर्य आणि आशंका ह्यांबरोबरच तीव्रतेचीही बरीच छटा होती.

" कांहीं नाहीं. त्यांनीं फक्त संध्याकाळीं प्रदर्शन पाहायला म्हणून यायचं. आज तुमचा तो सरकारही तिथें येणार आहे म्हणे. तिथें काय करायचे ते चाळे करून तो रात्रीं अकराला म्हणे परत जायचा आहे. तें सगळं ठरलेलं आहे. दरम्यान मी तिथल्या शक्तिघरावर देखरेख करणार आहें. तुम्ही कमळाबाईना घेऊन सव्वाअकराला प्रदर्शनाच्या फाटकाशीं वाट पाहात उभे राहा. मी नि किशा तोंवर तिथें येतोंच... "

" पण...पण... " मालक कचरत म्हणाले, " मी कमाला घेऊन येऊं ? साहेब, मला राहायचंय् ह्या संस्थानांत ! "

"अजून तुमचा जीव ह्या संस्थानांत अडकलेला असेल तर तो तुमचा प्रश्न आहे." विसू खांदे उडवून उत्तरला. "रागावूं नका, तात्या. मला तुमची अडचण कळते. पण आमच्या गटातर्फे तुम्हांला मी एवढंच आश्वासन देतों, कीं माझ्यासारखे मारुती चक्रमपुरांत अनेक असल्यामुळें तिथें खाणावळ काढली तर ती मनोजवाच्या वेगानें चालेल. डागदागिने नू किडूक कीं मिडूक काय म्हणतात तें विका नि चला आमच्याबरोबर !...पण सरकारस्वारीनें आपल्याला ओळखूं नये अशी तुमची इच्छा असणं साहजिक आहे. त्यासाठीं... त्यासाठीं...कमळाबाईजवळ गंगावन आहे ना ?"

"गंगावन ?" मालकांनीं एक आवंढा गिळून सुक्या ओठावरून जीभ फिरवली.

"स्त्रीपार्ट घ्यायला नाहीं सांगत तुम्हांला मी. गंगावनापासून छापरी मिशाही फक्कड बनूं शकतात. ओठांवर तेवढ्या चिटकवून आलांत कीं सरकारस्वारीचा बापही ( तो कसा होता हो ? ) तुम्हांला ओळखूं शकणार नाहीं. आमचीं नांवं तर गुलदस्तांतच आहेत आणि यूयूच्या गुप्तपोलिसाचा काकाही तीं हुडकून काढणार नाहीं. तेव्हां आम्ही...जेहेत्ते सुरक्षित आहों. लेखी अर्ज न पाठवतां प्रत्यक्ष भेटा म्हणे ! ठीक आहे. भेटलों. पथ्यावरच पडलं आमच्या तें."

विसू रोडेनें पाणी मागितलें. लगेच कमाताई उठल्या आणि आंत जाऊन आणखी एक कप चहा घेऊन आल्या. ह्या कपावर मैना रंगवलेली होती.

कप घेतांना विसूनें तिच्याकडे एक कृतज्ञतेचा कटाक्ष फेकला आणि गप्पकन् चहा पिऊन तोंड पुसून तो पुढें म्हणतो, "आज जो प्रकार घडणार आहे त्यानें सरकारचे केस बहुधा दोन तासांत काळ्याचे पांढरे होतील. तो प्रसंग चित्रित करायचा असेल तर वाडिया मूव्हीटोनच्या कॅमेरामनला वाटल्यास बोलवून ठेवा. पण चाळीस हजारांखालीं परवडायचं नाहीं म्हणून सांगा. तें कॉंट्रॅक्ट जमलं तरच मी तुमच्याकडून हुंडा घेईन."

"हुंडा ?"

विसू रोडेनें सलज्ज होऊन खालीं मान घातली.

"मी एवढ्या गौरवाला पात्र नाहीं हें मला कळतंय्, तात्यासाहेब.... पण·... पण ... मला भीक घालाल एवढी? मला जावई कराल आपला?"

स्फोटानें मुंबईची पंचक्रोशी हादरली तसें झालें. स्फोटक विषयाशीं जास्त सान्निध्य असलेले खाणावळ-मालक तात्यासाहेब, त्यांचें तें साधेंसुधें सनातनी कुटुंब नि कमाताई ह्यांना हादरा प्रकर्षानें जाणवला ह्यांत नवल नाहीं. पण सीमाप्रांतावर असलेले नि विसू रोडेचा चक्कर स्वभाव जाणणारे आम्हीही धक्क्यानें दिङ्मूढ बनलों. दादा लड्डेच्या अनुमतीशिवाय कोणतीही भयंकर गोष्ट विसू रोडे करील हें आतांपर्यंत आम्हांला असंभवनीय वाटत असे. मीं दादाकडे भीत भीत नजर टाकली. पण शरीराप्रमाणेंच मनानेंही विशाल असलेला तो उदारधि एव्हांना स्वतःला सावरून विसूकडे वात्सल्यानें पाहूं लागला होता. लज्जेनें कमालीच्या आरक्त बनून गुडघ्यावर मान टेकलेल्या कमाताईकडे मीं पाहिलें, तिच्या वडिलांची प्रतिक्रिया नंबर दोन निरखली आणि एकंदरींत होतें आहे तें सर्वांच्या कल्याणासाठींच एवढा निष्कर्ष काढला.

"रोडेसाहेब." मालकसाहेब गहिंवरून म्हणाले, "माझा कानांवर विश्वासही बसत नाहीं. खरं बोलतांयू आपण?"

विसू रोडे पाठमोरा झाला आणि खिडकीबाहेर पाहात म्हणाला, "तुमच्या राजासारखा मलाही तुम्ही एक डाकू समजत असाल तर...तर...."

"छे छे, साहेब."

मालकांना अधिक बोलूं न देतां विसूनें झटदिशीं पुन्हा सभागृहाकडे तोंड करून म्हटलें, "आणि...कमळाबाईना सांगा, म्हणावं तुमची धुण्याची चोपणी बरोबर ठेवा रात्रीं. ...पाहिजे तर पिशवींत घालून आणा."

" तुम्हीच सांगा कीं. " अचंबलेला नि उल्हसलेला तो भाग्यवंत मालक हसत हसत म्हणाला. " हा सूर्य नि हा जयद्रथ.....अजूनही तुम्हांला दलाल लागतो ? "

विसू रोडेनें आपल्या नाटकाचा सबंध प्लॅन जरी आम्हांला उलगडून सांगितलेला नसला, तरी आम्हांला किमानपक्षीं त्याच्या भरतवाक्याची अंधुक कल्पना होती; आणि एकंदरींत आम्हीही तयारींत होतों. निघण्यापूर्वीं आरशापुढें उभे राहून अलीकडे थलथलीत बनलेले आपले दंड दादानें हताश भावाने निरखले होते; आणि मीं फळें कापण्यासाठीं आणलेल्या माझ्या मालवणी चाकूला हजामतीच्या जपानी फत्तरावर चरचरून धार लावली होती.

विसू रोडे संध्याकाळपासूनच महोत्सवाच्या जागीं जाऊन आपल्या कामावर रुजू झाला होता. आम्हीं संध्याकाळचें जेवण गुण्यागोविंदानें केलें. गिऱ्हाईक म्हणून आम्हांला ज्यांनीं प्रेमळपणानें सुगरण जेवण खायला घातलें होतें, त्यांनीं वराकडली मंडळी म्हणून आम्हांला भरवतांना कंकभटजीला मागें टाकलें असेल हें काय सांगायला पाहिजे ? एवढेंच सांगतों कीं आम्ही अगदीं मनमुराद जेवलों. बाहेर विद्युद्दीपांच्या माळांनीं नगरपथ तेजाळले होते, तर आमच्या पंगतीपुढें ' एकच समई मिणमिणत ' होती. पण कमाताई वाढायला येई तेव्हां तिच्या मुखावर ओसंडलेलें उत्फुल्ल सौंदर्य नि तेज पाहून माझें मन प्रसन्न बनें आणि एका कोमेजलेल्या निरागस जिवाला उमलवण्याचें सद्भाग्य बारा तासांत कमावणाऱ्या विसू रोडेचा मला एक क्षणभर हेवा वाटे.

रात्रीं साडेनऊ वाजतां आम्ही सर्व मंडळी प्रदर्शनाच्या जागीं गेलों. विसू संध्याकाळपासूनच ' कामावर ' जायला म्हणून बेपत्ता झाला होता.

प्रदर्शनाचें वर्णन मी पामर काय करणार ? अफाटपणांत नि आचरटपणांत मुंबईच्या हंगामी कार्निवालांची बरोबरी करील असें त्याचें एकंदर स्वरूप होतें. दरबारनें त्यासाठीं दीड लाख रुपयांचें पाणी केलें असून त्यासाठीं गेले नऊ महिने प्रजेनें एका एक्स्ट्रॉ सुपर हैपर टॅक्सची झीज सोसली होती. लुकलुक

करणाऱ्या विराट तारांगणांत चंद्रानें आपला तोरा मिरवावा नि सबंध कीटकसृष्टीला जीवन द्यावें, तसा छोट्या छोट्या विद्युद्दीपांच्या माळिकेच्या अग्रभागीं, प्रवेशद्वारावर, शोध-ज्योतीसारखा एक दशसहस्र मोम-शक्तीचा प्रचंड दीप भगभगत होता, आणि त्याच्या पांढऱ्या उज्ज्वल प्रकाशांत सभोवतालीं वळवळणारे हजारों मानवी जीवजंतु अभावितपणें किरणस्नान करीत होते.

दादा लड्डेनें पाकिटांतून रुपया काढून तिकिटांच्या खिडकींत फेकला आणि चार तिकिटांची एक अखंड माळ खरीदून ती बोटांभोवतीं गुंडाळीत, मला तात्यांना नि कोशाबाहेर पडलेल्या फुलपाखरांनीं करावी तशी डोळ्यांची कातर मिचमिच करणाऱ्या त्या दोन स्त्रियांना आंत नेलें.

आणि आंत शिरतांच आम्हांला असा भास झाला, कीं आम्ही कुठच्या तरी खऱ्याखुऱ्याच आघाडीवर आलों आहों.

पटांगणाच्या मध्यभागीं डांबरानें काळ्यामिट्ट केलेल्या फळ्यांचें एक वर्तुळ असून त्याच्या आंत गंज चढलेले रणगाडे, चिलखती गाड्या नि तोफा ह्यांची विचित्र वर्दळ नि कान किटकिटवणारा घरघराट सुरू होता. फळीपाशीं उभ्या असलेल्या अशिक्षित प्रेक्षक मंडळींत युद्धसामुग्रीचा श्रीगणेशा जाणणारा हरीचा लाल औषधाला सुद्धा सापडला नसता. ती अजब नि भयानक हालचाल पाहून बिचारे "अरे तिच्या!" करून एकमेकांच्या पाठीवर थापट्या मारीत, आ वाशीत, नाकांतून वारा ओढून घेत किंवा सोडीत, अशिष्ट कोट्या करीत (उदाहरणार्थ: रांडगाडा घराची धूळधाण करतो.), विस्मयानें हतबुद्ध होत किंवा दचकून मागें पुढें सरकत अगर एकमेकांवर आपटत. सारांश, वीररसाचें गुऱ्हाळ म्हणून खोललेल्या त्या प्रदर्शनांत बीभत्स नि भयानक रसांचे बंपरामागून बंपर फसफसत होते. प्रेक्षक मंडळींत एखाद दुसरी स्त्रीही होती. त्यामुळें तमाशाला शृंगाररसाची फोडणी देण्याचा अचकटविचकट प्रयत्न कांहीं मवाल्यांनीं चालवला होता. हा प्रचंड विकारसंगर पाहाणारांत जर्मनी किंवा जपानचा एखादा गुप्त हेर असता तर त्यानें खात्रीनें आपल्या सरकारला "They are ghouls. Stop War."

( हे वेताळाचे गण नाचताहेत. युद्ध थांबवा बुवा ! ) अशी तातडीची तार केली असती. पण यूयूनगरचे मदिरामत्त अधिकारी फक्त त्या एकाच बाबतींत स्वप्नांत सुद्धा जागरूक असायचे. त्यामुळें संस्थानांतले सर्व टणक फत्तर त्यांनीं केव्हांच जमा करून त्यांचा एक विराट पंचमस्तंभ गांवाबाहेरच्या त्या डोंगरी इमारतींत पक्का रोवला होता.

एकाही युद्धवाहनांत बसायला लायक माणूस संस्थानांत मिळाला नसल्यामुळें सर्व वाहनांची हालचाल जर्मनीच्या निर्मनुष्य विमानांप्रमाणें शक्तिघरांत बसलेला एक गांवठी रुंडस्टेट करवीत होता. हा अजोड युद्धसंचालक म्हणजे आपला यंत्रज्ञ विसू रोडेच होय हें निराळें सांगायला नकोच.

युद्धसाहित्याची माहिती पुकारायला कांहीं अडणीवरचे शंख नेमले होते. ते नेमके ह्याच वेळीं कुठें तरी महागाई भत्त्याची दारू पिऊन आपल्या लठ्ठ देहांनीं यूयूनगरचीं गटारें तुंबवीत होते. त्यामुळें बऱ्याचशा पोलिसांनाही तिकडेच जावें लागून प्रदर्शनाच्या जागीं थोडा सांवळा गोंधळ माजला होता.

इतिहासपूर्व प्राणिसृष्टीचें एक चित्र मीं ‘ होम लायब्ररी ’च्या एका पुस्तकांत पाहिलें होते, त्याची मला एकाएकीं आठवण झाली. रंगणांत फिरणारे ते राक्षसी युद्धरथ त्या अक्राळ विक्राळ आद्यपशूंप्रमाणें एकमेकांवर आदळत नि रटाळ आवाज करून दूर होत. पण त्यांच्या ह्या सर्व कृती यंत्रशक्तीनें होत असल्यामुळें त्यांत एक प्रकाची रेखीव सूत्रबद्धता होती ; आणि त्यांतला एकही टारगट गाडा फळकुटांच्या हद्दीबाहेर येऊन आमच्या केसाला धक्का लावणार नाहीं अशी आमची खात्री होती. कांहीं अशिक्षित प्रेक्षकजनांना मात्र ही भीति मानेवर टांगलेल्या तलवारीसारखी सदोदित जाचत होती.

नुकत्याच मागें टाकलेल्या किशोरावस्थेंत मिनिटभर पुन्हा रममाण झालेल्या कमाताईला आम्हीं जागृत केलें आणि अवास्तव गांगरलेल्या तिच्या आईबापांनाही शुद्धीवर आणून आम्ही पलीकडे गेलों. ह्या ठिकाणीं गंमत-चक्र ( Merry-go-Round ) नि पाळणे होते, त्यांचीही हालचाल स्थानिक माणूस ( Man on the

Spot) करीत नसून शक्तिघरांतला तो फील्डमार्शलच ह्याही शक्तीला जबाबदार होता असें आम्हांला कळलें. किंचित् डरत घाबरत लोक पाळण्यांत चढत होते. किंवा गंमतचक्राच्या घोड्या-गाढवांवर टांगा टाकीत होते. दहा मिनिटें हीं चक्रें फिरत आणि मग फी. मा. नें कळ दाबल्यामुळें खाडदिशीं उभीं राहात; आणि पैसे वसूल झाल्याचा आनंद, गिरक्यांमुळें आरंभलेली मळमळ नि कांहीं तरी विक्रम केल्याचें समाधान अशा संमिश्र विकारांनीं भारलेले ते वीरपुरुष ( स्त्रिया नसतच त्यांत ) मोठ्या डौलानें पाळण्याबाहेर ( किंवा जनावराखालीं ) पदन्यास करीत.

" काय, बसायचंय् का कमाताई त्या तट्टावर ! " असें मोठ्या विनोदानें दादा लठ्ठे विचारीत आहे नि त्यावर कमाताई " शी... " करून मोठ्या ठसक्यानें मान वेळीत आहे, तोंच एक विवक्षित शीळ वाजली. क्षणभर सगळीकडे गडबड हाकाहाक झाली आणि मग एकाएकीं स्टो विझून व्हावी तशी सर्वत्र भयाण सामसूम विराजली.

महाराजाधिराज सरकारस्वारी येत असल्याची ती खूण होती. दंडेवाल्या राजपुरुषांनीं येऊन लगेच रस्ता मोकळा केला आणि आम्हीही तें राजबिंडें थोबाड पाहाण्याच्या आतुरतेनें जरा सावरून उभे राहिलों.

आम्ही उभे होतों तिथून प्रवेशद्वार दिसत असल्यामुळें तिथें मांजराच्या पावलांनीं सर्रदिशीं येऊन उभी राहिलेली ती लांबच लांब काळीभोर रोल्सरॉइस आम्हांला स्पष्ट दिसली. तिची दिंडी उघडून एक लठ्ठ पोटाचा पगडबंद ( हा दिवाण असल्याचें लवकरच आम्हांला कळलें. ) खालीं उतरला आणि त्यानें नि शोफरनें मिळून थोड्याच वेळांत महाराजांचा जीवन्मृत देह खालीं आणला. आश्चर्याची गोष्ट ही कीं विसू रोडेही स्वागतार्थ जवळ उभा होता. त्यानेंही एक प्रदीर्घ पण फक्त आम्हांलाच उमगणाऱ्या उपरोधाची छटा असलेला असा मुजरा केला. दिवाणसाहेबांनीं त्याची खाशांना ओळख करून दिली. सरकारस्वारी मोठ्या कष्टानें हसली आणि मग तो शीण असह्य होऊन आधारासाठीं विसूच्या गळ्यांत पडली. ह्या गौरवाला आपण अपात्र असल्याची

जाणीव होऊन विसूनें त्यांना विनयपूर्वक दिवाणांच्या आंगावर ढकललें आणि दिवाणांनीं तें धूड सावरून मोठ्या काळजीपूर्वक अन्तर्भागांत लकटीत आणलें. दरम्यान विसू रोडेनें तकतकीत इस्त्रीचा पांढरा शुभ्र गणवेष घातलेल्या त्या शोफरला 'पकडाव' करून आंत नेलेला मीं स्तिमित दृष्टीनें पाहिला.

कामधेनूनें नुसती इच्छा करण्याचा अवकाश, सप्तपाताळांतून जशी दशसहस्राची सेना हां हां म्हणतां उभी केली, तसा महाराजसाहेबांनीं प्रदर्शनांत नुसता पाय ठेवण्याचा अवकाश, जनसंमर्दात कुठें तरी लुप्त झालेले नि गर्भगरिबांना शोभणारी भिकार मजा मारीत असलेले त्यांचे दशप्रधान दाही दिशांकडून अवचित प्रगट झाले. आणि त्यांनीं महाराजांना घेरून अकराजणांची ती अक्करमाशी टीम लवकरच 'हेंः हेंः हेंः हेंः' नि 'हूंः हूंः हूंः हूंः' करीत सभामंडपांत येऊन पोचली.

नंतर महाराजसाहेबांनीं, माशा माराव्यात तसें, आपल्या दशप्रधानांना नुसत्या हातानें झिडकारून दूर केलें. 'एकटा दिवाण मला पुरे आहे; तुम्ही जा, जरा खेळा बिळा!' असें त्यांनीं मोठ्या खुषींत येऊन हसत हसत सांगितलें. खुद्द हुजूर 'खेळा' म्हणून सांगताहेत, मग आणखी काय पाहिजे, अशा कल्पनेनें मला वाटतें, मग ती प्रधानावळ गंमतचक्राकडे वळली. त्यांच्या नुसत्या आगमनाची वार्ता लागतांच, यक्षिणीची कांडी फिरावी नि व्हावें, तसें झालें. गंमतचक्र एकाएकीं थांबलें आणि सर्व जागा पटापट रिकाम्या झाल्या. दशावतारांच्या थाटांत दशप्रधान दहा निरनिराळ्या वाहनांवर आरूढ झाले; आणि पुन्हा गंमतचक्राला गति आली.

गंमतचक्रांत स्वतःला गुंतवून न घेतां बाहेरून त्याच्याभोवतीं चक्कर टाकली कीं लगेच विस्तीर्णसा सभामंडप लागायचा. ह्या सभामंडपांतच महोत्सवांतला मुख्य कार्यक्रम होता. मंडप म्हणजे एक तमाशाचें थिएटरच होतें. आंत बसण्यासाठीं विराट जाजम घातलेलें होतें; आणि सर्वांनीं सारख्या टिकल्या मोजल्या असूनही आंत ज्याला त्याला त्याच्या 'इतमामा'प्रमाणें बसवण्यांत आलें होतें. समोर मध्यभागीं एक लहानसें व्यासपीठ असून त्यावर चौतरफ

युयुत्सु घोषवाक्यांचे फलक लटकत होते. उदाहरणार्थ ‘ पुरे बढाई–करा लढाई ’ ‘ रोख्यांत खर्चील त्याचा पालक ( म्हणायचें असावें बाप ! ) चर्चिल ’ ‘ कर्जरोख्यांत गुंतवा नि लोकशाही जिंकवा. ’ ‘ चर्चिलचा बटलर–ॲडॉल्फ हिटलर ’ इ० इ०

महाराजसाहेब लंगडत लंगडत आंत येतांच सर्व लोक उठून उभे राहिले. स्वारी अग्रभागीं जाऊन सिंहासनावर आदळतांच त्यांच्या सन्मानार्थ कीं काय, पण कुठून तरी पुन्हा एक फुसका बार झाला. नंतर घंटा झाली नि पडदा वर गेला. छापरी मिशांच्या एका सेवानिवृत्त सुभेदारानें सूत्रधाराच्या आविर्भावांत ‘ आधिं नमुं विनु चर्चिला... ’ ही नांदी म्हटली आणि मग पहाटे स्नान संध्या करून शुचिर्भूत बनून बोटांना रक्तचंदन फासून अटलांटिक सनदेचें जो तीन वेळां ( थ्री चीअर्स फॉर दि बिग थ्री ! ) पठण करील त्याचीं सर्व पापें धुतलीं जातील इत्यादि इत्यादि त्यांनीं सांगितलें. मग हिटलरचा एक मातीचा पुतळा रंगपटांतून ‘ मेली–टर्री ’च्या ( हें एक स्थानिक उच्चारण किंवा dialect आहे. ) पोषाखांतल्या चार रासवटांनीं ढकलत ढकलत स्टेजवर आणून मध्यभागीं उभा केला. नंतर रासवट नंबर एकनें हिटलरचा तो स्वस्तिक चिन्हांकित खाकी शॉर्टकोट टर्रदिशीं फाडून टाकला. त्याबरोबर प्रेक्षकांतले कांहीं म्हातारे फर्रदिशीं हसले. एवढ्यावरही यत्किंचित् हालचाल न करतां ( अहिंसेच्या नांवाखालीं खास नव्हे ) भेकड स्तब्धता पत्करणाऱ्या त्या फडतुस ॲडॉल्फची तुमान नंबर दोनच्या रासवटानें ओढली आणि तिच्या चिंधड्या केल्या. ह्या वेळीं प्रेक्षकांत असलेल्या मूठभर स्त्रिया सलज्जतेनें मागें वळल्या आणि थोडे ओंजळभर पुरुष त्यांना बघण्यासाठीं निर्लज्जतेनें मागें वळले. विनोद ह्या ठिकाणीं परमोच्च बिंदूला पोचला असल्यामुळें हशाचा नि टाळ्यांचा कडकडाट झाला आणि खुद्द महाराजसाहेबही वाजवीपेक्षां जास्त प्रक्षुब्ध झाल्याचें त्यांच्या खुर्चीचा जो कर्रर्र् आवाज झाला त्यावरून दिसलें. सुदैवानें हिटलरनें आंतून लंगोट कसलेला होता ; आणि वस्त्रहरण जास्त चालू ठेवलें तर त्या पाप्याचीही लाज झाकायला एखादा भगवान् धावून यायचा ह्या भीतीनें कीं काय, पण त्या दोन्ही रासवट वीरांनीं आपला पराक्रम इथवरच थांबवून दोन दिशांना प्रयाण केलें.

मग महाराज जागचे उठले.

अर्थात् सभामंडपही ( जाजम, खांब नि झालरी वगळून ) उठला. दिवाणसाहेबांनीं महाराजांच्या हातांत कांहींतरी दिल्यासारखें दिसलें. तें एक धनुष्य होतें. त्याला दोन सेवकांनीं एक बाण जोडून दिला आणि दोन्ही बाजूंनीं महाराजांचे दोन बाहु पकडून त्यांच्याकरवीं तीरकमठा वाकवला. आणि मग तो अमोघ तीर जो सूं सूं सुटला तो स्टेजवर उभा असलेल्या हिटलरच्या त्या आर्यन् ( टूथब्रश ) मिशींत रुतून, हुकूमशाहीचें देखतां डोळां निखंदन झाल्याचें सर्वांना दिसलें. लगेच 'हिटलरकी हुर्यो' नि 'महाराज सरकारकी जय' म्हणून आरोळ्या उठल्या आणि सरकार त्यामुळें इतके बेहोष झाले कीं त्यांच्या आंगांत कधीं नव्हेशी शक्ति शराबीसारखी धबधबूं लागली. सेवकगणाच्या प्रतिरोधाला न जुमानतां त्यांनीं खुर्चीवरून उठून ताडदिशीं स्टेजवर आरोहण केलें नि त्या पाप्याच्या पितराला अशी एक उन्मत्त लाथ हाणली, कीं त्यामुळें त्या बदमाष बाहुल्याच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडून अखेर अंतर्धान पावल्या.

नंतर, पुराणांत मारुती करी तसा एक बुभुःकार करून महाराज सरकार बेशुद्ध पडले; नि खास आरामघरांत नेले गेले.

पंचवीस मिनिटांनीं स्वारी शुद्धीवर आली. पण स्वारीची कर्तव्यबुद्धि एवढी दांडगी कीं पुन्हा येऊन थिएटरांतल्या आपल्या सिंहासनावर ती आरूढ झाली. कपाळाला रेशमी बॅण्डेज गुंडाळलेलें, पायाच्या दुखावलेल्या आंगठ्याला जाम्बुकची मलमपट्टी केलेली नि त्यामुळें एक जोडा पायांत तर दुसरा हुजऱ्याच्या हातांत, अशा थाटांत स्वारीनें प्रवेश केला होता; आणि प्रजाजनांनीं किंचाळून त्यांचें स्वागत केलें होतें. त्याचा स्वीकार करीत एक बादशाही हावभाव करून त्यांनीं पुढच्या अंकाला चालना दिली.

ह्या अंकांत सैन्याला रमवण्याचें पवित्र कंकण हातांत बांधून आलेल्या सात सिंगापुरी सुंदरी ( आमच्यासारखे बुजरे पुरुष लाजूं नयेत ह्या सदिच्छेनें )

लंगोट नि काचोळ्या घालून स्टेजवर आल्या आणि तंगड्या फाक फाकून नाचल्या. ‘ वन्समोर ’ ‘ वहिनी लांडोर ’ वगैरे प्रकार होऊन प्रेक्षकही उठून नाचले. दौलतजादा झाला, नि लोकांनीं वार ( योषित् ) फंडाला म्हणून पैसे उधळले. महाराजसाहेबांनींही खिशांतून एक नोटांचें बंडल काढलें.

...आणि परत खिशांत ठेवलें.

कारण त्याच वेळीं त्यांना गरगरल्यासारखें होऊन पुन्हां मूर्च्छा येण्याचा रंग दिसूं लागला. तत्क्षणीं दिवाणांनीं स्वतः सावध होऊन सेवकांकरवीं त्यांची गठडी उचलली नि प्रदर्शनाबाहेर नेली. साडेअकरा वाजायला आलेच होते तेव्हां आम्हीही सभामंडपांतून सटकलों. बिचाऱ्या त्या सालस कमाताईनें नि तिच्या आईनें तर केव्हांच बुद्धया आंधळेपण पत्करणाऱ्या गांधारीप्रमाणें डोळे गच्च मिटून घेतले होते.

प्रवेशद्वाराशीं आम्हीं आलों त्या वेळीं आणखीच गोंधळ उडालेला आम्हांला दिसला. महाराजसाहेबांचें मुटकुळें रोल्स–रॉइसमध्यें कोंबण्यांत आलें होतें. पण शोफरचा पत्ता नव्हता. आतां काय करावें, गाडी कशी हाकावी, असा सर्वांना प्रश्न पडला होता. महाराजांची शुद्ध अर्धवट हरपलीच होती. इतक्यांत विसू रोडे कुठून तरी उपटला नि म्हणाला, “ तुमचा शोफर दारू पिऊन पडला आहे. शिवाय डांबराच्या उलट्या बादलीवर बसल्यामुळें त्याच्या प्रचंड पांढऱ्या पृष्ठभागावर स्वस्तिक चिन्ह उमटलं आहे. तेव्हां तो येणं शक्य नाहीं. पण... दिवाणसाहेब आपण बिलकुल फिकीर करूं नका. मी चालवतों गाडी ! ”

“ देव तुमचं भलं करो ! ” गोंधळलेल्या दिवाणसाहेबांनीं त्याला दोन्ही हात वर करून पोटभर आशीर्वाद दिला.

झटदिशीं विसू रोडे ड्रायव्हरच्या सीटवर बसला आणि त्याला म्हणाला, “ किशा, तूं माझ्या शेजारीं बस. ”

" म्हणजे ?" दिवाणसाहेब.

" हें बघा दिवाणसाहेब," विसू शांतपणें म्हणाला, " ही मंडळी माझी दोस्त आहेत. त्यांना जायचंय् एका ठिकाणीं. तेव्हां त्यांना वाटेंत सोडलं तर तुमचं काय बिघडलं त्यांत ?"

" पण...पण..." दिवाणसाहेब तोतरले, " सरकारस्वारी बसली आहे..."

" बसेना. तिची तर कांहींच हरकत दिसत नाहीं." त्या मढ्याकडे एक तुच्छतेचा कटाक्ष फेकून विसू उद्गारला. " पहा बुवा. तुम्हांला नसेल पटत तर हा चाललों मी. राजीनामा सादर."

" छे छे !...तसं..."

दिवाणसाहेब आणखी कांहीं पुटपुट करताहेत तों विसूच्या खुणेला मान देऊन दादा लष्ठे नि तात्या त्या राजविलासी रोल्स-रॉइसमध्यें चढले नि खुद्द हुजूरस्वारीला चिकटून बसले. नंतर काकू नि कमाताई आंत चढल्या नि त्यांच्यासाठीं घडीच्या सीटा उलगडल्यावर त्यांचीही बसायची सोय झाली.

वायुवेगानें मोटार पळवून विसू रोडेनें शहराबाहेर आणली. त्यावेळीं गार वारा आंगाला झोंबत होता आणि चंद्र ढगाआड लपल्यामुळें वातावरण धूसर काळोखी दिसत होतें.

" संपली का संस्थानची हद्द ?" विसू रोडेनें मागें वळून प्रश्न केला.

" संपली. " तात्या रुद्ध कंठानें म्हणाले.

विसूनें गाडी उभी केली. सर्वांना उड्या टाकायला सांगितलें. मग दादा लष्ठे, विसू रोडे, मी नि तात्या अशा चौघांनीं सरकारस्वारीचें तें आतां वळवळ करू

लागलेलें मढें उचलून खालीं काढलें आणि रस्त्यापासून पंचवीस एक यार्डोवर एका झुडपाआड ठेवलें.

" तुम्ही या आतां. " सेनापतीच्या आवेशांत विसू रोडे गरजला. लगेच काकू नि कमाताई किंचित् भयभीत होत्सात्या पुढें आल्या. विसू थोडा बाजूला झाला.

महाराजसाहेबांनीं ह्याच वेळीं आपले किलकिले डोळे उघडले. समोर उभी असलेली कमाताई तत्क्षणीं त्यांच्या दृष्टिक्षेपांत आली.

" कोण ?...कोण...कोण तूं ? " महाराज बरळले.

" मेल्या हलकटा चांडाळा ! " त्या बालिकेचा क्रोध एकदम जागृत झाला. " कोण म्हणून विचारतोस ?...नीट डोळे फाडून बघ ! ओळखलंस ?..."

" तुला...तुला...पाहिल्यासारखं वाटतं एकदा ...प्यारी ! "

विसू रोडेनें दादा लट्ठेला खूण केली. दादानें मोटारींतून धुण्याची धोपटणी उचलून आणली होती ती कमाताईपुढें केली. विसू रोडे तिच्या कानाला लागून म्हणाला, " मला वाटतं, सटासट बडवायला पृष्ठभाग सर्वांत बरा...आणि हात आखडता घेऊं नका बरं का ? अगदीं निःसंकोच हाणा. "

प्रयोग पुरा झाला. एखाद्या फाटक्या गोऱ्यालाही भोजनाला बोलावलें असतां सरकारस्वारीच्या टेबलावर जें पिस्त्यांनीं भरलेलें परिपक्व बदक हटकून आढळायचें, तसें ठेचून चेचून चोचून महाराजांना पूर्ण खमंग न् मुलायम बनवल्यावर, तशा अर्धमेल्या अवस्थेंत त्यांना आम्हीं पलीकडच्या नाल्यांत फेंकून दिलें आणि पुन्हा रोल्स–रॉइसमध्यें बसलों. विसू रोडेनें नंबराची पाटी काढून फेकून दिली. दुसरी आपल्याबरोबर प्रथमपासूनच तयार ठेवलेली बनावट नंबराची पाटी लटकावली; आणि मोटार विक्रमांत मेजर सीग्रेव्हला मागें टाकायचा जणूं विडाच उचलून धडाक्यानें रोल्स–रॉइस पुढें हाकली.

एक मोठी जोखीम शिरावरून दूर झाल्यामुळें आम्ही सर्व जरा खुषींत होतों. कानांभोवतीं मफलर गुंडाळीत नि हात एकांत एक अडकवून दादा मृगनक्षत्राकडे पाहात म्हणाला, " सगळं ठीक झालं. विसू, आपली चक्रमपूरकरांची परंपरा–जरा एकांडेपणानें वागून का होईना ( विसूनें पहिल्यापासून आम्हांला विश्वासांत घेतलें नाहीं हें शल्य दादाच्या मनांत डांचत होतें हें उघड दिसलें. )– तूं कायम राखलीस ही समाधानाची गोष्ट आहे. पण...पण...सकाळीं तूं बाजारांतनं हमाल न करतां डोईवर वाहून जें कुलूप आणलंस तें कुठें आहे ? त्याचं काय झालें ? "

" शक्तिघराला लावलं. " विसू रोडे संथपणें उत्तरला. " कारण सगळ्या महोत्सवाचं विद्युच्चलन तिथूनच होतं. अर्थात् तिथून येण्यापूर्वी ' स्विच ऑफ ' करून दिवे मालवले जातील एवढी व्यवस्था मीं केली आहे. पण प्रधानांचं दसकडं घेऊन मिनिटाला पन्नास फेरे ह्या गतीनें गरगर फिरणारें तें गंमतचक्र थांबण्याची मात्र ( त्रिवार मान हलवून ) मीं व्यवस्था केलेली नाहीं... कांहीं गोष्टी करायच्या राहून जातात..." असें म्हणून विसूनें खिशांतून एक विराट लोखंडी किल्ली काढली आणि क्षणभर दादापुढें अभिप्रायार्थ धरून मग दूर कुठें तरी भिरकावून दिली.

आम्हीं पाहातच राहिलों.

  

अनेक सुरम्य नि भयानक प्रसंगांतून टक्के टोणपे खात निभावून, चौदा तासांनीं एका रेल्वे स्टेशनपासून सुमारें अर्ध्या मैलाच्या अंतरावर आम्हीं पोचलों होतों. अत्यंत भीषण असा डोंगराळ प्रदेश होता तो ; आणि अत्यंत दुस्तर अशा एका निरुंद रस्त्यानें विसू रोडेनें मोठ्या शिताफीनें गाडी वर आणली होती. दोन्ही बाजूंना, डोळे फिरवणाऱ्या खोल खोल दऱ्या होत्या. खाडदिशीं ब्रेक दाबून त्यानें गाडी उभी केली आणि आम्हांला म्हटलें, " दादा, किशा,...' अदृश्य माणूस ' चित्रपट आपण सर्वांनीं पाहिलाच आहे. "

" बरं मग ? " मीं चाचरत म्हटलें.

" एच. जी. वेल्सपासून त्याची एक कॉपीराइट कल्पना थोडी बदलून मी लुंगावणार आहे. आंत न बसतां गाडी चालू करून तिचा निःसारथी अवस्थेंत कडेलोट करायचा माझा बेत आहे. "

आणि त्याचा तो बेत पार पडलेला आम्हीं उघड्या डोळ्यांनीं पाहिला. दरम्यान आमच्या छात्या एवढ्या वेगानें धडधडत होत्या, कीं दरींत मोटारीनें लोटांगण घातल्यावर जो काय आवाज निघाला असेल तो आम्हांला अजिबात ऐकूं आला नाहीं.

नजीकच्या रेल्वे स्टेशनवर पोचतांच आम्हांला असें आढळून आलें, कीं जी. आय. पी. चें हें एक हिल स्टेशन आहे; आणि आम्हीं दक्षिण हिंदुस्थान नि मध्य हिंदुस्थान केव्हांच मागें टाकून तूर्त उत्तर हिंदुस्थानांत पदार्पण केलेलें आहे.

" अगबाई ! " काकूंनीं व्यावहारिक शंका काढली. " इतक्या दूर परत जायचं म्हंजे आतां पैसे तरी कुठें आहेत ? "

मी फिसफिसलों, " दोन इसम कमी करायचे, काकू. तेवढीच काटकसर. आपली ब्याद परत पाठवून विशा मधुचंद्रासाठीं इथें राहाणार असावा. "

दाढीवरून हात फिरवीत दादा लठ्ठेनें विसूकडे चमत्कारिक नजरेनें पाहिलें; आणि तो कडवट आवाजांत म्हणतो, " छे, बुवा ! ह्या अघोरी प्राण्याच्या बाबतींत असली नाजूक भाषा वापरूं नका. चंद्राच्या ऐवजीं सूर्य वापरा आणि मधूच्या ऐवजीं..."

" हलाहल. " प्रत्येक खाद्यपदार्थावर अधिकारी वाणीनें बोलूं शकणारे तात्या उद्गारले.

" हां...हां...विषारी भाषा बोलूं नका, तात्या. " मी त्यांना थोपवलें. " आमच्या कमावहिनींना तें आवडायचं नाहीं...अहो, प्रेम हें वीष का

अमृत ' असली गांवढळ शंका आलीय् कीं काय तुम्हाला ? "

कमाताईनीं नुसतेंच लाजून एक चोरटा कटाक्ष विसू रोडेकडे फेकला आणि मग चेहऱ्यावरची एकही रेखा हलूं न देतां तो धीरोदात्त पुरुष खिशांतून एक नोटांचें बंडल काढून सेकंड क्लासचीं तिकिटें काढायला आणि उभ्या उभ्या तशीच घारूअण्णांना एक तार ठोकायला निघून गेला.

# अ ण्णां चें अधिकारग्रहण

' कॉंग्रेस वस्त्रें घेणार. '

आधींच अण्णा खुषींत होते. त्यांत सायंपत्रांचे वरील आशयाचे भले जंगी फलक त्यांच्या दृष्टीस पडले तेव्हां त्यांचा आनंद द्विगुणित झाला.

' अण्णा आधींच खुषींत होते ' असें जें मीं म्हटलें तें उगीच नाहीं. अण्णांच्या प्रसन्न वृत्तीचें एक कारण त्यांच्या खिशांत खुळ खुळ....छे ! करॉंव करॉंव... करणारा पावणेदोनशेंचा पगार ! मुद्दाम पावणेदोनशें म्हणण्याचें कारण असें, कीं गेल्या महिन्यापर्यंत अण्णांना अवघे एकशें सत्तर मिळत असत.

आणि अण्णांच्या आनंदाची दुसरी निशाणी म्हणजे, तो पाहा अण्णांच्या खांद्यावर, हात ठेवून चालणारा मद्रासी मित्र कूर्मबसवशंकराचार्य. नांव कूर्म, पण चालतो आहे सशासारखा उड्या मारीत. अण्णांचा वक्तृत्ववेग बेताचाच असल्यामुळें ते त्याला ' कूर्म ' एवढेंच म्हणत.

आणि कॉंग्रेस दिवाणगिऱ्या घेणार हें ऐकून अण्णांचा आनंद वाढण्याचें कारण असें, कीं अण्णा जरा शांत वृत्तीचे नि धिम्या चालीचे होते. वास्तविक कॉंग्रेसनें वस्त्रें घेतलीं काय, किंवा त्यांच्या मद्रासी मित्राच्या हेटाळणीवजा शब्दांत बोलायचें तर....वस्त्रे घेतले काय, अण्णांसारख्या सरकारी नोकराला त्याचें काय होय ? पण प्रिय वाचकांनीं अण्णांबद्दल इतका गैरसमज करून घेऊं नये.

त्याचें असें होतें. अण्णांना साऱ्या गोष्टी समजत होत्या. मनानें ते भारी मोठे देशभक्त होते. पण तितकेच शांत नि धिमे पडले ! त्यांना भारी वाटत असे, कीं चळवळ करावी. पण ती कशासाठीं ?...तर देशासाठीं ! एरवीं त्यांचा

स्वभाव मुळींच चळवळ्या नव्हता. जेवावें, साडेनऊच्या गाडीनें चर्चगेटला जावें, पास दाखवून बाहेर यावें, सिनेमाची टोलेजंगी इमारत कितपत बांधून झाली हें रोज एकदा पाहावें, ऑफिसांत जावें, लेजरफायलींत वेळ घालवावा आणि संध्याकाळची ' फास्ट ' पकडून पुन्हा घरीं पळावें हा त्यांचा ठराविक कार्यक्रम ! संध्याकाळीं ते फिरायला जात, पण तेही शांतपणा मिळावा म्हणून कारण अण्णीणबाई म्हणजे तोफखाना होता.

अण्णा त्यांना भारीच भिऊन असत. असा एकही दिवस गेला नाहीं, कीं जेव्हां अण्णींनीं त्यांच्यावर भडिमार केला नाहीं. ह्याला कांहीं कारण लागत असे असेंही नाहीं. अण्णांनीं इतकेंसें कांहीं केलें तरी तेवढें निमित्त पुरत असें. अण्णांनीं कांहींच केलें नाहीं तर काय...बोलायला जागा भरपूरच !

तीस सालच्या चळवळींत अण्णांनीं हट्टानें टकळी आणली होती. त्या वेळीं त्यांच्या घरीं दोन टकळ्यांचें युद्ध सुरू झालें. त्यांत शेवटीं अण्णा हरले आणि त्यांना आपली ' दीड दमडीची भिंगरी ' अडगळींत फेकावी लागली. त्या टकळी प्रकरणापासून अण्णांच्या हृदयाला अगदीं ' चरका ' बसला.

चमत्कार असा, कीं ज्या अण्णींनीं त्यांना सत्याग्रहापासून दूर ओढलें, त्याच अण्णी अलीकडे सत्याग्रहाकडे त्यांचें मन खेचीत होत्या...अर्थात् अप्रत्यक्षपणें ! म्हणजे असें, कीं कधीं कधीं अण्णांना वाटे, असल्या कटकटीपेक्षां ' क ' वर्ग पत्करला. गपचीप पडून राहिलों तर वॉर्डर नुसताच रोखून पाहील; बोलणार तरी नाहीं.

पण आज मात्र अण्णा खुषींत असल्यानें खेरसाहेब मुख्य प्रधान होणार हें ऐकून त्यांना बरें वाटलें. बरें वाटलें म्हणजे काय, अगदीं कमालीचा आनंद झाला ! तो इतका कीं रेस्टॉरंटमध्यें चढतांच त्यांनीं चक्क दोन आइसक्रीमची ऑर्डर दिली.

थोड्या वेळानें तोंडांतलें बोट काढून कूर्मानें विचारलें, " आइसक्रीम ? "

" मग काय झालं त्यांत ? "

" नाहीं...मला वाटलं सिंगल चहा बोलावशील. "

अण्णांनीं करुण दृष्टीनें कूर्माकडे पाहिलें. " कूर्म ! " ते सद्‌गदित कंठानें म्हणाले, " तूं माझ्या मनाची अशीच का कल्पना केलीस ? इतके दिवस मीं कधीं कुणालाच कांहीं दिलं नाहीं म्हणून चिक्कू समजतोस काय रे मला ? त्याचं कारण निराळं आहे बाबा ! मला कुणाशीं बोलायला आवडत नाहीं, कुणाशीं चालायला आवडत नाहीं..."

इतक्यांत वेटरनें तांबड्या पिवळ्या आइस्क्रीमच्या दोन बशा आणून ठेवल्या. कूर्मानें चमचा उचलून विचारलें, " वरीड ? ( विटलास ? ) "

" टु डेथ् ! ( वारलों ! ) " अण्णा उत्तरले. " एकदा वाटतं, सगळं सोडून द्यावं, प्रॉव्हिडंट फंड उचलावा नि संन्यास घ्यावा. "

" आणि बायको ? " कूर्मानें सूक्ष्म नजरेनें त्यांच्याकडे पाहात, थोडा वेळ मध्यें जाऊं देऊन विचारलें.

अण्णा एकदम चमकले. त्यांच्या टायवर थोडें आइसक्रीम उडालें.

" तिला करीन पिकेटर. " थोड्या वेळानें त्यांनीं ठोकून दिलें.

" ओ बॉय्य ! " आइस्क्रीमची बशी आपटून कूर्मानें सहजगत्या आश्चर्य दर्शवलें ; आणि त्या उद्‌गाराचा निराळा अर्थ घेऊन पोऱ्या जवळ आला, तेव्हां ' आलाच आहेस तर आण एक प्लेट ! ' असें त्याला नाखुषीनें सांगितलें.

नंतर हाताचीं कोपरें टेबलावर टेकून अण्णांकडे रोखून पाहून त्यानें म्हटलें, " दोस्त, मला थापा देऊं नकोस. कशाला लपवतोस माझ्यापासनं ? "

अण्णांनीं चमचा खालीं ठेवला. ते चकित झाले होते.

" कुणालां रे करणार पिकेटर ? " कूर्म पुढें म्हणाला. " बायकोला ?...हुँः ! गोष्टी सांगतोय् मला ! "

नवीन आलेलें आइस्क्रीम अर्धें अण्णांच्या बशींत ओतून त्यानें सांगितलें, " तुझी पिडा काय आहे तें मला विचार वाटल्यास ! "

अण्णा आरक्त झाले.

" अरे, " आइस्क्रीम तोंडांत घालून कूर्म गरजला, " मी एका काळीं जसा होतों तसाच तूं आज आहेस,...कोंबडीनें चोचलेला नवरा !......हं, गोरामोरा होऊं नकोस. अरे, पुष्कळाचं नशीब असतं असं. माझी नव्हती अगदीं थेट अशीच स्थिति ?...पण मीं एक दिवस पाय आपटले जोरांत. आणि आतां शामत नाहीं तिची एक शब्द बोलण्याची ! "

अण्णा हळुहळू उत्सुक बनले. एवींतेवीं आपलें रहस्य बाहेर फुटलें आहे, तेव्हां आतां त्यावरील उपाय कां ऐकूं नये असा विचार करून त्यांनीं कान टवकारले.

" काय केलंस तूं ? " त्यांनीं भीत भीत विचारलें.

" काय केलं ? अरे, ती कांहीं बोलली तरी उलट गेलों तिच्या ! एक दिवस म्हणाली, घालीत नाहीं जेवायला, उपाशी जा. मीं विचार केला, हिचा कान धरून बसवावं सैंपाकाला ! पण म्हटलं, जाऊंद्या. इतका वेळ नाहीं. उगीच माटुंगा स्पेशल चुकेल ! तेव्हां एक शब्द न बोलतां सदरा घातला नि अन्नपूर्णा बोर्डिंगांत जेऊन आलों. "

" वा ! ह्यांत तिचं कुठें बिघडलं ? "

" ती म्हणाली, उपाशी जा, गेलों नाहीं....दुसरं ऐक. तिनें सांगितलन् काळ्या चौकोनांचे कांठ असलेलं पातळ आणा. मीं पार्सल आणलं. तिनें उघडलन्. आंत होतें पांढऱ्या त्रिकोणांचे कांठ असलेलं धोतर. "

" धिस इज समथिंग. ( हां, ह्यांत आहे थोडा पराक्रम! ) " अण्णा विचार करीत म्हणाले.

" आणखीन् ऐक. तिनें फर्मावलं, कॉफी प्यायला रोज फार लोक येतात. उद्यां कुणाला बोलावलंत तर खबरदार. दुसऱ्या दिवशीं मीं पंचवीस मंडळींना बोलावून कॉफी पाजली नि दोशे दिले. "

" छान !...तूं सांगितलेला इलाज विचार करण्यासारखा आहे. " अण्णा खरोखरीच विचारमग्न होऊन म्हणाले. " ती म्हणेल त्याच्या अऽ...उलट जायचं का ? "

" आणि एवढं लक्षांत ठेव कीं एकदा युद्धाला तोंड दिलं, कीं मागें पाहायचं नाहीं. मारूं किंवा मरूं. "

" म्हणजे एकमेकांचा खून पाडायचा कीं काय ? "

" तितकी पाळी येत नाहीं. आपसूक ताळ्यावर येते बायको नि मग सन्मान्य तह होतो. पण अर्थात् हें लक्षांत ठेव, कीं तहाआधीं कडाक्याचं युद्ध हवं. व्हॉट्ट इज गुड्ड विदाउट बॅटल्ल ! कॉंग्रेस न् अधिकारग्रहण ! करायच्यात काय त्या गोष्टी आपल्याला, जर आपल्या घरांत अधिकार नाहीं आपला ? "

" अगदीं बरोबर ! " अण्णा उत्साहानें त्याचा हात दाबून म्हणाले आणि ही दुक्कल चर्चगेटकडे वळली.

कूर्मानें सांगितलेला उपाय चांगला होता ह्यांत शंका नाहीं. पण तो अंमलांत आणायचा कोणी न् कसा ? मांजराच्या गळ्यांत घांट बांधायची कोणीं ?

माटुंग्याला अण्णा आपल्या घराचा जिना चढूं लागले ते भीत भीतच. त्यांचा अर्धाअधिक उत्साह आतां गळून गेला होता. युद्ध करायचें ठरलें खरें; पण समरांगण जवळ येतांच फें फें उडूं लागली. इतक्यांत त्यांची छोटी एकुलती एक मुलगी सुमन जिन्यांत खेळत असलेली भेटली. वडील दिसतांच 'अण्णा-अण्णा!' करीत सुमन त्यांना बिलगली आणि तिनें सवाल केला, "आणलंत आईचं कापड?"

बस्स्! अण्णांना जो अंगार हवा होता तो मिळाला. त्यांचें लुप्त झालेलें तेज पुन्हा पेटलें. सुमीवर डोळे वटारून ते खेकसले, "कापड? कसलं कापड?...जा, आईला जाऊन सांग कापडबिपड कांहीं आणलं नाहीं म्हणून."

बिचारी सुमन हे नवे अण्णा पाहून क्षणभर थक्क झाली ह्यांत शंका नाहीं. पण लगेच अण्णांचा कोट धरून म्हणाली, "पण रागावतां काय असे अण्णा? नाहीं आणलंत तर नाहीं आणलंत! आईनें मघांच घेतलं आहेन् पोलक्याला कापड चिन्याजवळून."

"चिन्याजवळून!!" उंबरठ्यावर पाय ठेवून अण्णा ओरडले, "म्हणजे परदेशी कापड! लाज नाहीं वाटत विलायती जिनसा घ्यायला? तिकडे आमचे पुढारी घसा फोडून मरताहेत, जेलमध्यें तुकडे मोडताहेत, न् आम्ही मात्र...."

"काय ग सुमे?" आंतून आवाज आला. "कोण ग मेला किटकिट करतोय् तो? भय्या असेल दूधवाला! नगरकरांकडे आलाय् ना? वाटलंच! वेळेवर मेल्यांना बिलं द्यायला नकोत न् त्या फाटक्या भय्याशीं तंडत बसायचं. पावशेर दूध तें काय न् शेजाऱ्यांना त्रास काय नि पाजाऱ्यांना त्रास काय..."

"अग आई, अण्णा आहेत ते." सुमननें मध्येंच आंत जाऊन सांगितलें.

अण्णी लगेच उठून सामोऱ्या गेल्या.

" अगबाई, आपण का असायचं ? "

" होय बरं बाई ! मींच ' असायचं. ' माझ्या घरांत मी असायचं नाहीं, तर कुणीं असायचं ? चिनी माकावनें होय ? "

तोंड तर चांगलें लागलें आहे अशा समाधानानें अण्णांनीं थोडा वेळ हुश् हुश् केलें आणि रुमालानें कपाळापासून तों हनुवटीपर्यंत चेहरा पुसून काढला.

अण्णी आणखी थोड्या पुढें आल्या आणि त्यांनीं नवऱ्याच्या तोंडाकडे निरखून पाहिलें.

" सुमे, अग थोडं गार पाणी आण. "

" कांहीं नकोय् गार पाणी. " अण्णा किंचित् खजील होऊन म्हणाले. त्यांना नवल वाटत होतें तें ह्याचें, कीं इतके आपण पोपटासारखे बडबडत सुटलों तरी अण्णी कशा ऐकून घेताहेत ? बिचाऱ्यांना अजून हें माहीत नव्हतें कीं आपली पत्नीही आज विशेष खुषींत आहे !

" पण झालंय् काय मेलं इतकं डोक्यांत राख घालायला ? "

" राख ? " अण्णा भीमदेवी आवेशांत ओरडले. " डोक्यांतच नाहीं, तर सबंध आंगाला राख फासून संन्यास घ्यावा असं वाटतं आहे. "

" इश्श ! " अण्णी एक मुरका मारून हसल्या. " मग सुमे, ह्यांचा कुणीं हात धरला आहे का ग ? "

शूर वीर अण्णा थंड पडले. त्यांना इतकी जरी कल्पना असती कीं आपल्याला

अशीं उत्तरें मिळणार आहेत, तर त्यांनीं फार बोलण्याचें धाडस केलें नसतें. अण्णी जर शब्दाला शब्द देऊन शिवीगाळ करत्या तर तुंबळ युद्ध माजलें असतें आणि त्याला अण्णांची आज तयारी होती. निदान तसें त्यांना वाटत होतें.

पण इथें पाहातात, तों अण्णींचा नूर कांहीं निराळाच !

शेवटीं बिचाऱ्यांनीं आपली मगरूरी मागें घेतली आणि रडवें तोंड करून ते म्हणाले, " तर मग घेतोंच झालं संन्यास. तुला मी नकोच आहे नाहींतरी. "

" इश्श ! भलभलतंच काय बोलायचं ? "

" सुमीला घालूं सेवासदनांत. तूं दुसरं लग्न कर..."

अण्णांनीं निराशेनें आरामखुर्चीवर आंग टाकलें होतें. त्यांचे वरील उद्गार ऐकून अण्णी ज्या आल्या, त्या तडक आरामखुर्चीच्या हातावर बसल्या आणि दोन्ही हातांनीं त्यांनीं अण्णांचें तोंड दाबून धरलें.

" कांहीं जिभेला हाड आहे का ? भलतं सलतं बोलूं देणार नाहीं मी. "

" हात दूर कर. " अण्णा किंचित् गोंधळून म्हणाले. " आणि कापड आणलेलं नाहीं मी...नि उद्यांही आणणार नाहीं ! "

" मी आणीन. झालं मग ? " असें म्हणून अण्णींनीं त्यांच्या खिशांतलें पाकीट काढून घेतलें. अण्णांना वाटलें, ह्या वेळीं सपाटून तंबी दिली पाहिजे. पण तेवढ्यांत अण्णी बोलूं लागल्या :

" पण तें राहूंदे मेलं बाजूला. ही बघितली का जंमत ? "

बोलत बोलत अण्णी कपाटाजवळ गेल्या होत्या. कपाट उघडून त्यांनीं एक सुबक

छोटी डबी बाहेर काढली आणि ती उघडून अण्णांच्या पुढ्यांत धरली. आंत कुड्यांचा एक जोड होता. त्याची प्रभा लखकन् अण्णांच्या निस्तेज तोंडावर फाकली.

" इमिटेशन बरं ? " अण्णी कौतुक करीत म्हणाल्या, " पण वाटेल तरी कुणाला ? अगदीं खरे मोती दिसतात. शेजारच्या नगरकरबाई म्हणत होत्या, तुमच्या कानांत हीं कुडीं भारी सुंदर दिसतील. इतकी का मी..." इतकें म्हणून अण्णींनीं विनयानें मान फिरवली. कित्येक वेळां शब्दांपेक्षां मौनांतच मौज असते.

" हें बघ..." अण्णा शांतपणें म्हणाले, " तूं कितीही मखलाशी केलीस, तरी मी कांहीं ऐकायचा नाहीं. परत कर तीं कुडीं. "

" हें काय तरी बोलायचं ? एकदा आपल्यासारख्याचा शब्द गेला तो परत घ्यायचा ? आणि व्यापारीही सचोटीचा आहे. तो नेहमीं येणारा गुजराथी. कुडी ठेवतों म्हणाला, ठेव म्हटलं. पण बजावून सांगितलं, कीं आज कांहीं माझ्यापाशीं पैसे नाहींत..."

" माझ्यापाशीं पण नाहींत ! "

"...तशी म्हणाला, कांहीं बांधा नाहीं, आठ दिवसांनीं द्या."

" आठ..."

" बरं, किंमत तरी अशी किती ? सारे चौपन्न रुपये. "

" चौ-प-न्न ! " अण्णांनीं प्रत्येक अक्षरागणिक डोळे उघडून ते मिटत म्हटलें.

" आणि तीन रुपये कमिशन. म्हणजे एक्कावन्न पडतील, अधिक सव्वा रुपया डबीचा. ... मग काय गडे....."

“मी साफ देणार नाहीं.” अण्णा असेल नसेल तेवढा आवेश दाखवून ओरडले.

अण्णांना वाटत होतें, कीं आपण मोठा विजय मिळवला. आतांपर्यंत तरी आपण बरेच जोराजोरानें ओरडलों. कूर्मानें दिलेला मंत्र प्रभावी होता ह्यांत शंका नाहीं. शेराला नेहमीं सव्वाशेरच हवा!

आणि अण्णींचा आजचा एकंदर अवतार पाहून तर त्यांची कल्पना झाली होती, कीं शत्रू पुरा जेरीला यायला आज उशीर लागणार नाहीं. आतां काढील आपलें शस्त्र बाहेर! पण कसलें? मुळुमुळू रडण्याचें. त्यांत तिला भूषण नाहीं मोठेंसें आणि आपलाही त्यांत विजयच आहे. मग तितकी पाळी आली तर उदारपणानें घेऊन टाकूं कुडीं देखील! पण मगरुरीची बात?......

स्वप्नतरंगांत वाहात जाऊन अण्णांनीं जे डोळे मिटले होते ते खाडदिशीं उघडले नि ताडदिशीं खुर्ची कोलमडली. नंतर आपोआपच त्यांचा हात टाळूकडे गेला आणि डोळ्यांनीं खुर्चीपाशीं पडलेल्या टेबल लॅंपचे तुकडे मोजण्यास सुरवात केली. पण हें काम सोपें नव्हतें. कारण मध्यंतरीं तारे चमकत होते.

कपाटावरील दिव्याचा अशा रीतीनें विध्वंस करून अण्णी आतां त्याच कपाटाला टेकल्या होत्या आणि त्यांचें वक्तृत्व अस्खलितपणें सुरू झालें होतें. अण्णांचे कान सशाच्या कानांसारखे उभे राहिले असून अण्णींचा एकेक शब्द तीरासारखा त्यांत घुसत होता.

“दिवा आपला मीं रागारागानें भिरकावला हो. आपल्या केसाला पण धक्का लावायचा नव्हता मला. पण...पण एवींतेवीं लागलाच, तर मी म्हणत्ये, “आणखी थोडं सडकायला पाहिजे होतं तें डोचकं. चांगलं नारळाएवढं टेंगूळ यायला हवं होतं. मेलीं चोपन रुपयांचीं कुडीं तीं काय; पण तेवढीं सुद्धा बायकोसाठीं घ्यायचं जिवावर येतं. मेल्या त्या पावणेदोनशें पगाराचं करणार तरी काय मग? कुणाच्या डोचक्यावर आपटणार ते? तुमच्या साहेबाच्या

कीं सदा न् कदा त्या इराण्याकडे जातां त्याच्या ? कीं तीन त्रिकाळ चहा चापायला तो कोण अंडुगुंडु खुर्रम् येतो त्याच्या ? सांगा ना, काय करणार पैशाचं ? ” बोलतां बोलतां अण्णीणबाईच्या भावना इतक्या कडेलोटाला पोंचल्या कीं त्यांच्या दोन्ही डोळ्यांतून धडाधड अश्रु पडूं लागले ! अण्णी रडूं लागल्या.

आणखी एक मिनिटानें जर अण्णा दार उघडते, तर उंबरठ्याजवळ त्यांना चौकस आबालवृद्धांची फलटण दिसती !

पण मिनिटभरानें अण्णा उठले ते दार उघडण्यासाटीं नव्हे. तर कपाटाजवळ जाण्यासाठीं. चावी लावून त्यांनीं खण उघडला आणि एक लहानशी आडवी चोपडी बाहेर काढली.

अण्णांचें चेकबुक होतें तें.

कोणाचेंही देणें लांबणीवर टाकणें अण्णांना बिलकुल पसंत नसे.

‘ अजून दुखतं आहे का डोकं ? ” अण्णी उशाशीं बसून विचारीत होत्या. त्यांच्या हातांत अमृतांजनची बाटली असून त्यांतलें बरेंचसें औषध त्यांनीं अण्णांच्या कपाळावर चोपडलें होतें.

अण्णा कांहींच बोलले नाहींत. त्यांचा सपाटून विचार चालला होता. कूर्मानें सांगितल्याप्रमाणें पुन्हा एकवार जोरानें पाय आपटत बसणें आवश्यक आहे, असें त्यांना वाटत होतें. पण संध्याकाळच्या प्रकारानंतर त्यांचा बराचसा उत्साह, उन्हांत जसें बर्फ वितळावें, तसा वितळून गेला होता. कितीही थंड प्रदेश असला तरी बर्फ टिकून राहील कोठवर ? सूर्यानें आपलें तेज दाखवलें नाहीं तोंवर !

जबरदस्त धाडस करून अण्णा म्हणाले, “ हें बघ, इकडे ये जरा. ”

अण्णी बऱ्याच चकित होऊन जवळ आल्या.

“ बैस इथें...जवळ.”

अण्णी बसल्या.

“ हें बघ...तुला एक आज विचारायचं आहे. तें जर तुला ऐकायचं असेल तर आपलं सुरळीत चालू शकेल. ”

आतां मात्र अण्णींना खरोखरीच रडूं फुटणार असें वाटूं लगलें. “ काय भलभलतं...कातर वेळेला... ”

“ हं : ! ” अण्णांनीं रंगभूमीला साजेसा निःश्वास सोडला. “ तें राहूंदे सगळं. आपला संसारच जिथें भलभलता आहे न् सारीच वेळ जिथें कातर आहे...”

“ ऊं हूं...ऊं...हूं...”

“ तर सांगायचा मुद्दा काय...” अण्णा एक आवंढा गिळून म्हणाले, “ कीं तुझ्याकडून आज मला वचन पाहिजे. अगदीं हातावर हात ठेवून. बोल, असं कबूल करतेस का कीं तुमचा कधींही अपमान करणार नाहीं...”

“ अपमान ?–ऊं–उंहूं–मी कधीं बाई...”

“...उलट उत्तरं देणार नाहीं. डोक्यावर किंवा इतरत्र कुठही टेबललॅम्प, फ्लॉवरपॉट, खुजा, तांब्या, पुस्तक, शाईची बाटली किंवा इतर कोणतीही वस्तु फेकून मारणार नाहीं. जोंपर्यंत तुम्ही चार लोकांसारखे वागतां आहां तोंपर्यंत तुमच्या उलट, हट्टानें म्हणा किंवा स्वार्थानें म्हणा, जाणार नाहीं. थोडक्यांत म्हणजे असं लिहून दे कीं ह्या घरांत माझा जसा अधिकार आहे तसा तुमचाही आहे. ”

अण्णींचें रडणें एव्हांना थांबलें होतें. त्या डोळे पुशीत म्हणाल्या, " काय जगावेगळं बोलायचं तरी कोण जाणे! उगाच उठायचं नि डोक्यांत राख घालायची! म्हणे, वचन दे न् कबुली दे. जसं कांहीं कोडतच बसलं आहे! असली भाषा आपल्यालाच शोभते हो! मीं कधींतरी म्हटलं आहे कीं घरांत आपला अधिकार नाहीं म्हणून ? साराच अधिकार आपला आहे हो!—अगदीं आपलाच. माझी काडीइतकी सत्ता नाहीं! मी काय मेली! एकदाचं मरण दिलं देवानें म्हणजे सुटेन या त्रासातनं!—देवा नारायणा, कशाला रे मला जिवंत ठेवली आहेस ? "

पुन्हा एकवार अण्णींचें संगीत चढ्या सुरांत चालू झालें. अण्णांची अवस्था अगदींच चमत्कारिक झाली. त्यांनीं कपाळाला आंठ्या घातल्या, हात झाडले. " चू चू! हें बघ..."

दुसऱ्या दिवशीं अण्णा ऑफिसांत टेबलाशीं बसले ते टोपी घालूनच, शिवाय ते एकसारखे रुमाल काढून सूं-सूं करीतच होते. त्यांच्या मद्रासी मित्रानें हें पाहिलें. त्याला अगदींच राहावेना. थोड्या वेळानें कांहीं तरी निमित्तानें तो अण्णांपाशीं आला आणि दुसरी खुर्ची ओढून हलकेच तीवर बसला.

" मॉर्निंग अण्णा! डोकं दुखतंयू वाटतं ? "

अण्णा कांहींच बोलले नाहींत.

" थंडीही झालेली दिसते आहे. "

अण्णा तरीही गप्पच.

" युकॅलिप्टसचा वास मारतो आहे. "

" तुझ्या एक तोंडांत मारावीशी वाटते आहे. " अण्णा एकाएकीं बऱ्याच मोठ्यानें बोलले.

कूर्म कांहीं न बोलतां अण्णांच्या टोपीकडे कुतूहलानें पहात होता.

" कांहीं पहायला नको एवढं. " अण्णा कडू तोंड करून म्हणाले. " टेंगूळ आहे त्यांत. " आणि लगेच त्यांनीं कालची सर्व हकीकत सांगितली.

" जीते रहो पठ्ठे ! " कूर्म हसून म्हणाला. " टेंगळाचं राहूं दे रे बाजूला. पण एकंदरींत शेवटीं तूं आश्वासन मिळवलंस बायकोकडून ! अधिकारग्रहण केलंस म्हणायचं ! "

" होय. " अण्णा ओठ चावून उत्तरले. " उरल्यासुरल्या अधिकारांनाही ग्रहण लागलं खरं म्हणशील तर. तसे तोंडी अधिकार मिळवले आम्हीं; पण त्याबरोबर अक्कलही मिळवली. "

" ती काय ? "

" कीं ते अधिकार कधींही वापरायचे नाहींत. "

" छान. " कूर्म मान डोलावून म्हणाले, " बरोबरच आहे. बाकी बायकोजवळून आश्वासन मागायचं म्हणजे ती गव्हर्नर असल्याची कबुलीच देणं आहे. " असें म्हणून तो मोठ्यानें हसला.

" आतां थंडी कां झाली ऐक ! " अण्णा निश्चयी स्वरानें पुढें म्हणाले, " काल तो प्रकार झाला, आश्वासन मिळालं, तह झाला, रडारडही झाली ! आज...

" आज अधिकार चालवावा म्हणून बटाट्याची भाजी करायला सांगितली. तिचा स्पष्ट नकार मिळतांच कोट चढवला, खाणावळीकडे निघालों आणि

विसराळूपणा आड आला. छत्री घरींच विसरलों. पाऊस मुसळधार पडायला लागला. ”

कूर्मानें एक डोळा बारीक करून पेपरवेटमधून पलीकडे पाहिलें.

“...परत घरीं गेलों. दार उघडा, छत्री राहिली आहे, म्हणालों. पांच मिनिटांनीं उत्तर मिळालं. कोण ठक् ठक् करतंय् तें? जेवणं चाललीं आहेत. थांबा अर्धा तास. चिडलों मी नि तस्साच उठून खाणावळींत गेलों. जेवून परत आलों... चिंब भिजून...आणखीन् दाखव थोडे दांत!”

कूर्मानें आपलें हसूं आंवरलें आणि चेहरा गंभीर केला. कांहीं वेळ दोघेही स्तब्ध बसले होते. नंतर कांहीं तरी बोलायचें म्हणून अण्णा म्हणाले, “ मला हें समजत नाहीं, कीं तुला ह्याच उपायानें यश कसं आलं? विशेष म्हणजे बायकोनें नको म्हणून सांगितलं असतांना थोडीथोडकी नाहीं, पंचवीस मंडळी कॉफीला बोलावणं! इतकी ओळख तरी कुठली तुझी? ”

“ मुलीच होत्या बहुतेक. ” कूर्मबसवशंकराचार्य ऐटींत म्हणाला.

“ मुली! ” अण्णा इतके चमकले, कीं त्यामुळें त्यांची टोपी पडण्याचा प्रसंग आला होता, पण त्यांनीं हातानें ती सांवरली. “ मुली म्हणतोस? आणि तुझ्या बायकोला चाललं तें? ”

“ होय. तिनें तशी कांहींच हरकत घेतली नाहीं. ” कूर्मानें शांतपणें सांगितलें. “ कारण एक तर मुलींचीं वयं दोनपासून दहापर्यंत होतीं. दुसरं असं, कीं तिच्या माहेरचीच होती सगळी मंडळी. ”

# आठवणीचा लिलांव

प्रोफेसर विसरे उठल्यापासून गडबडगुंड्यांतच होते. त्यांनीं आधीं डोळे उघडले तेच मुळीं एडी कॅण्टरसारखे सताड. आणि नंतर अर्धा मिनिट तरी पापणी सुद्धा न हलवतां ते छताकडे टवकारून पहात होते. मग त्यांनीं आपलें शिल्लक शरीर बिछान्यावर होतें तसें ठेवून फक्त डोक्याचा भाग इकडून तिकडे फिरवला, खाडदिशीं पांघरूण झुगारलें आणि हाताच्या तळव्यांवर नि पायाच्या ढोपरांवर टेकून ते आपलें उसें उपसून पाहूं लागले. शेवटीं एक उसासा टाकून ते ताडकन् उभे राहिले. आपण अनुक्रमें मासा, स्टीम रोलर किंवा चतुष्पाद नाहीं ह्याची त्यांना आठवण झाली असावी.

पण तसें नाहीं. प्रोफेसरसाहेबांनीं वरील आचरट दिसणाऱ्या ज्या कृति केल्या त्यांना सबळ कारण होतें असें लवकरच सिद्ध झालें. कारण नेहमींप्रमाणें शौचाला जाण्यासाठीं टमरेल भरून चुकून त्याच पाण्यानें दंतधावन सुरू करण्यापूर्वी विसऱ्यांनीं सैंपाकघराकडे प्रयाण केलें आणि स्टो पेटवीत असलेल्या पत्नीला म्हटलें, "अग...अग...अग......"

वास्तविक प्रोफेसर विसरे नवमतवादीच. एवढें खरें, कीं त्यांचीं नक्की मतें काय तें त्यांच्याच कधीं लक्षांत नसे. सुधारणेचा झेंडा त्यांनीं आजतागाइत न विसरतां उचलून धरला होता. पण फिदफिद्या जनतेलाच त्यांचा विसर पडत असे. गणेशोत्सव करा तुम्ही, पण गणपति मिरवायला कशाला हवा, असा सरळ सवाल प्रोफेसरांनीं ऐन दिवाळींत केला. तेव्हां श्रोत्यांनीं ओल्या करंज्या फेकीत त्यांची कांदेवाडीपासून प्रार्थनासमाजापर्यंत मिरवणूक काढली होती. तसेंच अंडीं आणि ब्रॅण्डी (मद्यपानबंद्यांनो, ध्यानांत घ्या.) ह्यांतले व्हिटॅमिन पोटांत गेल्यावरच 'डॉक्टर्स डायलेमा' सारखें नाटक बर्नार्ड मॅकफॅडन लिहूं शकला असें विसऱ्यांनीं भर सभेंत सांगितलें तेव्हांही लोकांनीं त्यांची रेवडी...नव्हे, चक्क बैदा...उडवला. ह्यावरून प्रोफेसर विसरे

स्वतः आचार, विचार नि ( विस्मरणानें ) उच्चार ह्या तिन्हींत आमूलाग्र बदल घडवून आणण्यास कसे अनुकूल होते हें समजून येईल. प्रोफेसरांची अध्यापन-शाखा जी संस्कृत तिलाही त्यांनीं अनेकवार नवी पालवी फोडली होती. उदाहरणार्थ, भवभूति बुद्धोत्तर कालांत झाला असावा असें आपलें मत जाहीर करून त्याला आधार म्हणून अलकेला जातांना मार्गांत लागलेलीं बुद्धाचीं तीर्थें मेघदूतांत बुद्ध्याच गाळलीं आहेत असें जेव्हां त्यांनीं म्हटलें, तेव्हांही त्यांचें क्षुल्लक कारणावरून हसें झालें. एकंदरींत ' नवें तें हवें ' इतकेंच नाहीं, तर ' नव्हे तेंही हवें ' असा जरी प्रोफेसरमजकुरांचा बाणा होता तरी कांहीं बाबतींत मात्र त्यांना ' जुनें तें सोनें ' वाटत असे. एक तर त्यांच्या आवडी निवडी अगदीं साध्या होत्या. त्यामुळें प्रोफेसरांचें टेबल खुर्ची आणि त्यांचा कोट तसेंच बिछाना ह्या वस्तु कित्येक वर्षांच्या पुराण्या असत. टाक पेन्सिलीबद्दल तसें म्हणतां येणार नाहीं. कारण रस्ता, ट्रॅम, कॉलेज इत्यादि संस्थांना त्यांनीं अनेकवार ह्या जिनसा निरिच्छपणें ( इच्छा नसतांना ) बहाल केल्या होत्या. तसेंच स्वतःच्या अध्ययनाचीं जुनीं संस्कृत पुस्तकें विकत घेण्याचाही प्रोफेसर विसऱ्यांना जबरा नाद होता. प्रोफेसर साहेब संस्कृत पठण इतकें अव्याहत कसें चालू ठेवतात, मध्येंच चुकून आलजिब्रा कसा वाचीत नाहींत ह्याचें त्यांच्या स्नेह्यांना नवल वाटे. पण ' संस्कृत' ला विसऱ्यांनीं आपलें तन-मन-धन वाहिलेलें असल्यामुळें ती एकच बाबत अशी होती कीं जींत त्यांचा धांदरट स्वैरसंचारी मेंदू ' विषय 'बद्ध बनला जाई.

मीं तरी विसऱ्यांच्या सुधारणा-प्रेमाचें एवढें लांबण कशासाठीं लावलें तें मुळांत विसरलोंच कीं ! प्रोफेसर महाशय नवमतवादी होते हें मला मुद्दाम सांगावयाचें होतें. आणि तें एवढ्यासाठीं, कीं वाचकांनीं शंका काढूं नये, त्यांनीं बायकोला नुसतेंच ' अग–अग ' कां म्हटलें म्हणून ! प्रोफेसर विसऱ्यांनीं बायकोला नांवानें हाक मारली नाहीं, ह्याचें क्षुल्लक कारण इतकेंच कीं तिचें नांव प्रोफेसरांच्या आठवणींतून तात्पुरतें निसटलें होतें.

" अग–अग–मीं काय बरं म्हणत होतों..." असें म्हणून त्यांनीं डोक्याकडे हात नेला आणि मग उजेड पडल्यासारखें करून म्हटलें, " हं, आलं लक्षांत.

अग आज माझं डोकं उशीवर होतं. ”

“ नेहमीं कुठें असतं ? ” भामाकाकूंनीं आधण ठेवीत विचारलें.

“ नाहीं, म्हणजे तसं नव्हे ग. रोज माझ्या उशाला जो गठ्ठा असायचा तो नव्हता आज. त्याच्या ऐवजीं ही लठ्ठ मऊ उशी ठेवली होती कुणी तरी. तूंच असशील ! सकाळीं झोपून उठल्यावर लक्षांत आलं. ”

“ तेंच बरं झालं. आधीं आलं असतं लक्षांत तर मेली झोप पण आली नसती ! काय बाई भलता सलता हट्ट! चांगलं माणसासारखं झोपायचं सोडून जंगली जनावरासारखं लाकूड उशाला घेऊन निजायचं ! ”

भामाकाकू मोठें धाडस करून हें बोलत होत्या असें दिसलें. त्यांना जें सांगायचें होतें तें मुख्य पुढेंच होतें. चहाच्या पातेलींत साखर मोजून टाकीत शेवटीं त्यांनीं तें सांगून टाकलेंच.

“ रद्दी विकली काल. ” त्या म्हणाल्या, “ त्यांत तो मळकट गठ्ठाही विकून टाकला. बंबांत जाळायला ‘ नको ’ म्हणत होतांत, मग करायचं काय म्हटलें ! ”

प्रोफेसर विसऱ्यांची करुणास्पद स्थिति झाली. त्यांच्या हातापायांना कंप सुटला, तोंड घामाघूम झालें. “ काय केलंस हें ? ” असें म्हणत प्रोफेसर मटकन् खालीं बसले.

भामाकाकूंनीं अगोदरच त्यांच्या खालीं पाट सरकवला होता.

ज्या गठ्ठयावरून भामाकाकू पतिराजांना नेहमीं बोलत असत, तो ‘ आपल्या वैकुंठवासी मामांची आठवण ’ म्हणून आपण जवळ बाळगीत असतों असें विसरे सांगत असत आणि त्यामुळें त्या वेळीं काकूंचें तोंड बंद होई. तरी पण पुन्हा कांहीं दिवसांनीं त्यांची कुरकुर सुरू होईच.

"काय मेली 'आठवण' पुजून ठेवलीय् तरी ! ऐकावें तें एकेक नवलच ! कुणी घड्याळ ठेवतो, कुणी आंगठी ठेवतो, कुणी एखादी डायरी सुद्धा ठेवतो. इथें पहावं तर जुनीं कोळशिटांतली गठडी आणली नि रोज डोचक्याखालीं दडपून ठेवली. आंतले ढेकूण तरी मोजले होते कधीं ? साफ तरी करा म्हटलं, तर म्हणे...छे छे ! हात नाहीं लावायचा त्याला ! इतकं जर पावित्र्य आहे त्यांत तर देवघरांत ठेवून पूजा तरी करा."

"भलतंच काय सुचवतेस ? पूजेची मला रोज आठवण राहील होय ?"

"बरं, इतकं मालाचं डबोलं आहे तरी काय म्हणावं, तर कधीं उघडूनही पाहात नाहीं 'फेट वर' 'फेट वर' काय म्हणतां त्यांत मामांनीं काय दिवे लावलेत तें तरी कळेल."

"हें बघ," प्रोफेसर विसरे शाईचे ठिपके आजूबाजूला उडवीत म्हणत, "मी तें उघडून कधीं बघायचा नाहीं. तूंही कधीं बघूं नकोस. अग, इथें कुणाला त्या फ्रेटवर्कचं मोठंसं कौतुक आहे ? उघडलं तर उगाच ते फळकुटाचे तुकडे घरभर व्हायचे नि आधींच माझे गार्टर सापडतांना रोज पंचाईत पडते त्यांत आणखी भर पडायची. तुला सांगितलं ना, मामांना होता आमच्या फ्रेटवर्कचा नाद ! ते वारल्यापासून ठेवलंयू तेवढं बोचकं त्यांच्या नांवानें. ह्या पलीकडे जास्त मला त्यांत गम्य नाहीं."

फ्रेटवर्कचें काम कसें असतें हें पाहाण्याची भामाकाकूंना थोडीशी जिज्ञासा होती, पण पतिराजांच्या अशा बोलण्यानें नाराज होऊन त्या गट्ठयाला हात लावीत नसत. शिवाय हात लावण्याइतकें तें बोचकें स्वच्छही नव्हतें ! सरबत्ती मात्र चालू ठेवीत..."माझं लगीन झाल्यापास्नं बघत्यें आहें."

"बघायचीसच. कारण लग्न व्हायच्या आधींच मामा वारले मुळीं !" विसरे उत्तर देत. आणि मग गोंधळांत पडून म्हणत, "पण असं कसं म्हणतोंयू मी ? लग्न झाल्यावर गेले मामा. मामी तर, मला वाटतं आहेतही अजून कोल्हापूरला...

कीं सोलापूरला...हं ! बरोबर ! माझं लग्न वारल्यावर मामा झाले !"

ह्यावर तोंडाला पदर लावून भामाकाकू चालत्या व्हायच्या.

पण पुढें पुढें अतिरेक झाला. विसरे हलुहळू चिडून धमकीच देऊं लागले. "खबरदार त्या गठ्ठयाबद्दल बोलशील तर ! तुला काय करायचंय् ? तुझ्या सासऱ्याचं थोडंच आहे तें ? अस्सं उशाखालीं ठेवणार ! बोल काय बोलायचंयू तें" इत्यादि उत्तरें मिळूं लागलीं. तेव्हां मात्र भामाकाकू संतापल्या. 'रोग सुद्धा जडायचा एखादा' अशी पुटपुट करीत एक दिवस त्यांनीं तो गठ्ठा जसाच्या तसा न उघडतां जरीपुराणेवाल्याला देऊन टाकला. त्याचा परिणाम काय झाला तें वाचकांना समजलेंच आहे. भामाकाकूंना आपण गठ्ठा हलवतांना एक दुष्कृत्य करतों आहों असें वाटल्याशिवाय राहिलें नाहीं. आणि संतापाच्या भरांत हें काम केल्यावर सकाळीं त्यांना टोचणीही लागून राहिली. प्रोफेसरांजवळ खुलासा करतांना त्यांना मन घट्ट करावें लागलें तें एवढ्याचमुळें.

पण प्रोफेसर विसरे म्हणण्यासारखे रागावले नाहींत. कदाचित् रागावण्याचें विसरले असतील. ते सपाटून निराश मात्र झाले. आणि त्यामुळें तर भामाकाकूंना जास्तीच वाईट वाटलें. त्या दिवशीं प्रोफेसरांना 'हवें नको' तें त्या मुद्दाम हळुवारपणानें विचारूं लागल्या. केल्या कृत्याबद्दल भरपाई म्हणून हा प्रकार चालला होता हें उघड आहे.

पण प्रोफेसर विसऱ्यांचें मन त्या दिवशीं मुळींच ताळ्यावर राहिलें नाहीं. त्यांनीं प्रत्येक गोष्ट न विसरतां केली. दाढी करतांना बुटाचा ब्रश वापरला नाहीं आणि दाढी केली. तीही उजव्या डाव्या दोन्ही बाजूंची. जेवतांना 'किती पोळ्या खाल्ल्या ?' असें काकूंना विचारलें नाहीं तरी खाल्लेला आंकडा बरोबर नेहमीं इतकाच होता. जेवल्यावर त्यांनीं कपडे घातले, पगडी चढवली, बूट इष्टाकण्या लावल्या आणि भामाकाकूंना आज गार्टर सुद्धा शोधावे लागले नाहींत. अखेर चक्क खिशांतील घड्याळ काढून टाइम बघत विसऱ्यांनीं 'जातों ग' सांगितलें, तेव्हां काकूंना गहिंवरून आलें. धावत धावत जाऊन त्यांनीं

खणांतली डायरी आणली आणि त्या वाचून दाखवूं लागल्या.

"कांहीं जरूर नाहीं." प्रोफेसर विसरे कोटाचें शेवटचें बटन लावीत म्हणाले. "लक्षांत आहे माझ्या. कॉलेज संपल्यावर रॉयल एशियाटिक सोसायटींत वाचन. चार वाजतां टाऊन हॉलांत प्रदर्शन...वाटल्यास जाणें. पांच वाजतां ग्रँटरोडला किताब कुटिरांत दुर्मिळ पुस्तकांचा लिलांव...अवश्य."

इतकें बोलून प्रोफेसर एकही पायरी न चुकवतां व्हरांडा उतरून निघून गेले.

भामाकाकू भला मोठा आ करून पाहातच राहिल्या. नंतर त्यांनीं आपले डोळे पुसले.

टरल्याप्रमाणें प्रत्येक कार्यक्रम व्यवस्थित पार पाडून आणि किताब-कुटिराच्या लिलावांत स्वतःच्या मतें जंगी लूट पदरांत पाडून प्रोफेसर विसरे संध्याकाळीं दिलखुश मुद्रेनें घरीं आले. नेहमींप्रमाणें गाढवपणाच्या दोन तीन चुका आजही त्यांनीं केल्या, नाहींत असें नाहीं. उदाहरणार्थ, रॉयल एशियाटिकच्या लायब्ररींत ते गेले खरे; पण त्यांच्यानें वाचन कांहींच झालें नाहीं. प्रथम सोसायटीच्या प्रवेशद्वारांतील भव्य पुतळ्यांचें आणि नंतर आंतील दालनांत टांगलेल्या टोलेजंगी तैलचित्रांचें निरीक्षण करण्यांत त्यांनीं वेळ घालवला. बापड्याची चूकभूल होऊन त्याला असें वाटत होतें, कीं आपण टाऊन हॉलांतील चित्र-प्रदर्शनच पाहात आहों. ह्याप्रमाणें चौदा चित्रें पाहून झाल्यावर आणि त्यांतल्या एकावरही लेबल नसल्याबद्दल चडफडल्यावर त्यांनीं खुर्चींत बसलेल्या एका गृहस्थाला "गव्हर्नर्स प्राइझ कुणाला मिळालं?" म्हणून अर्धवट प्रश्न विचारला. विचारतांना अर्ध्यावरच ते थांबले; कारण सदहू गृहस्थाच्या हातांतला 'नॅश'चा अंक त्यांना दिसला होता. टेबलावर दुसरींही कित्येक मासिकें पडलीं होतीं. चूक लक्षांत आल्यावर चित्रांना वैतागलेलें त्यांचें शरीर न विसरतां टाऊन हॉलांत गेलें तें केवळ शिष्टाचार म्हणून. तिथून लवकरच बाहेर पडून त्यांनीं ग्रँटरोडची वाट धरली. 'किताब कुटिरा'च्या लिलांवांत त्यांना

अनेक दुर्मिळ पुस्तकें आढळलीं असें त्या वेळीं वारंवार गरगर फिरलेल्या त्यांच्या डोळ्यांवरून आणि जिभेवरून म्हणायला हरकत नाहीं. पण याही ठिकाणीं दररोजचा भाजीचा सौदा डोळ्यांपुढें उभा राहून लिलाव बोलतांना प्रोफेसरांना अनेकदा रक्कम चढवण्याऐवजीं ती उतरवली. त्यामुळें हंशा तर पिकलाच, पण कांहीं अमोल पुस्तकांनाही विसरे मुकले. मात्र लिलांव संपल्यावर ते काखोटीला आपली खरेदी मारून जे घराकडे वळले ते इतक्या हर्षोत्फुल्ल मनस्थितींत, कीं त्या दिवशीं मुंबईंत धावणारे शेंकडा नव्वद टॅक्सी ड्रायव्हर विसराळू नसते तर त्यांतल्या एखाद्यानें तरी विसऱ्यांच्या ह्या ' उनाड ' वृत्तीचा दुष्ट फायदा घेतला असता. प्रोफेसरसाहेबांना झालेल्या आनंदाचें कारण त्यांना लिलांवांत झालेला जबरदस्त लाभ हें तर होतेच. पण त्याशिवाय त्यांच्या तोंडावर झळकणारी स्मिताची लकेर निर्भेळ आनंदाची होती असे म्हणतां येणार नाहीं. त्यांत किंचित् खोडसाळपणाचा भास होत होता. खरे सांगायचें तर प्रोफेसरसाहेबांना कसल्या-तरी गुदगुल्या होत होत्या. वाटेंत एका कापडाच्या दुकानांत शिरून त्यांनीं पेढेही मागितले. चूक समजून आल्यावर ' सॉरी ' म्हणून बाहेर येऊन पेढ्यांच्या रास्त दुकानांत त्यांनीं एक रत्तल पेढे घेतले आणि आतांपर्यंतची सानंद मुद्रा एकाएकीं भयभीत केली. झपाझप पावलें टाकीत ते परत कापडाच्या दुकानांत शिरले आणि विसरून राहिलेली आपली पुस्तकांची खरेदी पुन्हा काखोटीला मारून ते निश्वास टाकीत अडखळत घरीं जाऊन पोंचले.

प्रथम आपल्या खोलींत जाऊन त्यांनीं पुस्तक टेबलावर ठेवलें. आणि जवळ जवळ उड्याच मारीत ते सैंपाकघरांत गेले.

" हां...घे हं. " असें म्हणून त्यांनीं पेढ्यांची पुडी भामाकाकूंच्या पुढ्यांत टाकली.

" अगबाई, काय तरी तें ? " भामाकाकू चटकन् पुडी उचलून सोडीत म्हणाल्या, " पेढे !...कशाबद्दल तरी ते ? " पतीला दिलेलें दुःख अजून ती साध्वी विसरली नव्हती. अद्यापही तिच्या डोळ्यांतून पाणी येत होतें. पण पतिराजांचा तो प्रफुल्ल चेहरा पाहून बिचारीला हायसें झालें. कांदे चिरण्याचें

कामही बाजूला ठेवून मान कलती करून एक पेढा चावीत काकूंनीं म्हटलें, "मी ओळखूं कशाचे ते ?"

"ओळख बरं !" विसऱ्यांनीं हसत हसत म्हटलें.

"धनेश्वरांच्या चिमाताई बाळंत झाल्या असतील !.. होय ना ! काय झालं... मुलगा कीं मुलगी ?"

"अग छट् !" प्रोफेसरसाहेब हसतां हसतां मुरकुंडी वळून म्हणाले, "सात जन्म घ्यावे लागतील तुला ओळखायला ! म्हणे काऊताई बाळंत झाली..."

"काऊताई नव्हे, चिमाताई !"

"समजलं. चिमाताई ! पण ती तरी बाळंत कसची होते ग ? कांहींतरीच बोलायचं !"

"म्हणजे ?" भामाकाकू घाबरून ओरडल्या. "पत्र तरी काय आलं ? चिमाताईचं भलतं सलतं नाहीं ना झालं ?"

"भलतं सलतं काय व्हायचंय् ! मींच तुला विस्मरणानें भलतं सलतं सांगितलं अन् तें तूं खरं मानलंस. चिमाताईना झाला आहे साता महिन्यांचा जलोदर. मीं तुला चुकून गरोदर सांगितलं."

ह्यावर कांहीं न बोलतां भामाकाकू सपशेल खालीं हापटल्या. बरें, तर बरें,... विळी बाजूला होती.

"मग कशाचे हे गोळे ?" पेढ्यांकडे कडवटपणानें पहात त्यांनीं प्रश्न केला.

प्रोफेसरसाहेब ह्या सरळ प्रश्नानें चीतच झाले. त्यांनीं अगदीं बावरल्यासारखी

मुद्रा केली. कारण ह्या मध्यंतरींच्या ‘ चिमा-प्रकरणांत ’ त त्यांना आपण वास्तविक पेढे कां आणले ह्याचा आतां विसरच पडला होता. ह्यावेळीं काकूंनीं त्यांना मदत केली.

“ भोपटकरांच्या लिलीचा साखरपुडा तर नाहीं ... चवीला पाठवला असेल आपल्याकडे. बरं, एशियाटिकमधल्या शिपायानें तर नाहीं दिले ? कालिजांत कुणाला पासबीस तर नाहीं केलं ? कायसं पुस्तक घेतलं होतं लिहायला—”

“ स्मरामि हंत स्मरामि ! ” प्रोफेसर विसरे ताडदिशीं उडी मारून उद्‍गारले. “ भामे, भामे, तूं आहेस म्हणून माझा संसार चालला आहे ! तूं नुसतीच माझी धर्मपत्नी नाहींस ; तर मूर्तिमंत स्मृतिरूपानें तूं माझी दुसरी पत्नी आहेस. ”

“ अगबाई ! ” भामाकाकू गालावर बोट ठेवून हसत हसत म्हणाल्या, “ पहिली होती कीं काय कुणी ? हो, विसरायला होणं साहजिक आहे. ”

“ जाऊंदे. आतां दुसरं तिसरं काढूं नकोस. नाहीं तर पुन्हा मूळ मुद्दा विसरायचा. तर गंमत काय झाली...‘ कुटिरां ’त पुस्तकांच्या लिलावाला गेलों. आणि काय सांगूं तुला, ज्या पुस्तकासाठीं गेले कित्येक महिने मी त्रिखंड धुंडतों आहें, तें अचानक त्या कचऱ्यांत सापडलं बघ. ”

“ कोणतं तें ? ”

“ आश्वलायन सूत्राची प्रथमावृत्ति ! ” विसऱ्यांनीं विजयी मुद्रा करून सांगितलें. “ सुदैवानें लिलांव ठाकठीक बोलून तें पुस्तक मीं पदरांत पाडून घेतलं. भारी आनंद झाला. पण खरी मौज तर पुढेंच होती. ”

भामाकाकू कंटाळून म्हणाल्या, “ आणखी कसलं तरी सूत्र सापडलं असेल. ”

“ नुसतं सूत्र नाहीं. ” प्रोफेसरसाहेब ओरडले. “ सूत्रानें विणलेलं कापड. ”

आणि असें म्हणून खिशांतून एक मळकट कापडाचा बोळा काढून त्यांनीं पत्नीपुढें टाकला. " पाहिलंस ? हें फडकं होतं त्या दुकानांत. त्या फडक्यावरल्या वेड्यावांकड्या शाईच्या ओळी पाहिल्या नि एकदम मला वाटलं कुठें तरी हें चिरगूट पाहिलेलं आहे ! "

" मोठंच झालं, !..." कमालीचें आश्चर्य दाखवून भामाकाकू म्हणाल्या. " आपल्याच उशाखालीं असायचं जें बोचकं त्याचा हा मळकट कपडा. "

" होय, तुला हें पटदिशीं आठवतंय्. मला थोडा वेळ लागला. पण मग मीही ओळखूं शकलों आणि जो म्हणतां मला आनंद झालाय् ! "

" पण...पण...हें फडकं त्या किताबकुटिरांत कसं गेलं ? " भामाकाकू विचार करीत म्हणाल्या.

" अग, त्यांत काय नवल करण्यासारखं ? हे छोटे जु. पु. लोक जुना माल घेतात, मोठ्या जु. पू. च्या दुकानांत विकून टाकतात. तशीच गंमत इथें झाली. तूं विकलेलं बोचकं ह्या किताबकुटिरांत आलं. कर्म-धर्मसंयोगानें माझ्या तें फडकं नुसतंच दृष्टीला पडलं. ओळख पटल्यावर दुकानदाराला विचारलं. कसलं रे बाबा फडकं ? मला देतोस का ? त्याला ह्या पोरकट प्रश्नाचं नवल वाटलं. पण त्यानें खुषीनें दिलन् आणि वर सांगितलन्, 'आतांच साहेब, आपण जी संस्कृत चोपडी घेतलीत ना, तिच्या भोंवतीं होतं हें बासन. एकदम पेशव्यांच्या शनवारवाड्यांतनं धुंडून आणला किताब. तुम्हांला सात रुपयांला लई सस्ता पडला. ' "

इतकें लांबलचक भाषण करून प्रोफेसर विसरे उंबरठ्यावर बसले आणि घाम पुशीत म्हणाले, " म्हणून पेढे आणले, समजलीस ? "

" समजलें. " भामाकाकू सद्‌गदित होऊन उत्तरल्या. त्या जुन्या गठ्यावरील आणि त्याच्या मळकट बासनावरील पतिराजांचें अलोट प्रेम पाहून त्यांना

अगदीं चमत्कारिक वाटत होतें. एकीकडे बोचकें परत मिळाल्याचा सात्त्विक आनंदही त्यांना झाला होता ; तर दुसरीकडे विसऱ्यांच्या ह्या नरम कोपऱ्याच्या प्रदर्शनानें त्यांना स्वतःचें दुष्कृत्य अधिकच अघोरी वाटत होतें. आणखी एक जें जबरदस्त कोडें पडलें होतें त्याची शहानिशा करणें तर अत्यावश्यक होतें. तेव्हां त्यांनीं लगेच विचारलेंच.

" पण...पण...म्हणजे इतके दिवस त्या गांठोड्यांत पुस्तकच का होतं ?"

" पुस्तकच. " प्रोफेसर विसरे शांतपणें म्हणाले, " आणि मला हवं असलेलं पुस्तक ! ज्याच्यासाठीं मी जिवाचं रान केलं तें पुस्तक...आश्वलायन ! वर्षानुवर्षं उशाखालीं होतं. कधीं उघडलं नाहीं, कांहीं नाहीं. "

" आज भारीसं अस्खलीत बोलायला होतंय् ? " भामाकाकू हसून म्हणाल्या.

" अग, एखादी विस्मृतीच्या काळोखांत लुप्त झालेली जुनी गोष्ट एकाएकीं उजेडांत आली म्हणजे दिपायला होतंच असं. "

" अशी कोणती तरी ती गोष्ट ? "

प्रोफेसर विसरे घाबरे-घुबरे होऊन म्हणाले, " विसरलों बघ ! "

भामाकाकू गंभीरपणें म्हणाल्या, " शेंकडों वर्षांपूर्वींची गोष्ट आहे. आपण एका लिलांवांत एक पुस्तक घेतलंत. तें मूळचं आपलंच बोचकं होतं नि मींच टवळीनें तें रद्दींत दिलं होतं, त्याबद्दल तर नव्हतं बोलणं चाललेलं ? "

" सुष्ठु शोभसे स्मरणेन ! " प्रोफेसर पुन्हा ओरडले.

" मला विचारायचं एवढंच होतं कीं, ' मामांचं बोचकं...मामांचं बोचकं ' म्हणून जो आपण जप चालवला होता..."

" अग, बोचकं मामांचंच, अर्थात् आंतलं पुस्तकही मामांचंच. "

" मग, काय म्हणे आंत फेटवर-फेटवर..."

" अग, तिथेंच तर खरी पठाडी गोम आहे!" प्रोफेसर विसरे बेसुमार हसत उत्तरले, " आमचे मामा होते संस्कृताचे बडे व्यासंगी. फ्रेटवर्कचा पोरखेळ ते कसचे करायला!"

एवढेंच बोलून एकाएकीं प्रोफेसर विसऱ्यांनीं आपलें डोकें दोन्ही हातांनीं दाबून धरलें. आज त्यांनीं कधीं नव्हे इतकें अस्खलित भाषण केलें होतें. त्यांच्या मेंदूला आणि विनोदवृत्तीला एकदम भयंकर ताण बसला होता. त्याचा परिणाम त्यांना एकाएकीं भोंवूं लागला. बावरलेल्या मनःस्थितींत ते बराच वेळ उंबरठ्यावर उभे राहिले. भामाकाकूही घाबरल्या. नंतर दीड एक मिनिटानें अकस्मात् विसऱ्यांच्या विचाराक्रांत मुद्रेवर फरक पडला. अंगावर वीज पडावी तसें त्यांना झालें. झटक्यासरशीं सैंपाकघरांत कोसळून प्रोफेसरमजकूर पडल्या पडल्या म्हणाले, " जबराच घोटाळा झाला होता...म्हणजे, वारले ते मामाच माझे. शंकाच नाहीं त्यांत. अगदीं आईकडून मामा. म्हणजे नुसते अंकल नव्हत, मॅटर्नेल अंकल! पण..."

ह्या ठिकाणीं अर्धवट खिन्न अर्धवट हसरी मुद्रा करून बायकोकडे बोट करून ते पुढें म्हणाले, " ध्यानांत ठेव. डायरींत टीप...फ्रेटवर्क करतात ते काका माझे. वऱ्हाडांत अद्याप जिवंत आहेत. "

# भूत, भविष्य आणि वर्तमान

" आवाज करूं नकोस. "

मध्यरात्रीची वेळ होती. डोळ्यांत बोटें घातलीं तरी दिसत नव्हतें, आणि कानांत बोटें घातलीं तरी रातकिड्यांची किरकिर बंद होत नव्हती. चारही दिशांना गडद अंधार. पाऊस झिमझिम पडत होता आणि त्याचे थेंब मध्येंच एका प्रकाशाच्या चिमुकल्या झोतांत काजव्यासारखे चमकत होते.

वाचक! चला, हा प्रकाशाचा झोत कुठून येतो आहे तो पाहूं या. मात्र जपून चाला हं. नाहींतर पडाल अडखळून कशाला तरी, आणि मग?...अंधारांत कांट्याकुट्यांत पडून रात्र काढावी लागेल. शिवाय...

शिवाय रात्रींचीं भुतेंही हिंडतात बरींच म्हणे ह्या भागांतून! रात्रीं येऊन तुमचा आमचा फन्ना करायचीं. मग उद्यां 'आरोळीं'त हेडलाईन...आणि तुमच्या आमच्या हाडकांचे फोटो!

छे! शहारे येतात, नाहीं, आंगावर?...पण थांबा, हे आलों आपण प्रकाशाच्या मुळापाशीं. अरेच्या, हा तर विजेच्या चमकीचा उजेड दिसतोय्. कुणी बरें धरली आहे ही चमकी? कुणी तरी वाट्टोळा ठोल्या इसम दिसतो आहे. भूत खास नाहीं. भुतें थोडींच बॅटऱ्या घेऊन हिंडतात! त्यांना तर काळोखांतही दिसतें.

आणि हा दुसरा तरुण कोण बरें? हा बराच लुकडा न् उंचाडा दिसतो. वा! छान जोडी आहे, लॉरेल न् हार्डी!

थांबा...पाहा, त्यांच्याच दिव्याचा उजेड त्यांच्या तोंडावर पडला. गॉश! अरे

हे तर ओळखीचे दिसतात लोक !...तो उंचाडा इसम ताडे नि तो वाटोळा इसम बोंगळे. दोघेही दैनिक ' आरोळी'चे खास बातमीदार आहेत.

पण ह्यांना ओळख देऊन उपयोग नाहीं. असे या इकडे वाचक. हं, झाडाला टेकून राहा उभे. घाबरूं नका. चिंचेचं नाहीं झाड !

आतां असे आडोशास राहून पाहूं या, हे प्रख्यात बातमीदार काय करतात तें ! बातमीदारांचं ' लाईफ ' कसं असतं हें पाहाण्याची अगदीं खुमखुमच लागली होती आपल्याला ! चला, आज फिटणार ती !

पण लेकाचे हे इतक्या रात्रीं रानांत कशाला मरायला आले आहेत ?...काय म्हणतां ? खून झाला असेल ?...असेल बुवा. कांहीं सांगवत नाहीं. पण थांबा, ते कांहीं तरी बोलताहेत.

" जपून चाल. " ताडे बोलत होता. " आवाज करूं नकोस. तुझं चालणं म्हणजे फूटबॉलसारखं ! गडगडत धबधबत गेल्याशिवाय चालतच नाहीं तुला."

" म्हणून लाथा मारतो आहेस वाटतं मला मघांपासून ? " बोंगळे चिडून बोलला.

" जरा पायाखालीं बघून चल. "

" तुझाच दोष. तूं लाइट फेकीत नाहींस बरोबर. "

" माझाच दोष. " बोंगळेनें आपल्या फुगऱ्या तोंडानें वेडावलें. " तुझ्याबरोबर आलों हाही माझा दोष ! वास्तविक तुझं फीचर आहे हें. पण भित्री भागूबाई भ्यायला लागली, म्हणून तात्यासाहेबांनीं दिलं मला बरोबर. "

" चूप रे बुवा. " ताडेनें त्याला दाबलें. तो जरा रागावलाच होता.

“ तूं अगदीं कंटाळा आणतोस. माझ्याबरोबर आलास तो उपकार करायला होय ? दुपारीं दांडी कुणीं मारली ? कोर्टांत गेला होतास ? ”

बिचारा बोंगळे ह्या प्रश्नांच्या माऱ्यानें चीतच झाला. नंतर एक शब्दही न बोलतां दोघेही कांहीं वेळ मार्ग काढीत चालले होते. मध्येंच थांबून बोंगळेनें चमकीचा उजेड रस्त्याच्या कडेला फेकला.

“ कुठें रे आलों आपण ? ”

“ पोंचलोंच कीं येऊन. तो बघ दिवाण चमणलालचा बंगला. आणि...आणि... बंगल्याची पिछाडीच आहे ही. ”

बोंगळेनें “ ख...खरंच ?...” असें चाचरत म्हटलें आणि बॅटरीचा उजेड भीत भीत आसपासच्या झाडांवर फेकला. पावसाचें पाणी पानांवरून टपकत असलेलें प्रकाशांत चमकलें. चमकीचा उजेड फिरतां फिरतां एका उंच झाडावर येऊन थबकला. बोंगळेच्या तोंडून एक अस्फुट उद्गार बाहेर पडला आणि चमकी हातांतून गळून खालीं पडली. ताडेनें ती उचलली आणि त्याच झाडावर पुन्हा उजेड पाडला. काळ्या गर्द पानांनीं भरलेलें तें चिंचेचें झाड होतें.

त्यानें बोंगळ्याकडे पाहिलें. बोंगळेनें डोळे मिटले होते.

इतक्यांत दूर कुठें तरी क्षीण प्रकाश दिसूं लागला. हळुहळू तो प्रकाश जवळ आला. ताडेनें झटदिशीं चमकी मिटली. आपल्या पत्रासाठीं अभूतपूर्व बातम्या मिळवतांना खास बातमीदारांना फार गुप्तता ठेवावी लागते.

लवकरच तो उजेड अगदीं जवळ आला; आणि ताडेला समजलें कीं तो सायकलचा दिवा आहे. इतक्या रात्रीं कोण सायकलवरून चालला आहे, ह्या कुतूहलानें तो वाट पहात उभा राहिला.

सायकल जवळ आली.

" ओह्हो...हा तर कापरे. ए कापरे !...खालीं उतर, लेका कापरे ! "

सायकल एव्हांना त्यांना मागें टाकून पुढें गेली होती. ताडेनें मारलेल्या हाकेमुळें दचकून सायकलवाला खालीं पडल्याचें उभयतांनीं पाहिलें. नंतर कांहींच हालचाल होईना.

काय करावें तें ताडेला सुचेना. पण त्यानें बोंगळेला थांब म्हणून सांगितलें आणि आपण धावतच सायकलीकडे गेला. सायकल चिखलांत पडलेली असून स्वार निम्मा सायकलींत अडकून कण्हत पडला होता. त्याचें धोतर सांखळींत सापडून फाटलें होतें.

" मी कुठें आहे ? "

ताडेनें त्याला उठवलें आणि चमकीच्या उजेडांत आपली ओळख पटवून भिण्याचें कारण नाहीं म्हणून सांगितलें. नंतर सायकल घेऊन ते दोघे बोंगळेच्या बाजूस गेले.

बोंगळे बेशुद्ध पडला होता.

" त्यानें पाहिलन् कीं काय तरी ? "

" पाहिलन् ? काय पाहिलन् ? " कापरेनें एका डोळ्यानें बोंगळेकडे नि दुसऱ्यानें ताडेकडे पाहात विचारलें.

कापरे चकणा होता.

" अरे काय काय विचारतोस ? ज्याच्यासाठीं आम्हीं इकडे आलों तें...माझं

फीचर नाहीं का ? "

" भुताटकीचं ? "

" राइट ! त्यासाठीं मी अंबी तेलिणीची काल नव्हती का मुलाखत घेतली ? बस्स् तर. अंबीनें सांगितलेली जागा हीच. तोच चमनलालांचा बंगला, नि हें तें चिंचेचं झाड. इथेंच अंबीला तें पांढरं भूत दिसलं होतं. "

" भोलाराम मारवाड्याचं ? "

" राइट ! त्याचाच पंचवीस वर्षांपूर्वी नाहीं का खून झाला ? आणि आतां तो म्हणे रोज मध्यरात्रीं पिशवी घेऊन ह्या झाडाखालीं येतो. "

" पिशवी ?. . ."

" आंत खुनी माणसाचं मुंडकं असतं. " कापरेच्या आंगाला दरदरून घाम सुटला. मग तांडेला आठवण झाली, कीं बोंगळेला पाणी मारून शुद्धीवर तर आणला पाहिजे. पण बोंगळे आधींच शुद्धीवर आला होता. पावसानें 'जोषांत' पाणी मारलें होतें. ताडेनें पिशाच्चाची गोष्ट काढल्यानें मात्र पुन्हां बोंगळे मूर्च्छित पडणार असें वाटत होतें. पण सुदैवानें तो शाबूत राहिला.

पावसाला आतां जोर चढत चालला. तिघांनींही आपापले रेनकोट आवळून गुंडाळून घेतले. वारा सूं सूं करूं लागला.

" किती वेळ थांबायचं रे ? " बोंगळेनें म्हटलें. " अजून तर येत नाहीं भूत ? "

" चूप रे ! येईल सावकाश ! "

" कापरे, तूं कुठें मेला होतास आत्तां ? "

" मीं खापणकर ज्योतिष्याची चार तास मुलाखत घेतली. "

" चार तास ?..."

" होय. चहा वगैरे सगळं धरून लागतोच तेवढा वेळ. शेवटीं अकरा वाजतां भविष्य मिळालं. लगेच ऑफिसांत जाऊन तें देऊन आतां परत चाललों होतों. तात्यासाहेबांनीं बजावून सांगितलंय्, भविष्याचं फीचर चांगलं झालं पाहिजे. "

थोडा वेळ कापरे अस्वस्थ होता. नंतर त्यानें सायकलवर हात ठेवून सांगितलें, " मी जातों कीं रे आतां ?....मला नाहीं भूतबीत पाहाण्याची इच्छा. "

" वा वा ! असं कुठें झालंय् ? " ताडेनें त्याचा हात धरून म्हटलें. "बरोबरच जाऊं आपण. अरे, एकास तीन असलों कीं भूतबीत कांहीं करायचं नाहीं आपल्याला. शिवाय तुझ्या गळ्यांत म्हणे जानवं असतं. भूत दिसलं कीं ब्रह्मगांठ दाखव. "

" दाखवतोय् ब्रह्मगांठ ! " बोंगळे तोंड वांकडें करून म्हणाला. " जानवं कानावर ठेवायची पाळी येईल. "

इतक्यांत ताडे एकाएकीं चमकला.

" ...बघ...त–त–त–तें–बघ... "

त्याच्या थरथरणाऱ्या बोटाच्या अनुरोधानें बोंगळे नि कापरे ह्यांनीं पाहिलें. एक अगदीं अस्पष्ट पांढरी आकृति दूर अंतरावरून झपाट्यानें चालली होती. शेवटीं ती चिंचेच्या झाडापाशीं जाऊन पोंचली आणि नंतर वर जाऊन अस्मानांत अदृश्य झाली.

एवढें होतें न होतें तों एक तीक्ष्ण कर्कश शिळेसारखा आवाज त्या भयाण

शांततेला भेदून गेला.

ताडेनें कपाळावरून हात फिरवला. त्यानें जें पाणी निपटून काढलें तें सर्वच पावसाचें खास नव्हतें. नंतर त्याने खालीं रस्त्यांतच फतकल मारली. बोंगळे नि कापरे आधींच खालीं कोसळले होते.

दहा मिनिटें गेलीं. ताडे उठला.

"मित्रहो..." त्यानें निश्चयाच्या स्वरांत म्हटलें, "आपण तिघांनींही भूत पाहिलंच आतां. पण एवढ्यानें भागायचं नाहीं. भुताटकीचं फीचर दणदणीत झालं पाहिजे असा तात्यासाहेबांचा हुकूम आहे. पुन्हा एकवार आपण भूत जवळून कसं दिसतं हें पाहिलं पाहिजे...चला त्या चिंचेकडे."

कापरेनें ह्यावर हात झाडले. बोंगळेनें 'थंडी भयंकर वाजते, नाहींतर आलों असतों,' असें म्हणून नाखुषी दाखवली. कापरेनें 'लवकर गेलों तर झोंप तरी मिळेल.' असे म्हणून दिवा पेटवून सायकल उभी केली. तेव्हां 'एकटा कसा जाशील? मी सोबत येतों.' असें म्हणून बोंगळेनें पिनवर पाय ठेवला.

आ करून ताडेची स्वारी त्या निघून जाणाऱ्या सायकलकडे पहात राहिली. त्याच्या छातीचे ठोके ठणठण पडत होते.

नंतर त्यानें प्रचंड धाडस करून आपलीं पावलें चिंचेच्या वृक्षाकडे वळवलीं. काय वाटेल तें झालं तरी भुताला पुन्हा एकदां पाहिलंच पाहिजे. आपलं फीचर उत्तम झालंच पाहिजे. तात्यासाहेब खूष झालेच पाहिजेत.

बस्स ! भुताची मुलाखत आणणार !

चमकीचा उजेड पाडीत धडपडत अडखळत ताडे त्या चिंचेच्या झाडाखालीं

आला. आणि त्याच क्षणीं धबकदिशीं झाडावरून खालीं कांहींतरी पडलें.

अगदीं जवळ जर पडलें असतें तर ताडे इतका घाबरला नसता. पण तें पडलें तें एकदम ताडेच्या पाठीवर.

ताडेची मानगुटी धरून त्या पांढऱ्या आकृतीनें त्याला खालीं पाडला. ताडेची बोबडी वळली होती. ताडे घामानें भिजला होता. ताडेचें रक्त गोठलें होतें.

त्या पांढऱ्या आकृतीनें ताडेचे हातपाय एका दोरीनें गच्च बांधून टाकले आणि तोंडाच्याही मुसक्या बांधल्या.

नंतर उठून एक क्षणभरही न थांबतां ती पांढरी आकृति झपाट्यानें दूर निघून गेली.

ताडे जरी अर्धमेला झाला होता आणि त्याचे पंचप्राण जरी कंठांत आले होते तरी तो एवढें पाहिल्याशिवाय कांहीं राहिला नाहीं....

...कीं त्या पांढऱ्या आकृतीनें दिवाणसाहेब चमनलाल ह्यांच्या बंगल्याकडे प्रयाण केलें आहे.

...त्या आकृतीच्या खांद्यावर एक भली मोठी पांढरी पिशवी आहे !

...आणि सर्वांत भयंकर गोष्ट म्हणजे त्या आकृतीचे पाय चक्क उलटे आहेत !

एवढें पाहिल्यानंतर ताडेंत त्राणच राहिलें नाहीं. मघांसारखी आणखी एक कर्कश शीळ ऐकूं आली आणि घाबराघुबरा होऊन ताडे बेशुद्ध पडला.

दुसऱ्या दिवशीं दैनिक आरोळींतली पुढील हकीगत ( त्यांतील मुद्रणपिशाच्चांना चुचकारल्यानंतर ) लोकांनीं थक्क होऊन वाचली...

**दिवाणसाहेबांच्या बंगल्याजवळ भूत.**
**खांद्यावर पिशवी. पिशवींत मुंडकें !**
**'आरोळी'च्या प्रतिनिधीनें पाहिलेला भयंकर प्रकार.**

भुताखेतांवर कोणाचा विश्वास बसो अगर न बसो, 'आरोळी'च्या हजारों वाचकांसाठीं मुद्दाम श्रम करून पैदा केलेली पुढील भयानक सत्यकथा त्यांना खास चकित करून सोडील.

शहरच्या सीमेवर बागेशाही तलावाजवळून बैलगाडीची मोठी सडक जाते. ह्या ठिकाणीं चोराचिलटांचा फार उपद्रव असतो हें शहरवासीयांना पूर्वीपासून माहीत आहेच. खुद्द सडकेपासून थोड्याच अंतरावर जो एक शहारे आणणारा प्रकार घडला, तो कळल्यानंतर आतां ही बाजू केवळ मानवीच नव्हे तर दैवी दुराचाऱ्यांनींही व्यापलेली आहे, ह्याची आमच्या वाचकांस खात्री पटेल.

काल अंबी तेलिणीची मुलाखत आम्हीं प्रसिद्ध केली ती वाचक अजून विसरले नसतीलच. एका अडाणी बाईच्या खुळचट कल्पनांना इतकी प्रसिद्धि दिल्याबद्दल काल आम्हांला कांहीं वाचकांनीं वेड्यांत काढलें होतें. पण कोणाच्याही निंदेला अगर टीकेला न भितां अगर कोणताही एखादा दूषित पूर्वग्रह करून न घेतां आपलें कार्य करीत राहाणें हें 'आरोळी' चें ब्रीद आहे. त्या ब्रीदाला अनुसरून ह्या भुताटकी प्रकरणाचा पुरा पिच्छा पुरवण्याचें आरोळीनें ठरवलें आहे.

ह्या निश्चयाला अनुसरून काल आमचा एक खास प्रतिनिधि हातावर शिर घेऊन हें प्रचंड साहस करण्यासाठीं उपर्युक्त भागाकडे गेला होता. रात्रीं चार तास पावसांत नि अंधारांत ठेचा खाल्ल्यानंतर आमच्या प्रतिनिधीला जो भयंकर अनुभव आला त्यामुळें ह्या भुताटकींत कांहीं ना कांहीं तरी तथ्य असावें अशी आमची खात्री होऊन चुकली आहे.

आमच्या प्रतिनिधीला अंबीनें उल्लेखिलेली भयाण पांढरी आकृति प्रत्यक्ष दिसली

हें नमूद करण्यास आम्हांस अभिमान वाटतो. आकृतीचें वर्णन हुबेहूब अंबीच्या म्हणण्याप्रमाणेंच होतें. इतकेंच नाहीं, तर तिच्या खांद्यावर एक पिशवीही होती !

ही आकृति प्रथम एकदा दिसून एकाएकीं अदृश्य झाली. आमच्या प्रतिनिधीनें बिलकुल न भितां चिंचेच्या मोठ्या वृक्षाकडे प्रयाण केलें. हें चिंचेचें झाड जमाबंदीखात्याचे दिवाण रावबहादुर चमनलाल ह्यांच्या बंगल्याच्या पिछाडीस आहे हें काल आम्हीं प्रसिद्ध केलेल्या नकाशांत स्पष्ट झालेंच आहे.

आमचा प्रतिनिधि चिंचेच्या झाडाखालीं जातांच झाडावरून एकाएकीं पिशाच्चानें त्याच्या मानेवर उडी घेतली. दुसरा एखादा असता तर त्याच क्षणीं गतप्राण झाला असता. पण आमच्या प्रतिनिधीनें असामान्य प्रसंगावधान दाखवून रामरक्षा म्हटली. तत्क्षणीं भूत पळालें !

ह्या वेळीं आमच्या प्रतिनिधीनें जें एक भेसूर दृश्य पाहिलें त्यानें ह्या शूर तरुणाचीही क्षणभर घाबरगुंडी उडाली, हें आम्हीं प्रांजलपणें कबूल करतों.

आमच्या प्रतिनिधीनें बघितलें, तों ही पांढरी आकृति उड्या मारीत दिवाण रावबहादुर चमनलाल ह्यांच्या बंगल्याकडे गेली. वाटेंत त्या आकृतीनें एक कर्कश भेसूर किंकाळी फोडून आपली पिशवी वर उडवून दिली.

पिशवी जमिनीवर पडली आणि तिच्यांतून एक रक्तबंबाळ मुंडकें बाहेर निघून चिखलांत लडबडत गेलें.

( ह्या चक्षुर्वै सत्यं प्रकारानंतर भुतासंबंधींच्या आधुनिक कल्पनांना बराच धक्का बसणार आहे ह्यांत शंका नाहीं. या संबंधांत उलटसुलट पत्रव्यवहारास ‘आरोळीं’त अवश्य स्थळ दिलें जाईल.—सं. आरोळी. )

तसेंच कांहींजणांनीं त्याच अंकांत प्रसिद्ध झालेलें भविष्य आतुरतेनें वाचलें. उदाहरणासाठीं आपण कर्क राशीचें भविष्य घेऊं या—

**कर्क**...आहे बुवा! चैन आहे नि काय तुमची! कुटुंबसौख्य चांगलें. प्रवास बेताचा. पण तो मजेंत! आणि पैशांच्या बाबतींत बिलकूल फिकीर नाहीं. ह्या आठवड्यांत तुम्हांला दणकून धनलाभ आहे. तेव्हां 'फिष्ट' कधीं देणार बोला!

आपले लोकप्रिय दिवाण रा. ब. चमनलाल ह्यांची कर्क रासच आहे हें लक्षांत ठेवा.

आणि भयंकर थक्क होऊन नि सपाटून डोळे ताणून 'आरोळी'चे मुख्य संपादक त्याच दिवशींच्या ताज्या 'क्रॉनिकल' कडे पाहात होते.

हेडलाइनचीं ठसठशीत काळीं अक्षरें त्यांच्याकडे वटारून पाहात होतीं...

**दिवाणांच्या बंगल्यावर दरोडा**

इलाख्याचे जमाबंदीखात्याचे दिवाण नामदार रा. ब. चमनलाल ह्यांच्या बंगल्यावर काल रात्रीं एकाएकीं दरोडा पडला आणि दीड लाख रुपयांची मालमत्ता लांबवण्यांत आली.

ह्या दरोड्याबाबत अधिक माहिती अद्याप हातीं लागलेली नाहीं. पण दरोडा एकाच इसमानें घातलेला असावा असा तर्क केला जात आहे.

रावबहादुरांच्या बंगल्याची बाजू अगोदरच धोक्याची समजली जात असल्यानें पोलिसांची जादा गस्त त्या ठिकाणीं चालू असतेच. दरोड्याची बातमी कळतांच ताबडतोब पोलिस त्या ठिकाणीं आले, पण चोर आधींच फरारी झाला होता. त्याचें एक घरफोडीचें हत्यार तेवढें खालीं पडलेलें सापडलें.

सडकेच्या आसपास शोध करतां एका चिंचेच्या झाडाखालीं पोलिसांना एक

विलक्षण दृश्य दिसलें. एक किडकिडीत तरुण हातपाय नि मुसक्या बांधलेला असा बेशुद्धावस्थेंत पोलिसांना सांपडला. त्याला ताबडतोब चौकीवर नेण्यांत आलें. शुद्धीवर आल्यावर त्यानें आपली भुतानें अशी स्थिति केल्याचें सांगितलें. आपलें नांव मात्र तो सांगेना. अखेरीस तो वेडा अगर बावळट असावा असें समजून त्याची सुटका करण्यांत आली.

पण पोलिसांचें समाधान झालेलें नाहीं. पोलिस या इसमाच्या पाळतीवर आहेत. त्याच्यावर घडलेल्या प्रसंगानें सर्वच प्रकाराला एक रहस्यमय स्वरूप आलेलें आहे.

## नंतरची बातमी

दरोडा प्रकरणांत पोलिसतपास जारीनें चालू आहे. पावसाळ्यामुळें दरोडखोराच्या पायाचे उमटलेले ठसे स्पष्ट दिसत आहेत. पण त्यांनीं पोलिसांची फसगत झाली आहे. ज्या दिशेला दरोडखोर पळाला असें पोलिसांना आतापर्यंत वाटत होतें व म्हणून ज्या दिशेला त्यांनीं शोध चालू ठेवला होता त्या दिशेला तो मुळींच गेलेला नसून वास्तविक तिकडून आलेला असावा असें समजण्यास आतां जागा झाली आहे.

आणि ह्याचें कारण, चोरानें उलटे बूट घातले होते असें तज्ज्ञ गुप्त पोलीस म्हणतात.

# विठ्ठलरावांचा दिवाळसण

शींवच्या एका पडीक इमारतींत चक्कर-संघाची कचेरी होती.

सदस्य थोडे. मी धरून अवघे सहा. पुलापासून रुळापर्यंत (टेबलाच्या, आगगाडीच्या नि खडीच्या) तमाम विषयांवर काव्य रचणारे कवि रुमझुम, पत्नीला अक्षरशः देवता—म्हणजे महिषासुरमर्दिनी—मानणारे विठ्ठलराव लाटणे, सावलीचेंही सोवळें मानणारे सनातन मार्तंड—चंडूशास्त्री आणि पुरोगामी पीठावरून त्यांच्याशीं अखंड काथ्याकूट करणारे बेफिकीर साहेबराव हे क्लबाचे चौघे सभासद म्हणजे चार धान्यांचें एक कडबोळें होतें. पिंडदानाची वेळ जवळ येत चाललेले वृद्ध बहिरे आबा हे अळणी अध्यक्ष संघाला लाभले होते. आळसटपणानें लोळणें आणि लोळत लोळत झाडून सगळ्या विषयांवर गप्पा छाटणें हा ह्या क्लबाचा मुख्य उद्देश असे.

अर्थात् नरकचतुर्दशीचा दिवस असूनही सूर्य तीन मजले उंच आला तरी हें कडबोळें कुठच्या तरी नरकाच्या कढईत खतखतां घोरत पडलें असतें तरी त्यांत सामान्य जनतेला नवल वाटण्यासारखें कांहीं नव्हतें. ह्या चार चक्करांनीं नऊ नऊ वाजेपर्यंत आपले मुखडे पांघरुणांनीं झाकून ठेवले म्हणून उजाडायचें थोडेंच राहाणार होतें? बरें, नरकस्वर्गाचा ह्यांना विधिनिषेधच नाहीं. कवि रुमझुम नेहमीं कोट (कटाक्याचा नव्हे) करीत त्याप्रमाणें त्यांच्या बाबतींत Mind was its own place and could make Heaven of Hell or Hell of Heaven.

अर्थात् चक्कर-चतुष्टय पहांटे उठलें तें नर्काधिपति यमाच्या भीतीनें नव्हे तर नान्या, दलपति नि यमी ह्यांच्या धसक्यानें. हीं तिन्ही कार्टी डांबरी फटाक्यांचे शंभर नंबरी बार उडवून विठ्ठलराव लाटणे ह्यांची झोपमोड करण्यास कारणीभूत झालीं. विठ्ठलराव लाटणे अभ्यंग स्नान उर्फ 'थो थो' ला भिऊन (लहानपणीं

जसे आईला तसे आज ) पत्नीला न विचारतां मागच्या दारानें बाहेर पडून कवि रुमझुम ह्यांच्या घरीं दाखल झाले. स्वतः पारोशाचे असूनही खिडकींत उभे राहून 'फुलबाजी उडवणाऱ्या बालिकेस पाहून' कविता करणाऱ्या कविराजांच्या प्रतिभेवर त्यांनीं पाणी ओतलें.

"रुमझुम, बस्स झालं तुझं काव्य. आपण कांहींतरी केलं पाहिजे." विठ्ठल-रावांनीं त्यांना आपली मनीषा ऐकवली.

"तुमचा फराळ झाला का विठ्ठलराव ?" कवींनीं प्रेमळपणें विचारलें.

"रुमझुम, स्नान केल्याशिवाय ती मला चिरोटा तरी चावूं देईल असं वाटतं तुला ?...आणि मी बाबा अशा पहाटेचं कढत पाण्यानें देखील स्नान करायला तयार नाहीं...चल, शींवला जाऊं."

"शींवला ?"

"संघाची बैठक भरवूं या. ह्या पिसाट गलक्यापासून दूर,. दूर कुठें तरी जाऊं या..."

"शून्याकडे म्हणतां ?"

"तसं म्हण...पण नको. आंकड्याचं नांव काढूं नकोस....कुणाच्याही डोक्यांतल्या आंकड्याचं !...थर्मास आहे ना तुझ्यापाशीं ? डायमंडचीं डबडीं आहेत ना दोन तीन ? बस्स तर !"

कवि रुमझुम नाइलाजास्तव चपला घालून निघाले. साहेबरावांनीं फराळ केलेलाच होता. ते तर मोठ्या खुषींत निघाले. चारसहा निवडक पदार्थ तेवढे सेवून भस्माचे पट्टे चर्चून बंडूशास्त्री तयार झाले होते; तेही आनंदानें बरोबर निघाले. आबांना न विचारतांच त्यांचें मुटकुळें उचलून टॅक्सींत टाकण्यांत

आलें. हें सर्व लटांबर अखेर शींवच्या आपल्या कचेरीपाशीं जाऊन पोचलें. जिन्याच्या खालच्याच पायरीवर शेजारच्या मारवाड्याच्या पोरानें ठेवलेला बाण त्या वेळीं इतक्या 'जोषां'त उडाला कीं संघाध्यक्ष आबांनीं त्या आवाजालाच बिचकून उड्डाण केलें आणि क्षणार्धात आख्खा जिना चढून ते वर जाऊन पोचले. मात्र चेंबर्लेनच्या उड्डाणानंतर हिटलरच्या रक्त-पिपासू 'प्रेशर' मुळें जितकी शांतता प्रस्थापित झाली असेल त्याच्या चौपट अशांतता आबांच्या उड्डाणानंतर त्यांच्या ब्लॅडप्रेशरनें उद्‌भूत झाली. त्यांत क्षणाक्षणाला आजूबाजूला उडणारे फटाके भर घालीत होतेच. शेवटीं महत्-प्रयासानें आबांच्या जीवनांत थोडी हालचाल आणली गेल्यानंतर साहेबरावांनीं घरून आणलेले चिरूट, विठ्ठलरावांनीं चोरून आणलेले चिरोटे, बंड्डशास्त्र्यांचा पेटंट चिवडा आणि आबांचा थर्मास ह्या सर्वांचें साहाय्य घेऊन सभेच्या कामास सुरवात झाली.

कवि रुमझुम ह्यांनीं प्रारंभीं महिषासुरमर्दिनीचें स्तवन केलें. पुराणकालीन देवता खलपुरुषांच्या छातीवर पाय देऊन त्यांना कायमची निद्रा आणीत असत, तर आजकालच्या स्वार्थलोलुप गृहदेवता कुलपुरुषांचा पहाटे चार चार वाजतां निद्राभंग करून त्यांच्या मानवी हक्कांवर पाय आणीत आहेत; चूल व मूल ह्यांत त्या इतकें रंगल्यासारखें दाखवतात कीं त्यांमुळें पतीच्या मूल हक्कांचा चुलींत होम होत आहे इकडेही त्यांचें लक्ष जात नाहीं, इत्यादि विचार त्या एवढ्याशा काव्यांत गुंफलेले होते.

त्यानंतर साहेबराव 'दिवाळींतील दोष' हा निबंध वाचण्यास उठले असतां बंड्डशास्त्र्यांनीं दुसरा शब्द 'दोष' नसून 'दोशे' असावा अशी शंका—साहेबरावांच्या मतें 'आशा'—प्रगट केली. त्यांना अर्थातच दिवाळींतील खाद्यपदार्थांखेरीज दुसरें कांहीं दिसत नव्हतें हें उघड आहे. साहेबरावांना मात्र शास्त्रीबुवांची ही निरर्थक विनोद करण्याची तऱ्हा आवडली नाहीं. आणि आबांनींही 'आर्डर आर्डर' म्हणून जाजमावर हात आपटले. आदल्या दिवशीं कचेरीच्या दालनांत आळींतल्या मुलांनीं दारूकामाचा कार्यक्रम केलेला होता वाटतें; कारण आबांचा हात जो आपटला तो एका केपाच्या टिकलीवर आणि

त्यामुळें जो मोठा आवाज झाला त्यानें आबा बेशुद्धच पडले.

निदान दिवाळीसारख्या आनंदाच्या प्रसंगीं तरी आबांसारख्या अध्यक्षानें 'स्लीपिंग पार्टनर'चीच भूमिका पत्करलेली बरी; कारण Crabbed age and youth cannot live together असा कविसंकेत रुमझुम ह्यांनीं सांगितला आणि त्यामुळें साहेबरावांनीं आबांच्या ओठाशीं धरलेल्या थर्मासखेरीज त्यांची इतर कांहीं शुश्रूषा न करतां चक्कर-संघानें आपलें काम पुढें सुरू केलें.

आजची बैठक विठ्ठलरावांनींच जुळवून आणलेली असल्यामुळें पुढील कार्यक्रमांची बरीच मोठी जबाबदारी त्यांच्याच माथीं पडते, असा बूट बंडूशास्त्र्यांनीं काढतांच विठ्ठलराव लाटणे 'माझा पहिला दिवाळसण' ह्या विषयावर बोलायला उठले.

"चक्करहो!" विठ्ठलराव म्हणाले, "माझें वैवाहिक जीवन उर्फ लग्नाची बेडी म्हणजे भल्या मोठ्या अश्रूंची एक गळसरी आहे हें मीं तुम्हांला सांगायला नकोच. माझ्या लहानपणींच माझं लग्न ठरलं. त्यामुळें ह्या रुमझुमप्रमाणें 'लहानपण देगा देवा' असा दांभिक टाहो फोडण्याची मला कधीं स्वप्नांतही इच्छा होत नाहीं. नाक मुठींत धरून मी बोहोल्यावर चढलों, भरगरणारें डोकें दोन्ही हातांनीं दाबून वरातींत मिरवलों; आणि रात्रीं निजानीज झालेली पाहून हळूच घरांतून सटकून देवीच्या देवळांत जाऊन स्वतःचे कान धरले आणि थोबाडींत मारून घेतल्या. देवळांतल्या समयांची सावली त्या वेळीं भिंतीवर भीषण भवितव्यतेप्रमाणें नाचत होती.

"पण लग्नसमारंभाचें एवढें नाहीं. तो एक दिवसाचा होता आणि एका दिवसांत पार पडलाही. आज दिवाळीच्या मुहूर्तानें मला आठवण होते आहे ती माझ्या दिवाळसणाची. लग्नानंतर कांहीं दिवस लोटले. दिवाळी आली. रीतीप्रमाणें सासुरवाडीहून मला बोलावणें आलें.

"मी जात्याच भिडस्त असल्यामुळें अगोदर निमंत्रणच नाकारणार होतों. पण

वडिलांची भीड पडल्यामुळें जावें लागलें."

" त्या वेळीं आम्हीं लहान होतों. त्यामुळें आमचें बोलणें चालणें विशेष नसेच. पण कांहीं म्हणा, तेव्हांपासूनच तिची माझ्यावर जरब बसलेली. ती फारशी कधीं माझ्याकडे पाहायची नाहीं. आणि कधीं पाहिलंच तर मला तत्क्षणीं बलीप्रमाणें पाताळांत दडल्यासारखें वाटायचें. "

" कांहीं बायका... " साहेबराव सिगारेटचा झुरका घेऊन म्हणाले, " जात्याच अंमळ अधिकारगाजव्या असतात. आनंदीबाई पेशवे झाल्या, एलिझाबेथ राणी झाली... "

" पुरुषादबला बलीयसी असा नवीन संकेत मानला पाहिजे. " कवि रुमझुम म्हणाले.

विठ्ठलराव म्हणाले, " त्यामुळें माझ्या दिवाळसणापैकीं निम्मे तास माझ्या लहान मेहुणे—मेहुण्यामंडळीस फिरायला नेण्यांत निघून गेले. जवळ जवळ अष्टौप्रहर ह्या मुलांच्या रगाड्यांत माझा जीव मेटाकुटीस येई. माझ्या गळयांत हात घालून माझ्या पोटावर चढून किंवा माझ्या शेंडीशीं खेळत तीं मला प्रश्न करीत.

" ' बापू, तुम्हांला पेटी वाजवतां येते ? '
" ' नाहीं रे बाळ. '
" ' बरं पिआनो तरी ? '
" ' छट्. '
" ' एकतारी ? '
" ' बिलकुल नाहीं. '
" ' फोनो ? '
" ' अहं ! '
" ' मग तुम्हांला गातां तरी येतं ? '

" ' गातांही नाहीं येत. ' आणि सुरेल संगीताशीं माझ्या कंठाचा काडी इतकाही संबंध नाहीं हें दाखवण्यासाठीं मी पुढें म्हटलें, ' इतकंच काय, पण गुळण्या जरी करायच्या असतील ना, तरी पहिल्यांदा मी एका कपाटांत स्वतःला कोंडून घेतों न् मग करतों घुळुक घुळुक ! '

" पण ह्याचा परिणाम थोडा निराळा झाला. कारण, एका मुलानें विचारलें, ' तुमच्या घरीं कपाटं किती आहेत, बापू ? '

थोडक्यांत सांगायचं म्हणजे साडेसाती मागें लागली होती. आणि इतक्या सगळ्या काबाडकष्टाचं फळ काय ? तर तिचा चेहरा सुद्धा आठ आठ दिवसांत दिसण्याची मारामार. ह्या शेंबड्या पोरांचे मात्र दिवसांतून आठ आठ वेळां पापे घ्यावे लागत !

ओवाळणीचाही समारंभ पार पडला. माझ्या लहान मेहुण्या मला ओवाळायला तयार झालेल्या पाहून अंमळ खुषींत येऊन मीं रेशमी शर्ट घातला आणि पाटावर बसलों. तों पहिल्याच मेहुणीनें निरंजनांतलें तेल माझ्या शर्टावर उपडें केलें, दुसरीनें माझ्या कपाळावर कुंकवाचा मळवट भरून मला कडकलक्ष्मी बनवलें. आणि तिसरीनें मूठभर अक्षता इतक्या जोरानें माझ्या कपाळावर हाणल्या कीं त्यांतला निम्या माझ्या नि निम्या पलीकडे कौतुक करीत बसलेल्या सासूबाईच्या डोक्यावर पडून त्यांनीं अंमळ कातावून मुलीकडे पाहिलें. एवढा प्रकार झाल्यानंतर सासऱ्यापाशीं हट्ट धरून मीं जर रीतीप्रमाणें मागायची वस्तु आसूड किंवा चाबूक मागितली असती तर तें क्षम्यच झालें असतें. पण मीं मागितलें घड्याळ."

**कवि रुमझुम :** आयुष्याचा नाश होतो राम कां रे म्हणा ना !

**विठ्ठलराव :** तिनें ओवाळलं तेव्हां तिला मीं नथ घातली. मला त्या वेळीं काय कल्पना कीं हीच पुढें माझ्या नाकांतली वेसण होणार आहे म्हणून ? तेव्हां मात्र तिनें हंसून माझ्याकडे बघितलन् आणि मग ती धीट होऊन रोज माझ्याशीं

बोलायंची.

**साहेबराव :** त्याबद्दल आम्हांला प्रश्न नव्हता पडला. तुम्हीं धीट होऊन त्यांना कधीं उत्तरं दिलींत का तेवढं सांगा.

विठ्ठलराव गंभीरपणें उत्तरले, " आत्तांपेक्षां खात्रीनें त्या काळांत माझ्या आंगीं थोडंबहुत धैर्य होतं. पण माझ्या ह्या धीटपणाचं कौतुक करून ती दिवसेंदिवस मला अधिकाधिक काम सांगूं लागली. शिवाय श्वशुरांची स्वारी मला व्यवहाराचे धडे देण्याच्या निमित्तानें आपल्या कीर्दखतावण्या ऐन लक्ष्मीपूजनाच्या दिवशीं माझ्या पुढ्यांत मांडून मला सतावीत होतीच. सासूबाईही वाती करीत असतांना आपल्या लहानपणींच्या गप्पा सांगत, त्या नाक मुठींत धरून ऐकाव्या लागत.

" एकदा 'तिच्या'च हुकुमावरून सर्व मुलांना शहरांतल्या जत्रेला घेऊन गेलों. परत येईपर्यंत अंतरात्मा इतका चिडला होता, कीं येतांक्षणीं गणितशास्त्राला धरून पुढील हिशेबाचा कागद तयार केला नि तिच्या अंगावर फेंकला. त्यांत पुढीप्रमाणें हिशेब मांडलेला होता :—

डोळे पुसले :—९ वेळां ( ६ वेळां मुलाचे ३ वेळां स्वतःचे )
चिमटे बसले :—२१ वेळां.
चिमुकल्या बुटांचे बंद बांधले :—१७ वेळां.
वाकलों, पडलों, उसासलों, वैतागलों :—अनुक्रमें ८, ३, ५, व २१ वेळां.
फुगे घेतले :—मुलागणिक दोन : १५ मुलांनीं नाकांतून काढले फुगे नं. १ ह्यांचा सर्वसाधारण टिकाऊपणा पाव सेकंद.
फुगे नं. २ ह्यांचा अक्षय.
' रस्ता ओलांडूं नका ' म्हणून सांगितलें २९ वेळां.
' ओलांडा ' म्हणून सांगितलें ५८ वेळां.
पुन्हां मुलांना फिरायला नेईन : शून्य वेळां !

“ अर्थातच सौभाग्यवती ह्या हिशेबामुळें माझ्यावर अतोनात गरम झाली. त्यांत भर पडली संध्याकाळच्या प्रकारानें. त्याच रात्रीं गाडीनें आमचा दिवाळसण आटपून आम्हीं परत जाणार होतों, त्यामुळें त्या प्रकरणाचा सासुरवाडींत विशेष गाजावाजा झाला नाहीं. तो प्रकार म्हणजे एवढाच कीं दिवाळीची भेट म्हणून मीं तिला एक पुस्तक दिलें. सासूबाईनीं आपल्या आरशीवरून तें पाहिलें आणि माझें मनमुराद कौतुक केलें. सासूबाईना वाचतां येत नव्हतें तरी त्यांना आपल्या मुलीच्या पांचवीपर्यंतच्या विद्येचें कौतुक वाटत असे.

“ सौभाग्यवती मात्र कपाळाला आंठ्या घालून माझ्याकडे पाहूं लागली. आणि तेव्हांपासून तिनें माझ्यावर जो दांत धरलान् तो आजतागायत कायम आहे. कारण पुस्तकाचें नांव होतें संततिनियमन ! ”

विठ्ठलराव एवढें सांगताहेत तों त्यांनीं वर्णन केल्याप्रमाणें चोंबडें दिसणारें एक नमुनेदार कार्टे जिना दाण दाण चढून वर संघाच्या कचेरींत आलें आणि ओरडलें, “ साप ! साप ! ”

त्याच्या त्या किंचाळण्यामुळें आबाही उठून बसले. क्षणभर चक्कर-संघाच्या कचेरींत खळबळ दिसूं लागली. त्या पोरानें जेव्हां ‘ कशी केली ? ’ अशा अर्थी एक भलें जंगी हास्य उठवून आपल्या हातांतली लहानशी गोळी जमिनीवर ठेवली आणि तिला आग लावून एका धुरकट, किरट्या, भुसक्या नि विषारी सापाला जमिनीच्या पोटांतून बाहेर काढलें, तेव्हां संघाचे सभासद एकमेकांकडे स्तंभित होऊन पाहूं लागले.

मग साहेबराव म्हणाले, “ हात्तिच्या ! मला वाटलें, तो सांगतोय् कचेरींत खराच साप शिरला म्हणून ! ”

“ आणि मला अशी उमेद वाटली...” विठ्ठलराव हताशपणें खालीं बसून उसासले, “ कीं त्यालाच खराखुरा साप चावलाय् म्हणून ! ”

# देहूरोड ते विसापूर

दररोज सकाळीं पुण्यनगरीच्या सहस्रावधि भागांतून अंशाअंशांनीं उगम पावून नंतर शनवारवाड्यापुढें प्रचंड रूप धारण करून नव्या पुलावरून भांबुर्ड्यांत पडणारा मानवी प्रपात तुम्हीं पाहिला आहे ना ? त्यांतल्याच एका थेंबाबद्दल आज सांगायचें आहे.

थेंब पाहातांच कोणींही ओळखलें असतें कीं हें मध्यमवर्गाचें पाणी आहे. गृहस्थ मध्यम उंचीचा, मध्यम जाडीचा आणि मध्यम पोषाखाचा दिसे. इतकेंच नाहीं, तर रोज देहूच्या यात्रेला जातांना तो चालत असे तोही त्या वारकरी संमर्दाच्या मध्यभागीं. त्याची मध्यम दर्जाची सायकल रोज चहाचा थर्मास आणि फराळाच्या डब्याची निळी पिशवी (...आणि साखर कितीही महागली तरी डब्यांत त्याच्या आवडत्या बेसनाच्या लाडवाची गोळी ठेवायला आई विसरत नसे.) ह्या संयुक्त गुढीनें अलंकृत असायची. आणि ह्या थाटाला शोभेशी 'घोडी गाढवा! नीट बस लाडवा!' अशी वेडीवाकडी पण तालयुक्त बडबड स्वतःशीं करीत तो मध्यमबुद्धीचा तरुण तोल सावरीत सायकल हाणायचा. त्या असंबद्ध गूढगुंजनाला अनेक कारणें होतीं. एक तर 'लोकयुद्धा'-चा अंशतः भार उचलायला निघालेल्या त्या लाखमोलाच्या लोकसेनेबरोबर 'आगेकदम' करतांना त्याचें स्वप्नाळू मन आपल्या सायकलीला खरोखरीच 'घोडी' समजूं लागलें होतें. 'गाढवा' ही, त्याच जातीच्या गोजिरवाण्या पिल्लाचें गोबरें सौंदर्य मिरवणाऱ्या एका पोरगेल्या साहेबाची आवडती शिवी होती; आणि हा पोरगा आमच्या नायकाचा 'बॉस' होता. लाडवाला नीट बसण्याविषयीं केलेलें आवाहन त्याच्या डगमगीत परिस्थितीमुळें तितकेंच सयुक्तिक होतें. कारण आतांपर्यंत तेरा वेळां तरी, पुढचा घबघबा एकाएकीं रोखला गेल्यामुळें किंवा डावीकडून एक जोराचा प्रवाह अकस्मात येऊन आदळल्यामुळें किंवा उजवीकडून लोकसागराच्या खालून सूर मारीत एखादा चार पायांचा केसाळ मासा भुंकत केकटत सायकलखालीं आल्यामुळें, त्याला

भोंवऱ्यासारखें गरगरां फिरावें लागलें होतें, आणि त्या गरगरीत सुमधुर लाडवाला मुकावें लागलें होतें. असंबद्ध प्रलापाचें आणखी एक कारण म्हणजे प्राप्त परिस्थितीनें त्याचें अशक्त डोकें खरोखरीच फिरल्यासारखें झालें होतें.

धड अद्ययावत् नाहीं, धड जुन्या वळणाचें नाहीं अशा मध्यम फॅशनच्या 'माधव' ह्या नांवानें हा तरुण ओळखला जाई. तो कधीं कोणाच्या अध्यांत नसे, मध्यांत नसे. राजकारणांत तो स्वतःला जहाल समजे पण मवाळासारखा वागे. जवाहरलाल नेहरूंचें भाषण ऐकलें कीं तो पुलकित होई, पण प्रत्यक्ष कांहीं तरी कर म्हटलें कीं त्याच्या आंगावर कांटा उभा राही. युद्धकाळांत कधीं नव्हे ती आपण होऊन गळयांत पडणारी आणि बढती–महागाई भत्ता–प्रॉव्हिडंट फंड अशीं सुगंधी पुटें चढलेली प्रसाधनयुक्त सरकारी नोकरी दूर सारून कॉंग्रेसची कंटकयुक्त साधना पत्करणें त्याला धोक्याचें वाटे. तेव्हां मनांतल्या मनांत 'गर्जा जयजयकार क्रांतिचा...' हें पद गुणगुणत तो ॲम्युनिशन डेपोच्या फायली भरी, थर्मास रिकामा झाला, कीं लाडवाची गोळी तोंडांत टाकून नाक्यावरच्या पत्र्याच्या हॉटेलांतला काळा चहा पिऊन तरतरीत होई आणि आळोखेपिळोखे देत पुन्हा शाईनें बरबटलेल्या आपल्या बोटांत तो डोळ्यांसमोरही नकोसा झालेला टाक धरण्यासाठीं आपल्या जागेवर येऊन बसे. मधून मधून तो लालतोंड्या साहेब आला तर खाडदिशीं उठून 'यस् सर' 'नो सर' किंवा जें सर करायचें असेल तें सर करी; खालीं बसे. हेडक्लार्कनें बोलावलें तर उठे, परत धाडलें कीं पुन्हा येऊन बसे. अशा त्याच्या अनेक उठबशा चालत, तरी संध्याकाळीं घरीं जायला उठेपर्यंत त्याची जागा ऊबदार आणि त्याचा उत्साह थंडगार झालेला असे.

पण हा निर्विकार, निरुत्साह, निस्तेज कीटकही मधून मधून वळवळ करी. भोवतालच्या दाट अंधारांत तो प्रकाशाची तिरीप धुंडी आणि त्याला काय दिसे ? राष्ट्रसेवेचें प्रखर तेज, त्यागाची जळती मशाल. पण त्या अग्नितेजानें तो दिपून जायचा. मग तो डोळे मिटी आणि हळूच उघडी. प्रेमाचा नंदादीप त्याला बोलावी आणि त्याच त्याच जीवनक्रमाला कंटाळलेला तो भुकेला जीव त्या मंद शीतल ज्योतीभोवतीं फडफड करी.

माधवचें प्रेम ज्या बालिकेवर जडलें होतें तिचें नांवही नंदाच होतें. पण इथेंच हा दृष्टांत संपला. कारण तिचा स्वभाव नंदादीपासारखा सौम्य नसून होमवन्ही-सारखा जाज्वल्य होता. नऊ ऑगस्टला तावातावानें कॉलेज सोडून ती एका मिरवणुकींत सामील झाली आणि तिनें लाठीनें डोकें फोडून घेतलें. सुदैवानें महिन्या दीड महिन्यानें ती बरी झाली. ( ह्या काळांत रोज देहूला जातांना नव्या पुलावरच्या तिच्या इस्पितळांत एकदम डोकावून...आणि मध्येंच आपली सायकल, थर्मास, पिशवी, डबा आणि त्यांतला लाडू कोणी नेत नाहीं ना हें हेरण्यासाठीं सज्ज्यांतून बाहेर डोकावून...मगच कामावर जाण्याचा त्यानें परिपाठ ठेवला होता. ) आणि मग एकदम गंभीर बनून तिनें विवेक केला म्हणा, कांहीं म्हणा, पण आतां कशांत भाग घ्यायचा नाहीं असें आईबापांजवळ कबूल करून साम्राज्यशाहीच्या नांवानें बोटें मोडीत आणि मग दिलरुब्याच्या तारांवरून तीं फिरवीत नंदा घरींच बसली. माधवची लहानपणापासून तिच्या घरीं येजा; त्यामुळें तिचा स्वभाव तो ओळखून होता. ही पोरगी गप्प बसणारी नाहीं हें त्याला पक्कें माहीत. त्यांतच तिच्या घरीं बिऱ्हाडकरू म्हणून राहाणारा तो एकुलता एक उंच देखणा सडसडीत तरुण मास्तर जेव्हां आपण 'संगीत-लोंढा' कीं अशीच कांहीं परीक्षा उतरलों असल्याची थाप मारून तिला 'शिकवण्यासाठीं' रोज येऊन बसूं लागला तेव्हां तर त्याची खात्रीच झाली, कीं गुप्त चळवळींत ही भाग घेत असावी. त्या मास्तरला सर्वजण देशमुख आडनांवानें ओळखत असत. पण माधवनें इकडून तिकडून मिळवलेली माहिती खरी असेल तर तो एक मोठा फरारी कार्यकर्ता असून चळवळ सुरू होण्याच्या आधींच तिचीं सूत्रें हालवण्यासाठीं पुण्याला येऊन राहिला होता. नंदेच्या मनाचा कल त्यानें ताडला होता आणि म्हणून दोघें मिळून आतां गुप्त चळवळीचें संचालन करीत असत. दिलरुब्याचें संगीत हें त्यांचें छद्मावरण (Camouflage) होतें. त्यांच्या त्या शिकवणीच्या तासांत जर कसले ध्वनि निघत असतील तर ते महाराष्ट्राच्या दऱ्याखोऱ्यांतून आणि गल्ल्याकुच्यांतून हिंडणाऱ्या हजारों विध्वंसक कार्यकर्त्यांना उद्देशून निघालेल्या सूचना व आदेश म्हणूनच असतील असा माधवचा कयास होता. देशमुख—किंवा माधवच्या शब्दांत सांगायचें तर—प्रभाकर नेने हा बत्तीसच्या सत्याग्रहांत तुरुंगवास भोगून आलेला जीव आहे एवढें कळल्यावर तर त्याच्या भूमिकेबद्दल माधवची

जवळजवळ खात्रीच झाली. तरी आपल्या स्वभावाप्रमाणें त्यानें तिकडे पहिल्यानें दुर्लक्ष केलें. पण एक दिवस अचानक त्याच्या मनांत आलें कीं एका विशिष्ट कार्यासाठीं वाट्यास आलेल्या साहचर्यांतून पुष्कळदा प्रेमाचा उद्भव होत असतो. तसें तर येथें होणार नाहीं ?

आणि खरोखरीच माधवची ती भीति खरी ठरली. प्रभाकर आणि नंदा ह्यांचें प्रेम जमलें आहे असा त्याला दाट संशय येऊं लागला.

देहूची दैनिक वारी आटोपून एका संध्याकाळीं तो नंदेच्या घराच्या पायऱ्या चढला. खालच्या मजल्यावर नंदेची आई–माई–एकट्याच होत्या. माधवनें रुमाल काढून रपेटीनें लालबुंद झालेल्या आपल्या चेहऱ्यावरचा घाम पुसला. तोंच जिन्यांतून तणतणत खालीं आलेले दिलरुब्याचे आरोहावरोह त्याच्या कानांवर आदळले आणि त्याचीं कानशिलें आणखी लाल झालीं.

माई कांहीं तरी शिवणकाम करीत बसल्या होत्या. त्यांनीं चष्म्यावरून त्याच्याकडे पाहून म्हटलें, “या माधवराव ! आज बऱ्याच दिवसांनीं फिरकलांत इकडे ?”

कुठें तरी कांहीं तरी जखम झालेली असावी आणि तिच्यावर कोणींतरी मिठाचें पाणी शिंपडावें, तसें माधवला झालें. त्यानें एकदम कपाळाला आठ्या घातल्या आणि डावा हात कोटाच्या खिशांत घालून उजव्या हातानें मधल्या तिपाईवरचें किर्लोस्कर मासिक उलटीत तो म्हणतो, “कसं येणार माई ? आम्ही सूर्याबरोबर उठणारे नि त्याच्याचबरोबर मावळणारे लोक. आमचा लढा उगवत्या सूर्याशीं आहे हें मनावर बिंबण्यासाठीं ‘लोकयुद्ध’ वाचावं तर तेवढाही वेळ आम्हांला नसतो. संध्याकाळीं यायचं, बकबक खायचं नि बिछान्यावर पडायचं. लगेच झोप !...स्वप्नं पडतात तीं सुद्धा सायकल, बॉस, लेजर-फायली नि कळकट चहा ह्यांचीं ! काल तर स्वप्नांत मीं असं पाहिलं कीं सायकल पंक्चर असल्यामुळें रेल्वेचं तिकिट काढायला मीं लायनींत उभा राहिलों. उकडून उकडून डोक्याची जेव्हां अगदीं सुकी भाजी झाली तेव्हां तिकिट

न काढतां तिकिटकलेक्टरच्या नाकावर ठोसा देऊन तसाच गर्दींतून आंत घुसलों. गाडी ठिचून भरली होती म्हणून त्यावर चढलों ... पुढें काय झालं असेलसं वाटतं तुम्हांला ? ”

“ कांहीं कल्पना होत नाहीं. ” बोटाला सुई टोचून रक्ताचा थेंब निघाला होता तो जिभेच्या शेंड्यानें टिपून घेत माई म्हणाल्या.

“ देहूरोडजवळ गाडी येते न येते तों भयंकर स्फोट होऊन गाडीच्या ठिकऱ्या ठिकऱ्या झाल्या. अकराव्या शेडमधला क्लार्क दत्तू चिटणीस उडून चतुराशिंगीवर पडला. चार म्हातारे हविलदारक्लार्क पान खाऊन तोंडं रंगवीत होते ते एका सार्जंटाबरोबर रक्ताच्या थारोळ्यांत डुंबूं लागले. अंतू सरंजामे नि डिव्हिजनल ऑफिसर गळ्यांत गळा घालून गणेशखिंडीपर्यंत गडगडत गेले; नि मी...”

“ तुझं काय झालं ? ” माईनीं कातर स्वरांत अभावितपणें द्व्यर्थी प्रश्न केला. डॉक्टरना बोलावणें धाडावें कीं काय, असा मनांत त्यांचा अर्धवट विचार चालू होता.

“ मी जो उडालों तों स्वर्गाला तुकाराममहाराजांना भेटायला गेलों...(सद्गदित होऊन) माई!...रटाळ! रटाळ आहोंत आम्हीं! आमच्या जीवनांत काडीचा राम नाहीं. आम्ही जगतों कशाला तें आमचं आम्हांला माहीत! स्वप्नांत मीं पाह्यलं तेवढं जरी घडलं तरी मी स्वतःला धन्य समजेन. पण तेंही घडत नाहीं. भिकार, कुजकट, रटाळ जीवन चाललं आहे आपलं...रेटतोंय् आपलं...” असें म्हणून अगदीं लुला, मलूल बोंगळा होऊन माधव एका खुर्चीत आपटला; आणि पुढें म्हणतो, “ तो साहेब न् आम्ही, त्या फायली न् आम्ही. तो गिळगिळीत चहा न् आम्ही. कुठें तरी हजार मैलांवर युद्ध चाललंय् म्हणे. कसचं युद्ध ! त्यानें आमच्या पुढाऱ्यांना होताहेत वांत्या, नि आम्ही आपले ह्या ओशट जीवनांत मरतों आहों. लढणाऱ्यांना तरी सुख होतंयू ? छट् ! त्यांनीं आपलं वाट्टोळं करून घेतलंय्! मरा म्हणावं...मरा! नि आमचा तो लांब लांब

रस्ता ! पांच मैलांची सडक ! मागून पुढून आपल्यासारखेच हजारों गोटे लकटत चाललेले ! बरं, गोटे तरी नर्मदेतले असावेत; चांगले गरगरीत शाळिग्राम असावेत ?...छे ! नांव कशाला ? ते पण छप्पन्न ठिकाणीं वाकडे, टोकदार नि खडबडीत. एकदा इकडे आपटतील, एकदा तिकडे. एकदा हिकडनं ढुसकतील, एकदा तिकडनं ! कधीं सुसकन् पुढें येतील, तर कधीं फुसकन् उभे राहातील ; नि दुसऱ्याला आडवे पाडतील !...रस्ता मात्र सोडायचे नाहींत. नाकापुढचा रस्ता ! आपण सोडायचे नाहींत ; दुसऱ्याला द्यायचे नाहींत. लांब लांब रस्ता... नि शेवटीं काय ?...घर ! घासभर मं मं नि लगेच अंगाई...दुसरं कुणी हाक मारील, बोलावील...नांव कशाला ? आमचं असं आहे कोण ? कुणाला आमच्याबद्दल हें वाटतंयू ? ”

“ असं कसं म्हणतोस माधव ? ” माई मृदु स्वरांत म्हणाल्या, “ घरीं आई नाहीं का तुझी ? ”

“ आई ! ” माधव किंचाळला. आणि मग एकदम स्वर मंदावून म्हणतो, “ आहे. आई आहे. नाहीं तर जिवंत असून मेल्यासारखाच होतों मी. पण माई, बरोबरचे मित्र कोण आहेत मला ?...मला आपला म्हणणारीं, बोलावणारीं, खेळ म्हणणारीं, खा म्हणणारीं, हसवणारीं, रडवणारीं, अशीं आहेत का कुणी माणसं ?...कोऽणी नाहीं ! आम्ही पण असलेच...नादान, रटाळ, भुक्कड म्हणा ! कशाला आमच्याकडे कुणी पाहील !...खरं म्हणजे तुम्हांलाही मी नकोसा झालोंय्. भय्यासाहेबांनाही, नंदेलाही...”

राजापुरी गंगा उमटावी तशी कोठून ही आपल्याला त्यावेळीं बेरोक वाचा फुटली हें माधवला नंतर आठवून आठवेना. तो आपला सारखा बोलतच होता. माईनींच त्याला मध्यें रोखलें.

“ काय बोलतोयूस माधव तूं ? ” त्या म्हणाल्या, “ तुझं काय डोकं बिकं तर फिरलेलं नाहीं ! भलतीच कांहीं वेड्यासारखी समजूत करून घ्यायची नि मग बसायचं रडत ! कधीं रे तूं आम्हांला नकोसा झालास ?...तूं येतोस तेव्हां ते

बाहेर गेलेले असतात; मग कसे बोलणार ते तुझ्याशीं ? मी असत्यें कामांत. नंदाही आतांशा गाणं शिकत असते...म्हणून काय तूं आम्हांला नकोसा झालास ? कालच नंदा विचारीत होती..."

" काय विचारीत होती ?"

" कीं माधव आतांशा खप्पड झालाय् ! त्याला कांहीं होतंय् कीं काय ? "

" खप्पड ? "

" तिचा शब्द आहे तो. नंदेची भाषा म्हणजे कशी असते तें माहीत आहेच तुला ! " माई हसत हसत म्हणाल्या, " पण खरं आहे तिचं. काय दिसतोयूस रे तूं आतांशा ! अगदींच अशक्त झाला आहेस ! टॉनिक तरी घे नि जोडीला व्यायाम कर थोडा. "

माधवनें दांत ओठ खाल्ले आणि म्हटलें, " ऊठबशा, नमस्कार नि तंगडीतोड ह्यांचं अजीर्ण झालंयू माई मला ! आम्हीं रटाळ, भिकार, गचाळ लोक ! दिवस मोजतों आहोंत आम्हीं ! "

" कांहीं तरी बडबडूं नकोस...देशमुख मास्तरांना ओळखतोस ना तूं ? वर जा, नंदेशीं बोल जरा. मी तंवर कॉफी ठेवत्यें...पळ ! "

माईंनीं शिवणकामही बाजूला ठेवून सैंपाकघराकडे प्रयाण केलेलें पाहून माधवची स्वारी भानावर आली. आपला मध्यम मेंदू आज इतका भरकटला तरी कसा हेंच त्याला कळेना. मग त्याला वाटले...ह्याचें कारण हें तर नाहीं ? होय. हेंच. मत्सर ! मत्सरानें मनुष्याचा राक्षस बनतो. मत्सरानें जळफळतों आहों आपण हें चांगलें नाहीं. अगदींच तोल सुटला आपला. माईसारख्या वडील माणसांचीही मुर्वत ठेवली नाहीं आपण...आणि आचरटासारखें बोललों ! रटाळ काय, भिकार काय ! भुक्कड काय ! स्वतःला असें म्हणून घेणें शोभतें तरी आपल्याला ?

...कांहीं झालं तरी आपण 'युद्धकार्य' करतों आहों, हुकूमशाही खिळखिळी करतों आहों. अगदींच कांहीं साधे कारकून नाहीं आपण!

हे विचार मनांत येतांच माधव स्वतःशींच कडवटपणें हसला. त्याच वेळीं नकळत त्याचीं पावलें जिन्याकडे वळलीं. माईचे शब्द त्याच्या मनांत घोळूं लागले. "देशमुख मास्तरना ओळखतोस ना तूं?" वा! काय पण प्रश्न! ओळखतों बरं. चांगला ओळखतों. अहो माई, तुमच्याहीपेक्षां चांगला ओळखतों. त्याची खरी ओळख तुम्हांला करून दिली माई, तर तुम्ही बिऱ्हाडकरू म्हणून ठेवाल का त्याला? साहस करावं लागेल त्याला जबरदस्त, समजलांत?

दिलरुब्याच्या झंकारांशीं अभावितपणें ताल धरीत जिन्याच्या पहिल्या कांहीं पायऱ्या तो चढला. मग संगीत एकाएकीं थबकलें; आणि एक दोन अस्पष्ट वाक्यांची देवघेव झाल्याचा भास झाला. त्या वाक्यांतलें अक्षरही त्याला कळलें नाहीं. पण दुनियेंतली सगळी मृदुता आणि नर्मभाव त्यांत एकत्रित झाला आहे असें माधवच्या संशयी मनाला वाटलें. अगदीं वरच्या पायरीवर तो पोचायला आणि दुसराच एक विलक्षण ध्वनि त्याच्या कानांवर पडायला एक गांठ पडली. त्यानें मात्र तो चांगलाच स्तंभित झाला. आपलीं सगळीं गात्रें हतबुद्ध झालीं आहेत असें त्याला वाटलें. आपण पुन्हा बोंगळ बनून येथेंच पडून गडगडत खालीं जातों कीं काय अशी त्याला भीति वाटली. तो ध्वनि कसा होता तें शब्दांत सांगणें कठीण आहे. पण त्यानें माधव घाबरला एवढें खरें. तुलनाच करायची तर, कांहीं दिवसांपूर्वीं आई घरीं नसतांना चहाची पातेली त्यानें रिकामीच शेगडीवर ठेवली होती आणि मग तिच्यांत केर दिसल्यामुळें किंकर्तव्यमूढ होऊन थोडा वेळ इकडे तिकडे धावपळ केल्यावर कपड्याचा ओला बोळा पातेलींत फिरवून ती साफ करण्याचा खटाटोप केला होता. त्या वेळीं झालेल्या च्+र्+ब्+स् अशा लोकविलक्षण ध्वनींशीं आत्तां त्यानें ऐकलेल्या आवाजाचें बरेंच साम्य होतें; आणि म्हणूनच त्यानें माधवला धक्का दिला. पण ह्या धक्क्यापासूनही त्या

बापड्या धक्केखाऊ इसमानें अखेर स्वतःला सावरलें आणि तसाच जड पावलांनीं वर चढून तो नंदेच्या खोलींत एकदम न शिरतां तिथेंच भिंतीचा आडोसा करून उभा राहिला.

त्यानें तसें उभें राहायला कारण होतें. तें म्हणजे नंदा आणि प्रभाकर ह्यांचें त्या क्षणीं चालू असलेलें संभाषण.

" आत्तांचा हा आवाज म्हणजे संगीत कलेचा बोऱ्या आहे. " प्रभाकर हसत हसत म्हणत होता. आणि त्या आवाजाचें मनोमन पृथःकरण माधवनें अगोदरच केलेलें असल्यामुळें त्यावर प्रभाकरनें चढवलेली ती निर्लज्ज मखलाशी पाहून त्याच्या आंगावर शहारे आले. मनुष्य मदनाच्या आधीन झाला म्हणजे इतका बहकतो आं ?...आणि हे म्हणे राष्ट्रसेवक !

पुन्हा त्यानें कान टवकारले. प्रभाकरच पुढें बोलत होता, " आमच्या उस्तादनीं मला दिलरुब्याची ही टेस्ट शिकवली. त्यांनीं सांगितलं कीं दिलरुब्याला ही कसोटी लावावी नि असा आवाज निघाला कीं समजावं...तो टाकाऊ आहे. दुसरा घ्यावा...पाह्यलंत ? "

पुन्हा एकदा तोच आवाज...च्+र्+ब्+स्!

ह्यात्तिच्या ! आपली सारीच तर्कसरणी चुकली म्हणायची ! बाहेर उभा असलेल्या माधवनें थोडें समाधान पावून लगोलग आपले केसही उपटले. एकंदरींत ' देशमुख 'चें खरें स्वरूप आणि उद्दिष्ट कांहीं असो, त्याला संगीतांत खरोखरीच थोडी फार रंगत दिसते !

" माहीत आहे. " तेवढ्यांत नंदा रागावून म्हणाली, " दिलरुबा रद्दी आहे तें माहीत आहे मला. पुन्हा पुन्हा कशाला त्याचा उच्चार करायला हवा ? तुम्हांला कितीदा सांगितलंय् मीं, कीं कितीक वर्षांत मी त्याला हातही लावलेला नाहीं. तुमच्या ओळखीच्या निमित्तानें पुन्हा संगीत शिकायला सुरवात केली..."

" खरं पाह्यलं तर, संगीताच्या निमित्तानें मी...."

" तें झालंयू सांगून पुष्कळदा." नंदेनें त्याला एकदम तोडलें. " पण दिवसाचे चोवीस तास तर कांहीं राजकारणांत घालवतां येत नाहींत ना ? तुम्हीही संगीतांत एवढे निपुण आहांत; तेव्हां त्याचा फायदा घेऊन माझं संगीताचं ज्ञान वाढवलं मीं, तर त्यांत बिघडलें काय ? "

" छे छे ! बिघडलं कसलं ? "

" आणि मला तर बाई आतांशा वेडच लागलंयू गाण्याचं ! बाबांना सारखी सांगत्येंयू मला नवा दिलरुबा घेऊन द्या. तर ते म्हणतात, पैसे नाहींत सध्या ! "

" भय्यासाहेबांजवळ पैसे नाहींत ?...असे किती पडतात दिलरुब्याला ? "

" सोनाळकरांच्या दुकानांत...सोनाळकर माहीत आहेत ना ? आमचा न् त्यांचा तर खूप घरोबा. फारच चांगले सुस्वभावी आहेत ते स्वतां. पण म्हणून काय त्यांच्याकडे दिलरुबे का उधार मागायचे ? मात्र त्यांच्या दुकानांत एक काळया रंगाचा छान उत्तम दिलरुबा मीं हेरून ठेवलायू ! किंमतही फार नाहीं. नव्वद रुपये. ह्या लढाईच्या नि महागाईच्या दिवसांत नव्वद म्हणजे कांहींच नाहीं ! "

माधवला वाटलें, नंदेचें इतकें सारें बोलणें बरेंच सहेतुक असावें. तिचे शब्द जलद जलद येत होते आणि त्यांत एक प्रकारची आशा-आतुरता होती.

ती एक रुक्ष हास्य करून पुढें म्हणाली, " बाबांजवळ खरंच पैसे नाहींत. आमच्या ह्या घराबिरावर जाऊं नका. अट्टल श्रीमंताला शोभेसं कर्ज आहे बाबांना...पण...पण...मला बाई, सारखं असं वाटतं, कीं बाबांनीं एवढा माझा हट्ट पुरवावा. खर्च होईल खरा थोडा पण माझी खात्री आहे, कीं

पुढच्या वर्षी दिलरुबा वादनाच्या स्पर्धेत भाग घेऊन अडीचशेंचं पहिलं बक्षीस मी पटकावीन. ”

“ दिवस मोठे कठीण आले आहेत. ” प्रभाकर वयस्क पुढाऱ्याच्या आविर्भावांत बोलला. त्या वेळीं त्याचा चेहरा बराच लांबट झालेला असावा.

“ खरं आहे. माझाही वाढदिवस जवळ आला आहे, म्हणून मीं तरी एवढा हट्ट धरला. पण जाऊं द्या तें सगळं ! ” एवढेंच तुटकपणें बोलून नंदा गप्प बसली. तेवढ्यावरून काढायचा तो अर्थ माधवनें काढला आणि त्या मठ्ठ प्रभाकरच्या मात्र तो ध्यानांत येऊं नये ह्याचें त्याला नवल वाटलें. त्याच वेळीं थोडीशी खसबस झाली. त्यावरून दोघें कदाचित् उठण्याच्या तयारींत असतील असें माधवला वाटलें. आतां पुढें होऊन त्यांच्याशीं हें: हें: करीत बोलावें कीं असेंच एखाद्या कोपऱ्यांत उभें राहून प्रभाकरची पीडा येथून काढली म्हणजे मगच नंदेला गांठून तिच्यावर पित्याकडून झालेल्या अन्यायाबद्दल साश्रु सहानुभूति ढाळावी ह्याचा विचार करीत तो क्षणभर उभा राहिला. आणि शेवटीं, ‘ मां स्मर च युध्यस्व ’ अशी भगवद्वाणी लाभण्याऐवजीं सैंपाक घरांतून माईची ‘ खालीं ये ’ अशी हाक ऐकूं आल्यामुळें तो पापी संशयात्मा रणांगण सोडून तसाच खालीं पळाला.

“ नंदेचा नि देशमुखांचा चहा झालेला आहे नुकताच. ” माई त्याच्यापुढें बाष्पवलयांनीं आकर्षक दिसणारा दाट कॉफीचा कप ठेवीत म्हणाल्या, “ तूंच पी. ”

माधव प्याला. ती सुमधुर चिकोरीमिश्रित कॅफिनयुक्त उत्तेजक कॉफी माधव अधाशासारखा प्याला. ती पीत असतांना त्याचे डोळे वर आढ्याला लोंबत असलेल्या एका कोळिष्टकाकडे लागले होते ; आणि मध्यम दर्जाच्या आणि बटाट्यांनीं भरलेल्या कां होईना, त्यांच्या खोकायंत्रांत कांहीं तरी मंत्रणा खतखत शिजत होती.

“ माई, नंदेचा वाढदिवस कधीं हो ? ”

" पुढच्या रविवारीं...कां रे ? " माईनीं कुतूहलानें विचारलें.

" कांहीं नाहीं. " त्याच वेळीं कोळिष्टकांतून निसटून टपदिशीं खालीं पडलेल्या एका छोट्या झुरळाकडे नजर वळवून माधवनें गप्पकन् कॉफीचा घोट गिळला. तोंड बरेंच पोळलें.

' पुढच्या रविवारीं ' म्हणजे लवकरच कीं !...दुसऱ्या दिवशीं देहूकडे सायकल दामटीत असतांना माधव स्वतःशींच म्हणत होता...म्हणजे अवघे तीन दिवस राहिले ! तीन दिवसांत कसें जमणार हें ! वास्तविक आज पगाराचा दिवस. केवढा अपूर्व योगायोग ! पण करंट्या माधवचें दुर्भाग्य असें, कीं पंधराच दिवसांपूर्वी त्यानें, घरीं खर्चाची फार कुतरओढ झाल्यामुळें आपला सर्व पगार आगाऊ मागून घेतला होता आणि त्याच्या साहेबानेंही विशेष आढेवेढे न घेतां तो दिला होता. अर्थात् तोही निरुंद आणि जाचक मार्ग त्याला आज बंद होता. नाहीं तर, सगळाच्या सगळा पगार ह्या कामाकडे खर्च करून आपण आईजवळ दोन्ही खाका वर केल्या असत्या, आणि तिनेंही आपल्यावरील ममतेमुळें राग आवरून कांहीं तरी किडुक मिडुक विकून त्याची भर केली असती. पण आतां? केवढाही राक्षसी प्रयत्न केला, तरी आपल्यासारख्या टेंपररी वॉरटाइम कारकुनाकडून ही अजस्र कामगिरी होणार कशी ?

स्वतःसाठीं त्यानें योजलेली कामगिरी काय असावी तें, वाचक हटकून चाणाक्ष असल्यामुळें त्यांनीं एव्हांना ताडलीच असेल, तरी पण ओघानेंच आलें आहे म्हणून सांगतों.

नव्वद रुपये म्हणजे बापड्या माधवला नऊशेंच्या ठिकाणीं असले, तरी पाण्यासारखा पैसा खर्चून ह्या ' पोरी'चा हट्ट पुरा करायचा असा एक भयंकर धाडसी विचार त्यानें केला होता.

आम्हीं पूर्वीच सांगितलें आहे कीं नंदेचें मन तो लहानपणापासून ओळखून

होता. त्याला ती आवडतही असे पूर्वीपासून. पण त्याच्या त्या प्रेमाला ही नवीन कलाटणी अर्थातच (शेकडों प्रेमकथांतून जसें आढळतें तस्सें अगदीं) आतां आतां मिळालेली होती. ह्या पोरीचा स्वभाव चंचल, तरल आणि जरासा विलासी आहे हें त्याला माहीत होतें. नंदा प्रबळ भावनांची बालिका होती. ती जितकी कठोर, जहाल आणि त्यागी बनूं शके तितकीच ती कोमल, बालिश आणि सुखलोलुप होती. आणि...आणि...विचारांत घ्यायची सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे ही, कीं तिचे आपण नावडते कधींच नव्हतों. उलट ... उलट ...

एकदम माधवला वाटलें, आपण ह्या प्रांतांत आतांपर्यंत अगदींच कसें दुर्लक्ष केलें ? ह्यापूर्वींच तिच्या भावनेची जोपासना कां केली नाहीं? वारंवार तिच्याकडे कां गेलों नाहीं? तिच्याशीं कां बोललों नाहीं? आपली कोणालाच पर्वा नाहीं असा भलता न्यूनगंड वाढूं देऊन आपण असे फटकून कां वागलों? त्याचें कारण एकच. आपल्यालाच ह्यापूर्वीं तिची पर्वा वाटत नव्हती. आतां वाटायला लागली आहे. तर आतां ही नवीनच भानगड उद्भवली! हें सापाचें पिल्लू घरांत शिरलें. काय करावें त्याला आतां? प्रीतीचा विझत चाललेला निखारा....फुलेल का परत?

फुलेल. कां नाहीं फुलणार? प्रयत्न केला पाहिजे. केल्यानें होत आहे रे, वगैरे वगैरे.

मग दिलरुबा विकत घ्यायचा आणि वाढदिवसाच्या मुहूर्तावर तिला भेट देऊन प्रीतीची वीणा पुन्हा नव्यानें छेडायची एवढें तर नक्की ठरलें. आतां व्यवहार तेवढा बाकी राहिला. नव्वद रुपये तीन दिवसांत कुठून उभे करायचे? ओळखीच्या सुखवस्तु लोकांचीं नांवें आठवलीं त्यानें, कीं जे निदान थोरांचें सुभाषित खरें करण्यासाठीं तरी अडचणींतल्या मित्राला मदत करून खरेखुरे मित्र ठरतील! पण छट्! तसा असलाच कोणी, तरी एका खेप्यांत तो बनला नसता. बराच भाव खाऊन पंधरा एक दिवस लोटल्यावर कदाचित् कोणीं तरी त्याला कर्जाऊ रक्कम दिली असती...अर्थात् दातृत्वाचा बराच टेंभा मिरवीत. पण तीन दिवसांत हें काम होईल? नांव कशाला?

च्यॅः ! प्रेमासाठीं काय वाटेल तें दिव्य करायला, वाटेल तो त्याग करायला आपण तयार आहों, आणि इतकें असून आपल्याला मार्ग सापडत नाहीं ! तसें म्हटलें तर काय वाटेल त्या मार्गानें ...by hook or crook ...

एखादेंच झुरळ घड्याळाच्या नाजूक यंत्रांतून मुशाफरी करीत असतें तेव्हां कधीं कधीं दुय्यम दर्जाचें घड्याळही कसेंबसें रुटुखुटु चालतें. पण एखाद्या सुप्रभातीं तेंच झुरळ विऊन एकाचीं चार झालीं म्हणजे घड्याळाचाही धीर खचून तीं कामसू चाकें फिरायचीं अकस्मात् बंद होतात, हा अनुभव कोणाला नाहीं ?.... निदान घड्याळजीला तरी खास असतो.

माधवचेंही तसेंच झालें. नव्वद रुपये मिळवून आणायचे हा विचार त्रासदायक खराच, पण त्याचा हल्लक मेंदू तो कसा तरी सहन करीत होता. पण जेव्हां त्या विचाराला फाटे फुटले आणि वर दिलेल्या चार इंग्रजी शब्दांच्या झुरळांनीं त्याच्या खोकायंत्रांत पदार्पण केलें तेव्हां तो बापडा अस्थिर मेंदूही कांहीं काळ का होईना, काम करायचा थांबला.

कारण माधव हबकला होता.

त्याच दिवशीं दुपारीं ऑफिसांत सर्वांनीं आपापल्या पगाराच्या रकमा घेऊन पाकिटांत बंद केलेल्या माधवनें उदास, भुकेल्या नेत्रांनीं पाहिल्या आणि पुन्हा लेजरांकडे नजर वळवली. डोळ्यांनीं दिसत असलेलें हें द्रव्यसुख देहूच्या पंचक्रोशींत त्या दिवशीं सुमारें सात हजार इसम तरी अनुभवीत असतील. पण माधवला मात्र तें वर्ज्य होतें. शीतळ छायेच्या गर्द वृक्षांखालून आरामांत हिंडत त्याचे स्नेही सुवासिक पुष्पें वेचत होते त्या वेळीं हा नतद्रष्ट इसम एका वठलेल्या वृक्षावर बसून मध्यान्हीचें ऊन खात होता ; आणि कोणीं आपल्या टाळक्यावर छत्री धरली नाहीं तरी चालेल, पण वृक्ष दीड दिवसांत पालवायची आपण वाट पाहाणार असे मूर्ख मनोरे रचीत होता.

" काय माधवराव, पगार घेतला का ? " पन्नाशी उलटलेले छापरी मिशांचे एक सद्‌गृहस्थ चहा मारण्यासाठीं बाहेर पडतांना म्हणाले.

" माधवरावांनीं आगाऊच उपटला आहे हो. ते ससा आहेत. आपल्यासारखे कासव नाहींत, अण्णा. " त्यांच्याबरोबरचा पोरगेला तरुण हसत हसत म्हणाला आणि आजच्या रकमेचा किती शतांश ह्या म्हाताऱ्याच्या घशांत आज ओतायचा ह्याचा हिशोब नक्की करीत तो त्यांच्याबरोबर बाहेर पडला. अण्णांनींच इथें चिकटवून दिलें असल्यामुळें आज त्यांना द्यावी लागणारी 'पार्टी' तर कांहीं चुकत नव्हती.

" यंव रे कासवा ! " असें पुटपुटत माधवनें दांत ओठ खाल्ले, " पार्टींत एक रट्टा दिला तर चार कोलांट्या खाशील...आणि म्हणे कासव...आणि मी ससा काय ?...आहें खराच बाकी ससा. पहिल्यानें मारली होती उडी. आतां बसा म्हणावं स्वस्थ झोपा घेत ! "

आणि त्याच क्षणाला त्यानें खरोखरीच सशाप्रमाणें कान टवकारले. बड्या साहेबांची हाक आली होती. यस्सर करीत उठणें, मायकमिन्सर करीत खोलींत शिरणें आणि मग बहुधा लाखोली ऐकत स्वस्थ उभें राहाणें ह्या क्रिया ओघानेंच आल्या. त्या यथाप्रमाण माधवनें पार पाडल्या आणि मग सुक्या झालेल्या ओठांवरून त्यानें जीभ फिरवली.

बडे साहेब त्यावेळीं एकटेच होते. साहेब बहाद्दर फुगीर बांध्याचे भयंकर लालभडक असामी असून सध्या तर त्यांच्या चेहऱ्याची लाली विशेषच गर्द बनली होती. त्यांच्या केसांची एक बट हिटलरप्रमाणें पुढें आलेली होती. मिशा चेंबर्लेनसारख्या होत्या आणि आपला एकही दांत दिसणार नाहीं अशा बेतानें आवळलेल्या त्यांच्या ओठांत चर्चिली पद्धतीनें एक चिरूट जोहार करीत होता. साहेब सर्वांत बडे असल्यामुळें त्यांच्या टेबलावर कागदपत्र ठेवण्यासाठीं एक वेताचें तबक होतें तें बहुतेक रिकामेंच होतें. टिपकागदाचें पॅडही, एक दोन सह्यांचा विकृत अवशेष सोडला तर बहुतेक कोरेंच होतें. तरी पण ऑफिसच्या

फायलींपैकीं स्वागतार्ह वाटणारी अशी ती एकुलती एक चोपडी...पगाराची कीर्दवही त्यांच्या पुढ्यांत पडली होती आणि दुसरीही एक माधवच्या पूर्ण परिचयाची आणि त्याच्याच हाताखालून नेहमीं जाणारी एक जंगी चोपडी साहेबांनीं निम्म्यावर उघडलेली, अजून तशीच होती. ऑफिसचा पगार वाटणें अद्याप पुरें झालेलें नसावें. कारण, करकरीत नोटांचीं तीन चार लठ्ठ लठ्ठ बंडलें त्यांच्या टेबलावर पडलेलीं होतीं; आणि साहेबमजकूर धुराचे लोट सोडीत किलकिल्या डोळ्यांनीं त्या बंडलांकडे पाहात होते. माधवनेंही त्या बंडलांकडे पाहूनच अभावितपणें आपल्या जिव्हाग्राची ती सूचक हालचाल केली होती.

पण ही हालचाल साहेबांच्या लक्षांत आली नाहीं. त्यानें ज्यासाठीं माधवला बोलावलें होतें त्या मुद्याकडे एकदम वळून त्याला जामायला सुरवात केली.

" डॅमली..." साहेब ओठांतून चिरूट न काढतां गुरगुरला, " आज केवढी भयंकर चूक केली आहेस तूं. नंबर नऊच्या शेडचा स्टॉक आज तूंच टिपलास ना ?

" होय सर. "

" मग भरलेले शेल्स किती होते त्या गुदामांत ?...पांचशें साठ काय ! ...अरे गुलामा ! काल मीं जातीनें उभा राहून पांचशें सहासष्ट शेल्स समक्ष तिथें रचले; नि तूं इथें लिहितोस ५६०. व्हॉट्‌ दि हेल्‌ डज्‌ इट्‌ मीन ? सहा गोळे कमी कां लिहिलेस, बोल ! "

" असं कसं करीन मी सर ?...पाहूं...पाहूं..." असें म्हणत माधव टेबलाशीं वाकला. हें नवीन लचांड काय उभें राहिलें तें त्यालाच न कळल्यामुळें तो बिचारा घाबरला होता अगदीं.

" हें बघ. " असें म्हणून निळ्या तांबड्या रेघांचीं अनेक कोष्टकें असलेलीं ती मोठी थोरली चोपडी साहेब त्याच्यापुढें करूं लागला. पण त्याच वेळीं काय

झालें कोणास ठाऊक ! चोपडी त्याच्या हातांतून निसटली आणि त्याच्या खाकी जाम्यानिम्यांतून धक्के खात अखेरीस त्याच्या बुटांच्या चवड्यांजवळ, होती तशीच, आ वासून पडली.

" डॅम्...ब्लडी...! " वगैरे ठराविक सूत्रें उच्चारीत साहेब ती चोपडी उचलण्यासाठीं खालीं वाकला.

कनिष्ठ सेवक ह्या नात्यानें माधवचें पारंपरिक मन साहेबाच्याही आधीं ती चोपडी झटकून टेबलावर ठेवण्यासाठीं उचल खाऊं लागलें. पण तेवढ्यांत त्याचें ' दुसरें मन '–जें काल संध्याकाळीं माईच्या हातची कॉफी पितांना जन्म पावलें होतें तें–एकाएकीं धक्काबुक्की करीत पुढें आलें आणि त्यानें करायची ती कारवाई केली. माधव आयता टेबलाशीं वाकलेला होताच. एक हात विद्युद्गतीनें थोडा लंबा करून नोटांच्या मोठ्या बंडलांतील अगदीं वरची नोट त्यानें दोन बोटांच्या चिमटींत धरून इतक्या सफाईनें बाहेर काढली, कीं नॅसेटच्या कोऱ्या ब्लेडनें सुद्धा इतक्या बिनभोबाट दाढी होत नसेल ! साहेब चोपडी उचलून पुन्हा वर पाहातो आहे तों टेबलाच्या पातळीखालीं त्या शंभराच्या नोटेनें माधवच्या तुमानीच्या खिशांत सुळकन् प्रवेश केला होता.

" हें पाह्यलंस ? " चोपडींतल्या त्या प्रमादस्थळावर बोट ठेवीत साहेब गरजला, " बोल, हें शून्य आहे कीं नाहीं ? "

माधव काळाठिक्कर पडला होता. साहेबाला वाटलें, आपण त्याचा अपराध त्याच्या पदरांत घातला म्हणूनच असणार. वास्तविक माधवला त्या चुकीचें एवढें कांहीं वाटत नव्हतें. त्यानें चाचरत चाचरत पण अगदीं प्रामाणिकपणें खुलासा केला. " सर, समजलं मला आतां. सहाचं वेटोळं पुरं करतांना जवळजवळ थेट वरपर्यंत न्यायची सवय आहे मला. त्यामुळें कधीं कधीं तें फाजील वर जाऊन वर्तुळ पुरं झाल्याचा भास होतो आपल्याला. खरं म्हणजे ही चूकच. भयंकर चूक... "

" पटतंय् ना हें ? मग पुन्हा असा गाढवपणा करूं नकोस. दिवस कसे आले

आहेत तूं जाणतोसच...एक क्षणभर मला असं वाटलं कीं सॅबोटाज करायचा बेत आहे कीं काय तुझा!"

"भलतंच...सर...भलतंच! माझ्या कधीं मनांत तरी येईल असं?" अगदीं सपशेल काळा पडून माधव उद्गारला. त्याची अपराधी तनुलता थरथर कांपत होती.

"जा तर मग. पुन्हा असं शून्य काढूं नकोस. वेटोळ्याला जरा वेळींच वळण देऊन सहाची दामटी वळायला तुझ्या बापाचं काय जातं?"

माधवनें कबूल केलें, कीं ह्यापुढें ६ चें गरगरीत पोट उगाच वाटाण्याएवढें बारीक करून वर त्याला अगदीं सनातनी पद्धतीची लांबचलांब शेंडी आपण ठेवूं. आणि मग स्वप्नांत चालावें तसें अडखळत चालत तो आपल्या खोलींत जाऊन खुर्चीवर बसला.

"का हो दामले...काय झालं तुम्हांला?" त्याच्या पलीकडे बसलेल्या कारकून मित्रानें चिंतायुक्त स्वरांत विचारलें.

"कांहीं नाहीं." असें म्हणून आपला खाकी रंगाचा रुमाल काढून माधवनें चेहेऱ्यावर डंवरून आलेला घाम दाबून दाबून पुसला. तसें करतांना छातीशीं त्याच्या हाताचा किंचित्काळ संपर्क आला. आणि तेवढ्या त्या संपर्कानें हृदयांत चाललेल्या धडधडाटाची त्याला खबर दिली.

संध्याकाळीं त्या विराट मानवी लोंढ्याबरोबर घसरत पुण्याकडे जातांना तो इतका अन्यमनस्क झाला होता, कीं अनेक गंडांतरांतून त्याला त्याच्या अनोळखी सोबत्यांनीं बचावलें आणि ह्या सोबत्यांपैकीं एक उंच सडसडीत देखणी व्यक्ति ओळखीची असल्याची खबर त्याच्या डोळ्यांनीं मेंदूला पोचवली, तरी सुद्धा त्या व्यग्र मेंदूनें त्याची दखल घेतली नाहीं. नाहीं तर ही व्यक्ति देहूला कशी, असा सवाल त्यानें साहजिकच स्वतःला केला असता.



" सहाची दामटी वळायला तुझ्या बापाचं काय जातं ?"

[ पृष्ठ १९८

दुसऱ्या दिवशीं माधव जरा भीत भीतच ऑफिसांत गेला. आपली चोरी उघडकीला आली असेल काय असें वाटून त्याचें मन त्याला सारखें खात होतें. निदान ऑफिसांत बरीच खळबळ उडून बड्या साहेबानें त्या नोटीसाठीं आकाश-पाताळ एक केलें असेल अशी त्याची कल्पना होती. पण चमत्कार असा कीं ऑफिसचा दिनक्रम पूर्ववत् चालला होता. तिथली शांतता आणि सुव्यवस्था पाहून इथले तमाम कारकून आणि चपराशी सुतळीच्या तोड्यालाही हात न लावणारे प्रतियुधिष्ठिर असावेत असाच कोणाचाही ग्रह झाला असता. नाहीं म्हणायला अण्णांच्या टेबलावरचा काळा रूळ आणि तांबड्या पोटाचा दुतोंडी रबर ह्या जिनसा सापडत नव्हत्या. पण त्याही अर्ध्या तासांत ऑफिसबॉयनें आणून त्यांना दिल्या आणि सकाळीं आपण त्यांनीं विटीदांडू खेळत होतों असें अण्णांचा पोरकट स्वभाव जाणून प्रांजलपणें त्यांच्याजवळ कबूल केलें. तेव्हां ' काय हा विनोद ! ' अशा अर्थी सभोवार सगळ्यांकडे हसत हसत एकवार पाहून अण्णांनींही पोऱ्याला ' पुन्हा असं करूं नकोस ' असें म्हणून क्षमा केली.

बड्या साहेबाकडून बोलावणें आलें नाहीं, कांहीं नाहीं. शंभराच्या नोटांचे नंबर टिपलेले तरी असतात काय अशी अप्रत्यक्ष चौकशी माधवनें केली; तेव्हां युद्धकार्याच्या धावपळींत असलीं चिक्कूपणाचा वास मारणारीं क्षुद्र कामें कुणी करीत नसतें अशी रोखठोक माहिती त्याला मिळाली. त्याचा जीव एकदांचा भांड्यांत पडला. बड्या साहेबाचा बेफिकीर स्वभाव त्याला माहीत होता. शिवाय काल त्याच्याशीं बोलतांना त्याच्या मुखविवरांतून निघणारे वारुणीचे भपकारे त्यानें अनुभवले होते. तेव्हां सर्वांचा पगार वाटून झाल्यावर उरला सुरला आपला समजून खुशाल खिशांत घालण्यापलीकडे जास्त परिश्रम साहेबाकडून झालेच नसतील असा त्यांतल्या त्यांत सयुक्तिक वाटणारा तर्क माधवनें केला आणि स्वतःचें समाधान करून घेतलें.

त्याला बरें वाटलें आणि तो शनिवारची वाट पाहूं लागला. कारण शनिवारीं संध्याकाळीं क्यांपांत शंकर सोनाळकरच्या दुकानांत तो विशिष्ट दिलरुबा विकत घ्यायचा आणि मगच नंदेच्या घराच्या पायऱ्या चढायच्या असें त्यानें ठरवलें होतें. शंकर सोनाळकर त्याच्या साधारण माहितीचा होता. दिसण्यांत देखणा,

बोलण्यांत मिष्टास आणि शिक्षणानेंही अलंकृत अशा ह्या गुणी बनियानें बापाचा धंदा पुढें चालवून अल्पावधींत नांव आणि पैसा कमावला होता. सेल्समनशिपबद्दल तो नांवाजलेला होता आणि देशी किंवा विलायती वाद्यांचा साठा त्याच्याजवळ इतका विविध आणि विपुल होता, कीं तितका आख्ख्या पुण्यांत दुसऱ्या कोणाच्याही दुकानांत सापडत नसे.

त्याच्याकडून तो नवा कोरा काळा तकतकीत दिलरुबा घ्यायचा आणि आपल्या प्रेमदेवतेच्या चरणीं हळुवारपणें ठेवायचा असें माधवनें मनोमन योजलें. मात्र त्याच वेळीं त्याचें प्रामाणिक—पहिलें कीं दुसरें तें नक्की माहीत नाहीं—मन त्याला बजावीत होतें, कीं पुढें मागें तुला शक्य होईल तेव्हां ही रक्कम परत केली पाहिजे बरं कां ?... आपल्या पगारांतून.

पण आपण एक योजावें आणि दैवानें भलतेंच करावें तसें झालें.

तो सौभाग्याचा शनिवार उगवलाच नाहीं.

शुक्रवारींच माधवला अटक झाली.

आणि ह्या ठिकाणीं चाणाक्ष वाचकांनीं आपला बिनडोकपणा कबूल करावा. कारण माधवला कशाबद्दल अटक झाली असें त्यांना वाटतें ?...त्या शंभराच्या चोरीबद्दल ?

छट् !...मुळींच नाहीं ! ॲम्युनिशनच्या नंबर नऊच्या गुदामांतून दारू-गोळ्याची 'चोरी' झाली त्याबद्दल. घातपात विध्वंसन कृत्याला मदत केल्याबद्दल !

कारण गुदामांतल्या जिनसांची गणती झाली तेव्हां कर्मधर्मसंयोगानें नेमके सहा कुलपी गोळे कमी झाल्याचें आढळलें. अर्थातच जिकडे तिकडे हाकाटी झाली. चौकशी झाली. बड्या साहेबाला परवांचा प्रकार आठवला. माधव दामलेनें ती चूक जाणून बुजून केली होती ह्याबद्दल त्याला आतां यत्किंचित्

शंका राहिली नाहीं. त्यानें माधवला बोलावून नेलें आणि विश्वरूप दर्शन म्हणजे काय तें त्याला दाखवलें. ( त्याचें विश्व म्हणजे अर्थात् ब्रिटिश साम्राज्यशाही. ) आपल्या बहुरूपी व्यक्तित्वापैकीं हिटलरची बाजू त्यानें प्रगट केली. हातपाय आपटले, डोळे लाल केले, तोंडांतून, नाकांतून डोळ्यांतून क्रोधाग्नि फेकला, काला आदमी, कॉंग्रेस आणि क्रांतिकारक ह्यांचा न भूतो न भविष्यति असा उद्धार केला आणि लगेच माधवला पोलिसच्या हवालीं केलें. माधवच्या डोळ्यांतून मुळामुठा वाहूं लागल्या. पण तो करणार काय ? तसाच रडत विवळत तो पोलिसबरोबर फरासखान्यांत गेला. तिथें त्याची आई येऊन त्याला भेटली. ती रडली. हा रडला.

जवळ जवळ तीन महिन्यांनीं त्या प्रकरणाबाबत पोलिसांनीं कांहीं तरुणांवर— त्यांत माधव होताच—भरलेला खटला कोर्टापुढें उभा राहिला. पण पोलिसांनीं प्रचंड धडपड करून बनवलेला पुरावा अगदींच कच्चा ठरला. त्यामुळें कोणावरही आरोप शाबीत झाला नाहीं आणि सर्व तरुण निर्दोष सुटून बाहेर आले.

पोलिस टपलेच होते. त्यांनीं भारत संरक्षण कायद्याखालीं त्यांना अटक करून विसापूरला स्थानबद्ध म्हणून त्यांची बोळवणी केली.

दीड दोन महिन्यांनंतरची गोष्ट. विसापूर टेंपररी जेलच्या आपल्या गोशाळावजा बराकींत बसून माधव विचारांचें रवंथ करीत होता. त्याच्या समदुःखी सोबत्यांपैकीं कांहीं गूळदाण्याची पेंड चरत होते, कांहीं उंच उंच माना करून एकदा इकडे एकदा तिकडे पाहात होते, माशा वारीत होते, शरीर खाजवीत होते ; आणि जास्त माणसाळलेले होते, ते वाचीत होते किंवा कांहीं तरी बैठा खेळ खेळत होते किंवा चरख्यावर सूत कातीत होते.

माधवला विचाराला खाद्य भरपूर होतें. गेल्या चार महिन्यांचें तो

कीटकावलोकन करीत होता. ( ढिल्या, निखळत्या डोक्याचा टोळासारखा एक कीटक कधीं कधीं सुक्या गवतांतून हिंडत असतो तो चाणाक्ष वाचकांनीं पाहिलेला असेल. दंतवैद्याच्या खुर्चीप्रमाणें त्याचें मुंडकें चारही दिशांना फिरूं शकतें. अर्थात् पुढच्याप्रमाणें डावीउजवीकडचें आणि मागचेंही स्पष्ट पाहाणें त्याला शक्य असतें. सांगायचा मुद्दा हा कीं सिंहच असा कोण बादशहा लागून गेला आहे कीं तोच तेवढा पुढचें मागचें पाहूं शकेल ? 'सिंहावलोकन' करणारे कीटकही आहेतच. ) एका महाभयंकर खटल्यांत निष्कारण गोवलें जाऊन नंतर सुटणें हा प्रकार अद्‌भुत होता. निर्दोष म्हणून सुटतांच माधवाला हायसें वाटलें आणि आतां स्थानबद्धता म्हणजे कोण्या झाडाचा पाला असें म्हणून आल्या दिवसांना तोंड द्यायला तो उमेदीनें तयार झाला होता. मात्र त्याला कौतुक वाटत होतें तें त्याच्या वाट्याला आलेल्या विचित्र परिस्थितीचें.

त्यानें असें ऐकलें होतें कीं अख्ख्या महाराष्ट्रभर ज्याच्या त्याच्या तोंडीं आपलें नांव झालें आहे. कॉंग्रेसच्या नांवाखालीं निघणाऱ्या गुप्त पत्रकांतून तर म्हणे भगतसिंग-राजगुरूंच्या पंक्तीला आपल्याला बसवलें जात आहे. खटल्यांतून आपण निर्दोष सुटलों असलों आणि यदाकदाचित् कुठच्याही विध्वंसक कृत्याशीं आपला संबंध नसला तरी आपण एक फार मोठे राष्ट्रसेवक आणि क्रांतिकारक आहों अशी सर्व वृत्तपत्रांची खात्री झालेली आहे.

काय करावें बुवा ह्या प्रकाराला ? ही म्हणजे अगदीं आळशावर गंगाच झाली ! आपण देशासाठीं इकडची काडी तिकडे केली नसतांना देशभक्तीचा हा जो मुकुट आपल्या मस्तकावर चढवला जात आहे, तो कसा बुवा बाजूला सारायचा ?...बरें, तसें म्हणावें तर मनांतून गुदगुल्याही होत आहेत. अशा वेळीं काय सर्वांजवळ असें भकायचें कीं मी एक निगरगट्ट कारकून कीटक आहे, मला देशबीश ठाऊक नाहीं, नाहीं म्हणायला मीं काम केलं आहे तें एवढंच कीं स्वार्थबुद्धीनें शंभर रुपये चोरले आहेत ! आणि म्हणून तुरुंगांत आणलेंच आहे तेव्हां मला गुन्हेगारांच्या बराकींत तरी कोंबायला हवें होतें.

छे ! असें सांगायला धीर कुठें होत होता ?